

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

जानेवारी–मार्च : १९८७



महाराष्ट्र साहित्य परिषद

# सभासदांचे वार्षिक स्नेहसंमेलन

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सभासदांचे वार्षिक स्नेहसंमेलन भरविण्यात यावे, अशी सूचना साहित्य परिषदेच्या काही सभासदांनी केली आहे. तिचा विचार करून दरवर्षी २७ मे या साहित्य परिषदेच्या वर्धापनदिनी हे स्नेहसंमेलन आयोजित करण्यात यावे, असा निर्णय परिषदेच्या कार्यकारी मंडळाने घेतला आहे. त्याप्रमाणे यावर्षी २७ मे १९८७ या परिषदेच्या वर्धापनदिनी सभासदांचे पहिले स्नेहसंमेलन घेण्यात येईल. या स्नेहसंमेलनासंबंधी परिषदेच्या सभासदांशी विचार-विनिमय करण्यासाठी सभासदांची **एक सभा बुधवार दि. ८ एप्रिल १९८७ रोजी संध्याकाळी ६ वाजता, परिषदेच्या सभागृहात घेण्यात येईल. परिषदेच्या सभासदांनी या सभेला अवश्य उपस्थित राहावे आणि स्नेहसंमेलनातील कार्यक्रम ठरविण्यासंबंधी आपल्या सूचना कराव्या, अशी आग्रहाची विनंती आहे.** स्नेहसंमेलन हे सभासदांचे आहे. म्हणून ते यशस्वी होण्यासाठी सभासदांचे सर्व प्रकारचे आणि मनःपूर्वक सहकार्य अपेक्षित आहे.

**शंकर पाटील**
अध्यक्ष

**राजेन्द्र बनहट्टी**
कार्याध्यक्ष

**गं. ना. जोगळेकर**
कोषाध्यक्ष

**राजा फडणीस, म. वि. गोखले, प्रभाकर अत्रे**
कार्यवाह

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २४० ▭ जानेवारी-मार्च १९८७ ▭ मूल्य पाच रुपये



## अनुक्रम





संपादक : वसंत स. जोशी
संपादन समिती : ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवंत
सल्लागार : राजेंद्र बनहट्टी, गो. म. कुलकर्णी
मुखपृष्ठ : अनिल अवचट
प्रकाशक व मुद्रक : म. वि. गोखले, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०,
दूरध्वनी : ४४२९६३
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत

# संपादकीय

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे हीरक महोत्सवी अधिवेशन ऑक्टोबर(८६)अखेरीस मुंबईत **श्री. विश्राम बेडेकर** यांच्या अध्यक्षतेखाली थाटामाटात साजरे झाले. अनेक परिसंवाद, चर्चा, नाटके यांनी हे संमेलन गजबजून गेले होते. श्री. बेडेकर यांचे भाषण त्यांच्या अनुभवसंचितातून स्फुरलेले होते. त्याबाबत उलटसुलट चर्चा बराच काळ होत राहिल्या. संमेलन यशस्वी करण्यात महामंडळाचे अध्यक्ष प्रा. गंगाधर गाडगीळ आणि कार्यवाह डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या संयोजनाचा वाटा मोलाचा आहे. पुणे-मुंबईसारख्या शहरांतून होणाऱ्या साहित्य संमेलनातून स्वयंसेवी व्यक्तींचा सहभाग कमी होत चालल्याचे दिसून येते. साहित्यसंस्थांनी या गोष्टीचा अंतर्मुख होऊन विचार करण्याची गरज आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पाचवे विभागीय साहित्य संमेलन ठाणे येथे दै. 'लोकसत्ता' चे माजी संपादक आणि सुप्रसिद्ध नाटककार श्री. विद्याधर गोखले यांच्या अध्यक्षतेखाली साजरे झाले. कविसंमेलनात आणि परिसंवादात श्रोत्यांची लक्षणीय उपस्थिती होती. महापौर श्री. सतीश प्रधान, श्री. चिंतामणी जोशी आणि प्रा. म. वि. फाटक यांच्या नेतृत्वाने हे संमेलन यशस्वी झाले. म. सा. प. च्या सांप्रतच्या कार्यकारिणीने विभागीय संमेलनाची सुरू केलेली प्रथा वर्धिष्णु होईल, असा विश्वास वाटतो. संमेलनाचा वृत्तांत याच अंकात अन्यत्र दिला आहे.

या व्यतिरिक्तही ठिकठिकाणी विविध स्तरांवरील साहित्य संमेलने मध्यंतरीच्या काळात झाली. साहित्य-विषयक वाढत्या आस्थेचे हे प्रतीक म्हणावे लागेल. विदर्भ साहित्य संघ, द. म. साहित्य सभा, दलित साहित्य, ग्रामीण साहित्य यांच्या संमेलनांचा अंतर्भाव यात करावा लागेल.

गडचिरोली येथे भरलेल्या ३९ व्या विदर्भ साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना कविवर्य **श्री. सुरेश भट** यांनी वऱ्हाडी साहित्य, ग्रामीण साहित्य, जनसाहित्य अशी लेबले साहित्यास लावण्याला विरोध केला. कवितालेखनाबद्दल ते म्हणाले, 'कवितेचा फैसला शब्द करीत नसतात, तर त्या शब्दांना खऱ्या अर्थाने शब्दपण देणारे विचार व अस्सल जीवनानुभव करीत असतात.' वृत्तयमकांच्या बंधनामुळे गझल रचना कृत्रिम होत असल्याचा आक्षेप त्यांनी अमान्य केला. हा काव्यप्रकार समर्थपणे राबविण्यावर त्याचे यश अवलंबून असल्याचे मत त्यांनी व्यक्त केले. बेळगाव येथे भरलेल्या पाचव्या द. म. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी डॉ. आनंद यादव होते. साहित्य संमेलनांची आवश्यकता प्रतिपादन करताना ते म्हणाले, 'साहित्य संमेलने ही त्या त्या समाजमनाची आत्मपूजा असते.' निरनिराळे मुखवटे धारण करून स्वार्थकेंद्राशी घोटाळत राहणाऱ्या साहित्यिकांपासून व समीक्षकां-पासून दूर राहण्याचा इशारा त्यांनी दिला. ग्रामीण समाज आणि ग्रामीण नेतृत्व यांना साहित्याचे आंतरिक महत्त्व कळलेले नाही, असे सांगून ग्रामीण समाजाचे यथार्थ चित्र उभे करणारी नियतकालिके निर्माण झाली पाहिजेत, यावर त्यांनी भर दिला.

फेब्रुवारी महिन्यात दोन ग्रामीण आणि एक दलित अशी साहित्य संमेलने भरली. माजलगाव येथील ग्रामीण साहित्य संमेलनाचे अध्यक्ष **श्री. मधु मंगेश कर्णिक** यांनी साहित्याच्या निर्मितीचा स्रोत एकच असल्याचे सांगून ग्रामीण, दलित, ख्रिस्ती असे साहित्याचे पोटभाग अमान्य केले. ग्रामीण साहित्यिकांनी आपल्या परिसरात घडत असलेल्या सामाजिक व सांस्कृतिक स्थित्यंतराचे भान ठेवण्याची गरज त्यांनी प्रतिपादन केली. विटा येथील बाराव्या ग्रामीण साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. रमेश मंत्री यांनी मराठी साहित्याचे झपाट्याने होत असलेले व्यापारीकरण व इंग्रजीचा वाढता प्रभाव यामुळे मराठी साहित्याचे भवितव्य संपुष्टात येत चालले असल्याची



अनुक्रमणिका

चिंता व्यक्त केली. सोलापूर येथे भरलेल्या अ. भा. दलित साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. रावसाहेब कसबे आणि उद्घाटक प्राचार्य डॉ. जनार्दन वाघमारे यांच्या भाषणात सध्याच्या दलित साहित्यातील आवर्ताची, साचलेपणाची जाणीव व्यक्त झाली. प्रा. कसबे म्हणाले, 'दलित साहित्याचे आरंभी जे स्वागत झाले, त्याचा परिणाम आता आत्मसंतुष्टतेत झाला की काय, असे वाटू लागले आहे...या आत्मसंतुष्ट वृत्तीने वास्तवाचा विसर पडला आणि आपल्या निर्मितीला केवळ कलेच्या दृष्टीनेच नव्हे, तर जीवनाच्या सर्वस्पर्शी अनुभवाच्या दृष्टीनेही अवरुद्धता आली.' डॉ. जनार्दन वाघमारे यांनी 'विद्रोह हे साहित्यमूल्य होऊ शकत नाही आणि विद्रोहाच्या भावनेत समाज वर्षानुवर्षे राहू शकत नाही' हे स्पष्ट केले. चिंतनाच्या पातळीवरील सामर्थ्यवान साहित्य देण्यासाठी आत्मसंशोधनाची आवश्यकता त्यांनी सांगितली.

## अभिवादन :

ख्यातनाम मराठी लेखिका आनंदीबाई शिर्के यांचे दि. ३१ ऑक्टोबर रोजी पुणे येथे देहावसान झाले. निधनसमयी त्या ९४ वर्षांच्या होत्या. 'मासिक मनोरंजन'च्या लेखिका म्हणून अल्पवयात आणि काळात त्यांनी नाव मिळविले. का. र. मित्र, श्री. कृ. कोल्हटकर, वि. द. घाटे आणि आनंदीबाईंचे पती कै. शिवराम शिर्के यांच्या प्रोत्साहनामुळे त्यांच्या हातून विपुल लेखन झाले. तत्कालीन गद्यशैलीचा प्रत्यय त्यांच्या कथांतून येतो. त्यांनी अनुभवलेल्या सामाजिक जीवनाचा भावाविष्कार झाला असल्यामुळे त्यांच्या कथांना एक आगळेपण प्राप्त झाले आहे. त्यांचा प्रेमविवाह आणि त्यामुळे त्यांच्या वाट्याला आलेले जीवन यांचे चित्रण त्यांच्या 'सांजवात' या आत्मचरित्रात आले आहे. 'शारदाबाईंचे संसारचित्र' ही त्यांची पहिली कथा १९१० मध्ये प्रसिद्ध झाली. 'कथाकुंज' 'जुईच्या कळ्या', 'कुंजविकास', 'भावनांचे खेळ', या पुस्तकांतून त्यांच्या कथा संग्रहित झाल्या आहेत. १९३६ मध्ये माधव जूलियन यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या २१ व्या मराठी साहित्य संमेलनाच्या त्या स्वागताध्यक्ष होत्या. १९३९ मध्ये पुणे येथे भरलेल्या पहिल्या अ. भा. मराठी महिला परिषदेच्या अध्यक्षपदी त्यांची निवड झाली होती. त्यांचे प्रारंभीचे शिक्षण गुजरातीतून व नंतर मराठीतून झाले. गुजरातच्या रविशंकर महाराजांचे चरित्रलेखन आणि पन्नालाल पटेल यांच्या 'मालेला जीव' या गुजराती पुस्तकाचे मराठी भाषांतर त्यांनी सहजतेने केले. १९८५ मध्ये म. रा. साहित्य-संस्कृती मंडळाने आनंदीबाईंच्या साहित्यसेवेबद्दल त्यांचा सत्कार केला होता.

कऱ्हाड येथील थोर स्वातंत्र्यसैनिक समाजभूषण पद्मश्री पुरुषोत्तम पांडुरंग तथा बाबूराव गोखले यांचे दि. ५ डिसेंबरला वयाच्या ८९ व्या वर्षी पुणे येथे निधन झाले. राजकीय, सामाजिक, शैक्षणिक आणि सहकाराच्या क्षेत्रात आपल्या कर्तृत्वाचा ठसा त्यांनी उमटविला होता. स्वातंत्र्य लढ्यातील बाणेदार, निःस्पृह आणि चारित्र्यसंपन्न देशभक्त म्हणून त्यांची ख्याती होती. कऱ्हाड येथील शिवाजी शिक्षण संस्थेचे संस्थापक, 'समर्थ', 'पुरुषार्थ' इ. नियतकालिकांचे संपादक, ग्रंथालय चळवळीचे अध्वर्यू, जिल्हा सहकारी आणि भूविकास बँकांचे संचालक, कऱ्हाड साहित्यसेवा मंडळाचे प्रवर्तक, काँग्रेस कमिटीचे चिटणीस अशा बहुविध नात्यांनी त्यांनी केलेले कार्य संस्मरणीय आहे. समर्थ रामदासांचे वाङ्मय आणि कार्य याचा त्यांचा विशेष व्यासंग होता. 'आगरकर चरित्र', 'रामदासांचा जीवनबोध', 'जागृत सातारा', 'समर्थ रामदास', इ. त्यांचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. जळगाव येथील महाराष्ट्र ग्रंथालय परिषदेचे ते अध्यक्ष होते. आपल्या व्यासंगपूर्ण आणि प्रभावी वक्तृत्वाने त्यांनी एक कालखंड गाजविला होता.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी कोषाध्यक्ष डॉ. न. का. घारपुरे दि. ५ नोव्हेंबर रोजी कालवश झाले. मृत्यूसमयी ते ८२ वर्षांचे होते. फर्ग्युसन महाविद्यालयात ते जर्मन विषयाचे माजी प्राध्यापक होते. पुणे महापालिका, हरिकीर्तनोत्तेजक सभा, आरोग्य सेवा मंडळ आदी अनेक संस्थांचे ते पदाधिकारी होते. पुण्याच्या सरस्वती मंदिर संस्थेचे ते अध्यक्ष होते. त्याच संस्थेच्या पूना इंग्लिश स्कूलला 'डॉ. न. का. घारपुरे प्रशाला' असे नाव देण्यात आले आहे. डॉ. घारपुरे यांनी विविध विषयांवर पुस्तके लिहिली. अलीकडेच त्यांचे आत्मचरित्रही प्रसिद्ध झाले होते. म. सा. प. च्या वार्षिक सभांना ते आवर्जून उपस्थित राहत.

'सुदर्शन' मासिकाचे संपादक आणि कथाकार द. का. हसमनीस यांचे पुणे येथे दि. ११ नोव्हेंबर रोजी निधन झाले. श्रीमती राधाबाई आपटे या वयाच्या ८८ व्या वर्षी दि. २९ डिसेंबर रोजी निधन पावल्या. त्यांच्या 'उमटलेली पावले' या पुस्तकास राज्य पुरस्कार लाभला होता. मराठी रंगभूमी, चित्रपट आणि दूरदर्शन या तिन्ही माध्यमातून अभिनेते व दिग्दर्शक म्हणून गाजलेले श्री. अरविंद देशपांडे यांचे मुंबई येथे दि. ३ जानेवारीस निधन झाले. ते ५५ वर्षांचे होते. विदर्भ साहित्य संघाच्या 'युगवाणी' या नियतकालिकाचे माजी संपादक आणि सुप्रसिद्ध कवी तु. ना. काटकर यांचे दि. १५ नोव्हेंबर रोजी चंद्रपूर येथे देहावसान झाले. ते ७८ वर्षांचे होते. 'आद्य कवी मुकुंदराज', 'मृत्युंजय मार्कंडेय' आदी ग्रंथ त्यांनी लिहिलेले आहेत. सुप्रसिद्ध विनोदी साहित्यिक, नाटककार डॉ. अ. वा. वर्टी हे नाशिक येथे दि. २ फेब्रुवारी रोजी ७५ व्या वर्षी निधन पावले. 'अमृत' आणि 'श्रीदुत' या मराठी डायजेस्टचे संपादक आणि 'राणीचा बाग' या नाटकाचे कर्ते म्हणून ते विख्यात होते.

या सर्वांच्या स्मृतींस आम्ही नम्र अभिवादन करतो.

...आणि अभिनंदन :

मराठीतील व्यासंगी समीक्षक आणि पुणे विद्यापीठाचे माजी मराठी विभाग प्रमुख डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी वयाची ७५ वर्षे पूर्ण केली. म. सा. परिषदेचे अध्यक्ष, कार्याध्यक्ष, म. सा. पत्रिकेचे संपादक अशा विविध नात्यांनी परिषदेच्या कार्याशी ते निगडित होते. एक सिद्धहस्त लेखक आणि वक्ते म्हणून त्यांची ख्याती आहे. मराठी साहित्य रसिकांच्या प्रेमाचा आणि आदराचा विषय असलेले आणि आपल्या ओजस्वी काव्याने एका पिढीच्या स्वातंत्र्य आणि क्रांतिभावनांचे प्रेरणास्रोत बनलेले कविवर्य कुसुमाग्रज (वि. वा. शिरवाडकर) यांचा अमृत महोत्सव यावर्षी साजरा होत आहे. मडगाव येथे त्यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या साहित्य संमेलनात दहा हजाराहून अधिक श्रोत्यांच्या उपस्थितीने त्यांच्या विषयीचा ममत्वभाव व्यक्त केला होता. रसिकता, शालीनता आणि निःस्पृहता हे त्यांच्या व्यक्तित्वाचे विशेष आहेत. काव्य आणि नाटक या क्षेत्रातील त्यांचे स्थान निर्विवाद आहे. कादंबरी, समीक्षा, ललित लेखन आणि पत्रकारिता यांनी त्यांची साहित्यसंपदा सगुणसंपन्न बनलेली आहे. विलिंग्डन महाविद्यालयातील इंग्लिश विभाग प्रमुख आणि मराठीतील प्रसिद्ध समीक्षक प्रा. म. द. हातकणंगलेकर यांच्या वयास दि. १ फेब्रुवारीस साठ वर्षे पूर्ण झाली. इंग्लिश आणि मराठी साहित्याचा त्यांचा व्यासंग आणि मराठी समीक्षेतील त्यांचे योगदान सर्वश्रुत आहे.

द्वैत (माध्व) तत्त्वज्ञानाचे एक गाढे अभ्यासक वे. शा. सं. पंडित रामाचार्य अवधानी यांच्या वयाची ८१ वर्षे पूर्ण होत असल्याने, 'सहस्रचंद्रदर्शन' चा सोहोळा पुणे येथे झाला. पंडीत अवधानी यांनी माध्व संप्रदायाच्या प्रचारार्थ 'द्वैत सिद्धान्त केसरी' नामक मासिक सुमारे ३० वर्षे चालविले. 'मध्वाचार्य आणि त्यांचे तत्त्वज्ञान' या त्यांच्या ग्रंथाव्यतिरिक्त, मध्वाचार्यांनी लिहिलेल्या अनेक पुस्तकांची त्यांनी मराठीत भाषांतरे केली आहेत. श्रीमद्भागवत या महान ग्रंथाचे संपूर्ण मराठी भाषांतर त्यांनी केले असून, ते दोन खंडात प्रसिद्ध झाले आहे. वयाच्या ८० व्या वर्षी विजयध्वनी श्रीमद्भागवत या ग्रंथाची संशोधित मूळ संहिता पोथी स्वरूपात त्यांनी प्रसिद्ध केली आहे. या वयातही त्यांचे वाचन, प्रवचन, लेखन व माध्व तत्त्वज्ञानाच्या प्रसाराचे काम पूर्वीच्याच उत्साहात चालू आहे.

आम्ही या सर्वांना निरामय दीर्घायुष्य इच्छितो आणि त्यांचे अभिनंदन करतो.

कोल्हापूर येथील मराठीचे नामवंत प्राध्यापक आणि समीक्षक डॉ. बु. का. संत यांना शिवाजी विद्यापीठाने डी. लिट्. हा बहुमान प्रदान केला आहे. डॉ. संत हे मराठीतले तिसरे व शिवाजी विद्यापीठातील पहिले डी. लिट्. पदवीधारक आहेत. डॉ. संत यांचे आम्ही अभिनंदन करतो.

— संपादक

## महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी सांप्रतच्या कार्यकारी मंडळाने साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना यावर्षी हाती घेतली आहे. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता साहित्यप्रेमी जनतेने व्यक्त करावी, असे आवाहन यापूर्वीच करण्यात आले आहे. या आवाहनाला उत्तम प्रतिसाद मिळत आहे, हे नमूद करण्यास आनंद होतो.

दि.२०–३–१९८७ पर्यंत साहित्य परिषदेकडे जमा झालेल्या देणग्यांचा तपशील मागील पानावर दिला आहे.

या अपूर्व उपक्रमाचे महत्त्व आणि आवश्यकता ओळखून या निधीसाठी सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे' या नावाने पाठवावी, अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल आणि देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

आपले

| शंकर पाटील | राजेंद्र बनहट्टी | गं. ना. जोगळेकर |
|---|---|---|
| अध्यक्ष | कार्याध्यक्ष | कोषाध्यक्ष |

राजा फडणीस, म. वि. गोखले, प्रभाकर अत्रे
कार्यवाह

अनुक्रमणिका



# साहित्यिक साहाय्य निधी

दि. २०–३–१९८७ पर्यंत साहित्यिक साहाय्य निधीसाठी साहित्य परिषदेकडे आलेल्या देणग्यांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| देणगीदाराचे नाव | रक्कम रु. | देणगीदाराचे नाव | रक्कम रु. |
|---|---|---|---|
| श्री. सतीश प्रधान, ठाणे | ५०००–०० | श्री. म. ना. अदवंत, पुणे | १०१–०० |
| (प्रबोधनकार ठाकरे स्मृत्यर्थ) | | श्री. वसंत स. जोशी, वाई | १०१–०० |
| श्री. विद्याधर गोखले, मुंबई | १००१–०० | श्री. हेमंत जुन्नरकर, पुणे | १०१–०० |
| श्री. शंकर पाटील, पुणे | १००१–०० | श्री. चंद्राताई शेणोलीकर, तासगाव | १०१–०० |
| श्री. राजेंद्र बनहट्टी, पुणे | १००१–०० | श्री. चंद्रकांत वांदिवडेकर, पुणे | १०१–०० |
| श्री. नवनीतलाल गांधी, पुणे | १००१–०० | श्री. अ. म. जोशी, पुणे | १०१–०० |
| श्री. ए. व्ही. भट, पुणे | १०००–०० | श्री. स. वा. कोगेकर, पुणे | १०१–०० |
| श्री. संजीवनी मराठे | १०००–०० | श्री. जि. व्यं. देशपांडे, पुणे | |
| (कै. चिं. गं. मराठे स्मरणार्थ) | | (दा. व्यं देशपांडे स्मृत्यर्थ) | १०१–०० |
| श्री. राजा फडणीस, पुणे | ५०१–०० | श्री. क. मो. कंधारी, पुणे | १०१–०० |
| श्री. प्रमोद बापट, पुणे | ५०१–०० | श्री. वामन हरि देशपांडे, पुणे | १०१–०० |
| श्री. अभय पाठक, पुणे | २५१–०० | श्री. भीमराव कुलकर्णी, मुंबई | १०१–०० |
| श्री. वसंत दीक्षित, अहमदनगर | १५१–०० | श्री. अनंत मोरेश्वर ओक, पुणे | १०१–०० |
| श्री. शकुंतला विनायक कापरे, पुणे | १२५–०० | श्री. सुभाष आरवडे, सांगली | १०१–०० |
| श्री. यदुनाथ थत्ते, पुणे | १०१–०० | श्री. सु. रा. चुनेकर, पुणे | १०१–०० |
| श्री. ग. वि. चावरे, पुणे | १०१–०० | श्री. अरविंद गजेंद्रगडकर, पुणे | १०१–०० |
| श्री. वि. ना. थत्ते, औरंगाबाद | १०१–०० | श्री. आ. ना. नारळकर, पुणे | १००–०० |
| श्री. वा. रा. सोनार, अमळनेर | १०१–०० | श्री. द. गो. गोरे, पुणे | ५१–०० |
| श्री. गं. ना. जोगळेकर, पुणे | १०१–०० | सौ. माया द. गोरे, पुणे | ५१–०० |
| श्री. मंदाकिनी खांडेकर, कोल्हापूर | १०१–०० | श्री. व्ही. बी. राव, पुणे | ५१–०० |
| श्री. लीला गोविलकर, अहमदनगर | १०१–०० | डॉ. गोवर्धन शाह, धुळे | ५१–०० |
| श्री. म. वि. गोखले, पुणे | १०१–०० | श्री. अमन तांबोळी, गोंदवले ।।बु।। | ५१–०० |
| श्री. प्रभाकर अत्रे, डोंबिवली | १०१–०० | श्री. दु. का. संत, कोल्हापूर | ५१–०० |
| श्री. गो. म. कुलकर्णी, पुणे | १०१–०० | श्री. मो. रा. वाळंबे, पुणे | २५–०० |
| श्री. रा. वा. अवधानी, पुणे | १०१–०० | श्री. ल. गो. जोशी, पुणे | २१–०० |
| श्री. रमाकांत ग. मोदी, पुणे | १०१–०० | श्री. किसन बंडूबाबा होळकर, सांगोला | ११–०० |

एकूण रक्कम रु. १५७२३–००

अनुक्रमणिका

# गुरुदेव रानडे यांचे साहित्यशास्त्र / गो. रा. कामतकर

'कुन्देन्दु तुषार हारधवला' अशी सरस्वती खरे तर 'स्वरस्वती' आहे असे 'काव्यचंद्रिका' म्हणते आणि तिचा जयजयकार करताना ही 'कविकृतलीला जगदनुरंजनशीला' आहे असेही ती आवर्जून सांगते. मम्मटाने म्हटल्याप्रमाणे 'काव्यंयशसेऽर्थ कृते' अशी विविध उद्दिष्टे समोर ठेवून सरस्वतीची प्रार्थना करणारे तिचे उपासक अनेक असतात. जनकाने याज्ञवल्क्यास भर दरबारात विचारलेला प्रश्न सर्वश्रुत आहे. राजा म्हणतो, "भगवन्, आपण ह्या सहस्र धेनू आणि त्यांच्या शिंगांना बांधलेल्या सुवर्ण मुद्रिकांनी भरलेल्या पिशव्या मिळविण्यासाठी आला आहात, की ह्या विद्वज्जनसमेत ह्या पंडितांना वादात जिंकून विजयश्री प्राप्त करून घेण्यासाठी आला आहात ते मला सांगा!" याज्ञवल्क्य उत्तरले, "उभयमेव, राजन! गायी, नाणी व विजयश्री मिळवावीत म्हणून मी इथे उपस्थित झालो आहे!" ही सर्वंकष जीवनदृष्टी, काव्य, शिल्प, चित्र वा नृत्यगायनादी सर्वच ललितकलांच्या संदर्भात लक्षणीय आहे. यश, प्रीती आणि व्युत्पत्ती हीच खरी काव्य-प्रयोजने होत असे सांगून हेमचंद्र म्हणतो की, यश हे कवीचे प्रयोजन तर प्रीती व व्युत्पत्ती ही रसिकांची प्रयोजने. प्रीती म्हणजे आनंद हा तर 'सकल-प्रयोजन-मौलिभूत.' तर व्युत्पत्तीचा संबंध रस व भाव यांच्याशी. आनंद म्हणजे केवळ इंद्रियजन्य सुख नव्हे. किंबहुना वैषयिक प्रेम हे ललितकलांचे ध्येय नसावे. मृदंगाच्या बोलांतून कवी हेच सुचवितो...

> "धिक् तान्, धिक्, तान् धिगेतान्
> कथयति नितरां कीर्तनस्थो मृदंगः।"

ईश्वराचे वैभव व मनुष्याची प्रगती हेच कलेचे ध्येय असावे असे बेकन मानतो. 'परतत्त्वस्पृष्टं रसात्मकं वाक्यं काव्यम्।' हेच खरे काव्यलक्षण होय. अभिनवगुप्ताचा रससिद्धांत शिरोधार्य मानून काव्यनिर्मिती करणाऱ्या श्रीज्ञानदेवांची साक्षही अशीच आहे. ते म्हणतात,

> "वाचे बरवे कवित्व। कवित्वी रसिकत्व।
> रसिकत्वी परतत्त्व। स्पर्शु जाणे॥"...

आणि म्हणूनच ग्रंथरचनेच्या प्रारंभी अभिनव वाग्विलासिनी व चातुर्यकलाकामिनी अशी जी विश्वमोहिनी शारदा तिला नमन करून ते प्रतिज्ञोत्तर सांगतात,

> 'तेणे कारणे मी बोलेन
> बोली अरुपाचे रूप दावीन
> अतींद्रिय परि भोगवीन। इंद्रियाकरवी॥'...

जो विषय केवळ ज्ञानाच्या दिठीने जाणावयाचा त्याला शब्दांमध्ये बांधून टाकण्याचा प्रयत्न करताना ज्ञानदेवांच्या शब्दांना मंत्रशक्तीची कळा प्राप्त होते. अध्यात्मविवरणामध्ये तर्कशास्त्राचा आधार न घेता अंतःप्रतीतीचा आधार घेणाऱ्या कवीला आणि शास्त्र किंवा वेद यांच्या प्रामाण्यापेक्षा आत्मप्रचीतीला प्रमाण मानणाऱ्या साक्षात्कारी संताला स्वतःचा वेगळा मार्ग शोधावा लागतो. विश्वात्मक अनुभूतीतून स्फुरण पावलेल्या ज्ञानेश्वरीला जसा आत्मरूप परिचय स्वतःच करून द्यावा लागला आणि त्याबरोबरच रसास्वादाची प्रक्रिया व पद्धतीही विशद करून सांगावी लागली, तशी सर्वच साक्षात्कारी संतांना जुनी मळलेली वाट सोडून नवी पायवाट तयार करावी लागते. आंग्ल-कवी ब्लेकने हा मार्ग कसा अटळ असतो हे स्पष्ट करताना म्हटलेच आहे की,

> "I must create my system
> or be enslaved by another man's
> I will not reason, compare,
> my business is to create..."

डॉ. केतकरांनी 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण' करताना 'रामदासांचे साहित्यशास्त्र' असा एक शब्दप्रयोग बनविला होता. श्रीगुरुदेव रानडे यांच्यासारख्या 'रहस्यदर्शी' समीक्षकाच्या ग्रंथांचा अभ्यास करतानाही आपल्याला पदोपदी जाणवते की त्यांचे स्वतःचे असे एक

स्वतंत्र साहित्यशास्त्र असावे. कारण भौतिकतेतून दिव्यत्वाकडे, पार्थिवातून अपार्थिवाकडे आणि लौकिक प्रत्यक्षातून अलौकिक प्रत्यक्षाकडे लीलया क्षेप घेणाऱ्या त्यांच्या प्रतिभेने प्रकट केलेली अनुसर्जनशीलता मनाला स्तिमित करणारी आहे. सांताकडून अनंताकडे चाललेल्या तिच्या अखंड प्रवासात कधी औपनिषदिक तत्त्वज्ञानाचे सर्वेक्षण, तर कधी भगवद्‌गीतेतील विश्वरूपाचे दर्शन; क्वचित एखाद्या चिमुकल्या काजन्याचे प्रकाश-प्रक्षेपण तर क्वचित 'यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतर पश्यति।'...या संवादातून 'इव' (जणू काय) या तत्त्वाचे प्रस्फुरण, असा सर्वत्र सच्चिदानंदाचा चिद्‌विलास चाललेला दिसतो– अनंतत्वाचा नट-नाच चाललेला दिसतो. जणू पंख पसरलेल्या रथात आरूढ होऊन ती 'चिद्‌घनचपला' या विश्वगोलाचा केन्द्र-बिंदू शोधू पाहते. आणि एखाद्या द्रष्ट्याच्या आर्ष वाणीने उद्‌घोषित करते : "The Universe is but an infinite circle with its centre everywhere and circumference nowhere !"...हा रुद्र स्वर कानी येताच आपली खात्री पटते की, गुरुदेवांचे साहित्यशास्त्र म्हणजे त्यांच्या अंतःकरणाच्या गाभ्यातून आळविलेला 'निजराग' आहे. संगीतकला व आध्यात्मिक अनुभव यांचा एकत्र समन्वय करू शकणाऱ्या संतांना 'रागी संत' म्हणता येईल. 'रागी' हा शब्द 'राग' (अनुराग) म्हणजे प्रेम या शब्दापासून साधला आहे. रागी संताचे अंतःकरण प्रेमाने, भक्तीने तुडुंब भरलेले असते. अशा रागी संताच्या अंतःकरणामधून हा 'निजराग' निर्माण होत असतो.

एका वाङ्मयीन सिद्धांताच्या आधारे ह्या 'निजरागा' चे स्वरूप गुरुदेवांनी एके ठिकाणी स्पष्ट केले आहे. मूळ प्रमेय मांडताना ते सांगतात : "It is very true that an unreal thing may produce a real effect..." म्हणजे व्यावहारिक दृष्ट्या एखादी गोष्ट असत्य वा अवास्तव असली तरी तिचा परिणाम वास्तवाचा अनुभव देणारा असतो. तिच्या खोटेपणामुळे प्रतीत होणारे वाङ्मयीन सत्य शबल होत नाही. याचा अर्थच असा की, ऐतिहासिक अवास्तवता आणि काव्यात्मक वास्तवता एकत्र नांदू शकतात. इतकेच नव्हे, तर त्यांच्या युतीतून साधणारा परिणाम वा येणारा अनुभव म्हणजे एक संपूर्ण सत्य असू शकते. अशा ठिकाणी सत्य आणि कल्पित यांना विभागणारी रेषा अगदी सूक्ष्म आणि नाजूक असते. कोण्या एका फार मोठ्या व्यक्तीची अशीच एक करुण कहाणी वाचत असताना कशी दयनीय अवस्था झाली आणि त्याचा हळवेपणा पाहून आपल्याला कसा मोठा धक्का बसला ह्याबद्दल एक आठवण गुरुदेव सांगतात. ते म्हणतात, "त्यांचे डोळे अश्रूंनी थबथबले होते. त्यांचा कंठ दाटून आला होता. आणि त्यांना पुढे एक अक्षर देखील वाचता येईना." अशा हळव्या भावविवशतेला तुम्ही काय म्हणाल बरे ? कदाचित तुम्ही हा दुबळेपणा म्हणाल. आणि ते बरोबरच आहे. पण मला विचाराल तर मी हे त्यांचे शक्तिकेन्द्र आहे असे म्हणेन. खरे तर हेच त्यांचे बळ आहे हे आपण ओळखले पाहिजे. अशी माणसेच भावनांची अति सूक्ष्म स्पंदने किंवा कंपने जाणू शकतात. भक्तीचा वसा घेणारे, 'करुणेमाजि पाऊले' रोवून चालणारे, मऊ मेणाहूनही असणारे हे 'विष्णुदास' च व्यास-वाल्मीकींच्या रूपाने अवतरतात. तेव्हा त्यांच्या वाणीतून 'निजराग' आळविला जातो. आणि 'रसो वै सः।' म्हणून रसिक तृप्त होतात. सार्त्र म्हणत असे की. 'मला शब्द दिसत नाहीत. दोन शब्दांतील कोरी जागाच फक्त दिसते.' खरोखरच त्याचे आत्मचरित्र म्हणजे त्याच्या अंतःकरणाच्या गाभ्यातून अंतरात्म्याने आळविलेला 'निजराग' आहे असे म्हणावयास काय अडचण आहे ?

हृदयाच्या राऊळातून उमटलेला असा 'निजराग' कोणी 'रागी' संताने छेडलेला तुम्हाला ऐकावयाचा असेल तर या असे आमच्या सांगाती. वेळ अशी सकाळची. पंच पंच उषःकालची. स्वच्छ गोमयाने सारवलेली निबाळची छोटीशी खोली. खुंट्यांवरून घुतलेले दोन-चार सदरे व धोतरे आणि खाली जमिनीवर बसलेली, धौतवस्त्र नेसलेली व अंगात घुतलेला साधा सदरा घातलेली कृश पण सहज प्रशांत अशी श्रीगुरुदेवांची तपोमूर्ती. या व्यतिरिक्त अन्य कोणतीही वस्तू त्या खोलीत नाही. अलाहाबाद विद्यापीठाचे उपकुलगुरू असलेल्या एका योग्याची ही मठी आहे. वाचनासाठी अगर मननासाठी जवळ एखादे पुस्तक नाही. ध्यानासाठी कुणा देव-देवतेची प्रतिमा नाही किंवा बसायला साधे आसनही नाही. जणू प्रयागच्या त्रिवेणी संगमातील गुप्त सरस्वतीच इथे श्रीगुरुदेवांच्या 'शांताकार' स्वरूपात प्रकटली आहे, असे वाटावे. 'योगिया दुर्लभ' असे ते आत्मतृप्त, आत्मक्रीड व आत्मरत दर्शन होते. अशा त्या योग्याची सहचारिणी

बनलेल्या त्या खोलीच्या भिंतींनी ऐकली असतील कधी ब्रह्मसूत्राची आवर्तने.

'प्रकाशादिवच्चा वैशेष्यं प्रकाशश्च कर्मण्यभ्यासात् ।', तर कधी उपनिषदांची पारायणे–

'योऽसावसौ पुरुषः सोहमस्मि ।'
क्वचित गीताश्लोकांचे पठण–
मच्चितः सर्व दुर्गाणि
मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारात्र श्रोष्यसि
विनक्ष्यसि ॥"

तर क्वचित वेदातील ऋचांचे सामगान–

'ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा
भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।'...

मननाच्या गुहेत बसून वेद-उपनिषदे, गीता-ब्रह्मसूत्रे यावर अहोरात्र चिंतन करणाऱ्या या साक्षात्कारी संताने समाधी-सुखात दंग असता कधी आत्यंतिक करुण सुरात आळवलेले तर कधी आनंदाच्या कल्लोळात डुंबत असल्याप्रमाणे सुरेल आवाजात गायलेले 'नारायण, नारायण' असे शब्द कानी यावेत आणि साऱ्या श्रुती धन्य व्हाव्यात ! अर्जुनाला कृष्णदर्शन झाल्यावर त्याची जी अवस्था झाली असेल तीच गुरुदेवांच्या वाणीतून बाहेर पडलेल्या नारायणनामाच्या गजराने साऱ्या निंबाळ-आश्रमाची होत असे.

भगवान बुद्धासारखे लोक निर्वाणपदाला पोचल्यानंतर 'गृहकारक दिट्ठोसी ।' असे कृतार्थ होऊन म्हणतात. पण हे उद्गार काढून ते तिथेच थांबत नाहीत. उलट 'कलि-कलुषकृतानि यानि लोके मयि निपतन्तु विमुच्यतां हि लोकः ।' असा कृतसंकल्प ते प्रकट करतात. गुरुदेव रानडे किंवा महायोगी श्री अरविंद हे याच मालिकेतील महामानव होते हे विसरून चालणार नाही. त्या 'रहस्य नारायणा' ला ओळखून आपल्या कवेत घेतल्यानंतर आपल्याला आलेले अनुभव आपल्यापुरतेच बंदिस्त करून न ठेवता वेदोपनिषदांच्या माध्यमातून, ऋषिमुनींच्या शब्दांतून किंवा साधुसंतांच्या पवित्र वाणीतून जनसामान्यांपर्यंत नेऊन पोचवावेत, स्वर्ग या धरित्रीवर आणावा व देवांचे राज्य या पृथ्वीवर निर्माण करावे, यासाठी ते आपल्या जीवाचा आटापिटा करीत राहातात. याचसाठी वैदिक धर्मातून लुप्तप्राय झालेली प्राचीन संस्कृतीबीजे नव्याने गोळा करावीत आणि जलप्रलय ओसरल्यावर मनूने जशी आपल्या होडीत सुरक्षित ठेवलेली बी-बियाणे काढून त्यांची नव्याने पेरणी केली आणि नवी जीवसृष्टी निर्माण केली तशी नवसंस्कृती निर्माण करावी, नवजागरण घडवावे, आध्यात्मिक प्रबोधन करावे यासाठीच गुरुदेवांनी जुन्या धर्मग्रंथांचे आलोडन करून नवी ग्रंथसृष्टी निर्माण केली. महायोगी अरविंद यांच्या 'सावित्री' वरील शोध-निबंधात लेखिकेने म्हटल्याप्रमाणे :

"The traditional or scriptural foundations of this new evolutionary leap were explored by a fresh study of the Vedas, the Upanishads and the Gita and the results were given out as translation, commentary & interpretation." (Savitri : Prema Nand Kumar. P. 338)

'वस्तू' च्या दर्शनातून झालेले प्रत्यक्ष ज्ञान धर्मसिंधूतून किंवा पोथ्या-पुराणांतून होणाऱ्या शब्द-ज्ञानापेक्षा कितीतरी पटीने श्रेष्ठ, अधिकृत व मौलिक असणार हे उघड आहे. तरीही गुरुदेवांसारख्या ज्ञानयोगी संतांना एखादा मूलभूत क्रांतिकारक असा मोक्षासंबंधीचा विचार मांडावयाचा असतो किंवा ईश्वरविषयक सिद्धांत प्रस्थापित करावयाचा असतो, तेव्हा तो विचार वा सिद्धांत रूढ धर्माच्या चौकटीत किंवा सामाजिक आचार संहितेच्या मर्यादेत राहूनच सांगावा लागतो. कारण ईश्वरविषयक क्रांतिकारक विचार व जहाल कल्पना घरगुती वळण न सोडता प्रथम 'माणसाळाव्या' (domesticate) लागतात. त्यामुळे 'मार्गाधारे वर्तावे' हे ज्ञानदेवांचे पथ्य सर्वांनाच पाळावे लागते. 'अलौकिक नोहावे लोकांप्रती' हा दंडक सार्वकालिक आहे. 'सकळ धर्मसंस्था रक्षणीय' म्हणून जुन्या धर्मग्रंथांना तिलांजली देऊन व पोथ्या-पुराणांना बासनात गुंडाळून ठेवून नवे धर्मग्रंथ निर्माण करण्याचा संतांनी कधीच प्रयत्न केला नाही. धर्मप्रबोधन तर करावयाचे पण ते जुन्या धर्मग्रंथांच्या पुनर्मांडणीतून. जुन्या पोथ्यापुराणांतून नवे अर्थबोधन करावयाचे. मूळ चौथरा कायम ठेवायचा आणि वर नवे मंदिर उभे करावयाचे म्हणजे 'There is no displacement of scripture. There is only re-interpretation' हे सूत्र श्रीगुरुदेवांच्या सर्व ग्रंथरचनेचे व पर्यायाने त्यांच्या साहित्यशास्त्रविषयक विचारांचे प्राणतत्त्व आहे. या चौकटीत श्रीगुरुदेव विरचित टीका-टिप्पणी व भाष्ये-महाभाष्ये










यांचा अभ्यास करताना खालील निष्कर्ष साररूपाने काढता येतात.

अ) जुने तत्त्वज्ञान, जुने सिद्धांत आणि जुनी शिकवण नव्या पेहरावात, नव्या वेषभूषेत मांडण्याचा प्रयत्न म्हणजे The old teachings in a new guise. औपनिषदीय तत्त्वज्ञानाची रचनात्मक प्रेक्षा, भगवद्गीता म्हणजे साक्षात्काराचे तत्त्वज्ञान, आणि वेदान्त : भारतीय तत्त्वज्ञानाचा कळसाध्याय हे श्रीगुरुदेवांचे ग्रंथ या संदर्भात लक्षणीय आहेत.

ब) आचार्यांच्या किंवा भाष्यकारांच्या सिद्धांतांचे किंवा संतांच्या साक्षात्कार दर्शनाचे स्वानुभवाधिष्ठित मंडन म्हणजेच Personal confirmation of existing order. हिंदी, कानडी व मराठी संतांचे पारमार्थिक अनुभव संकलित करून त्यावरून साक्षात्काराच्या सिद्धांताचे पुनर्स्थापन व पुनर्मूल्यांकन.

क) पारंपरिक संप्रदायांच्या तत्त्वांचे व शिकवणुकीचे तर्कशास्त्रदृष्ट्या सुसंगत विस्तारीकरण म्हणजे A legitimate extension of traditional teaching निंबर्गी संप्रदाय, नाथ संप्रदाय, वारकरी संप्रदाय तसेच ग्रीक, बौद्ध, जैन व वैदिक तत्त्वज्ञान यांचा अभ्यास.

ड) नवे अधिकृत धर्मपीठ वा व्यासपीठ निर्माण करून गुप्त झालेल्या भक्तीच्या फल्गु नदीचा प्रवाह शोधण्याचा प्रयत्न. निंबाळ आश्रमाची स्थापना म्हणजे ज्या कुलुपाची किल्ली हरवली आहे अशा अध्यात्ममंजुषेचे कुलूप खोलण्याचाच प्रयत्न होता. (A new but authoritative stage of tradition.)

* * *

साहित्यशास्त्राचे जुने नाव अलंकारशास्त्र. रस,रीती, गुण, वक्रोक्ती इत्यादींचा अंतर्भाव या अलंकारशास्त्रातच होई. गुरुदेवांनी आपल्या हिंदी ' परमार्थ सोपाना'त " Contribution to the Science of Rhetoric in Paramartha Sopan. " ह्या नावाचा एक प्रबंध लिहिलेला उपलब्ध आहे. ह्या अभ्यासपूर्ण ग्रंथात शब्दशक्तीपासून रसव्यवस्थेपर्यंत काव्यशास्त्रातील सर्व मुद्द्यांचा परामर्श त्यांनी घेतलेला आढळतो. जिथे गुरुदेवांनी आपल्या मतांचे सुस्पष्ट प्रतिपादन केलेले आहे, तेवढ्याच स्थळांचा सूत्ररूपाने इथे आढावा घेतला आहे. अभिधा, लक्षणा आणि व्यंजना या शब्दांना अर्थ प्राप्त करून देणाऱ्या तीन शक्तींचा परिचय करून देताना गुरुदेवांनी व्यंजनेला प्राधान्य देऊन तिला अर्थप्रक्रियेची मूलभूत शक्ती मानले आहे. "In our opinion, व्यंजना is the most fundamental process, even though it was not so recognised for a long time." असे स्वच्छ मत गुरुदेवांनी नोंदविले आहे. ध्वनिसंप्रदायाचे आद्यप्रवर्तक आनंदवर्धन व अभिनवगुप्त यांनी व्यंजनेला अर्थप्रक्रियेची स्वतंत्र शक्ती मानले याबद्दल गुरुदेव त्यांची प्रशंसा करतात. तरीही 'काव्यस्यात्मा ध्वनि:।' असे मानणाऱ्या आनंदवर्धनाच्या पुढे एक पाऊल टाकून साक्षात्कार-शास्त्रातील 'स्फोटा'चा व अलंकार-शास्त्रातील 'ध्वनी'चा अन्योन्य संबंध गुरुदेव स्पष्ट करतात तेव्हा अध्यात्माच्या पातळीवरून व्यंजनेचा एक नवा पैलू आपल्या ध्यानात आणून देतात. इथे गुरुदेवांच्या साक्षात्कारी समीक्षेचे दर्शन आपल्याला अंशत: घडते.

ध्वनिप्रकारात रसध्वनी, अलंकारध्वनी आणि वस्तुध्वनी असे तीन प्रकार मानण्यात आले आहेत. त्यात 'वस्तुध्वनी'ला नाट्यशास्त्राने अगदी गौणस्थान दिल्याबद्दल गुरुदेव नाराजी व्यक्त करतात. नाटकात 'वस्तू' म्हणजे केवळ नाटकाची गोष्ट किंवा संविधानक इतकाच मर्यादित अर्थ असतो हे खरे; पण हे स्पष्ट करताना 'वस्तू'ला असलेला आध्यात्मिक अर्थ नाट्यशास्त्राने दुर्लक्षिला ह्याची खंत त्यांना वाटते. साहित्यशास्त्रात वस्तुध्वनीला अगदी खालच्या पातळीवरचे स्थान देण्यात आले असले तरी अध्यात्मशास्त्रात वस्तुध्वनीला सार्वभौम पद दिले पाहिजे असा आग्रह गुरुदेव धरतात.

रस व भाव यांचा अन्योन्य संबंध परस्परांना पोषक व पूरक आहे हे प्राचीन पंडितांनी अचूक हेरले याबद्दल " a great psycho-rhetorical achievement " अशा शब्दांत गुरुदेव त्यांची वाखाणणी करतात. मात्र जगन्नाथ पंडिताने 'रसो वै स:' हे वचन कसे चुकीच्या संदर्भात उद्धृत केले आहे हे दाखवून हे श्रुतीवचन केवळ काव्यसिद्धांताच्या पुष्ट्यर्थ खर्ची घालण्यात जगन्नाथाने मोठीच अप्रयोजकता दाखविली असे ते परखड शब्दात सांगतात. 'रस-नारायण' हा काव्यातील रसापेक्षा किती श्रेष्ठ आहे, हे स्पष्ट करताना मोठ्या अभिनिवेशाने गुरुदेव उद्गारतात, " The Rasa of poetry and even of spiritual poetry is but a faint echo of Rasa as God. "

मम्मटाच्या ऐतिहासिक सूत्रात शांतरसाला त्याने रसव्यवस्थेत नवव्या क्रमांकावर स्थान दिले याबद्दल गुरुदेवांची मोठीच तक्रार आहे. ते सूत्र असे :

" निर्वेदस्थायिभावोऽस्ति शांतोऽपि नवमो रसः। " गुरुदेव अट्टाहासाने सांगतात की रसव्यवस्थेत शांतरसाला स्वतंत्र स्थानच मिळाले पाहिजे. तसेच 'निर्वेदः स्थायिभावः' हा पाठ चुकीचाच नव्हे, तर अगदी पोरकटपणाचा आहे असेही त्यांना वाटते. त्यांच्या मते 'निर्वेदस्थायिभावः' हा बहुव्रीही समासच केला पाहिजे. शांतरसाचा स्थायिभाव 'निर्वेद' न मानता 'समता' किंवा 'समाधान' मानणेच अधिक समर्पक ठरेल, असेही त्यांना वाटते. वास्तविक 'भक्ती' हा मूर्धन्य रस. तो सर्व रसांचा राजा. त्या भक्तीलाच रसवर्तुळाबाहेर टाकल्याबद्दल आपल्या घणाघाती टीकेचा कठोर प्रहार करीत गुरुदेव म्हणतात, " A Godless philosophy and a soulless psychology are just the prototypes of a devotionless rhetoric. " 'शापादपि शरादपि' अशी प्रतिपक्षावर शरवर्षा करणाऱ्या गुरु द्रोणाचार्यांचीच आठवण अशा ठिकाणी होते.

रसाप्रमाणे अलंकारांचे उत्पत्तिस्थानही ध्वनी हेच आहे. भरतमुनीपासून अप्पयदीक्षितापर्यंत अलंकारांची संख्या चार पासून एकशेवीस पर्यंत देण्यात आली आहे. परंतु गुरुदेवांनी 'परमार्थ सोपाना'त पारमार्थिक दृष्ट्या ज्यांचा त्यांना विचार करावासा वाटला असे २४ अलंकारच विशद करून सांगितले आहेत. विशेष म्हणजे ज्यांना साहित्यशास्त्राच्या दृष्टीने काही वाङ्मयीन मूल्य आहे, त्यांचा परामर्श घेण्याचे त्यांनी कटाक्षाने टाळले आहे. याचा अर्थ असा की, गुरुदेव अपले स्वतःचे असे नवे साहित्यशास्त्र निर्माण करीत होते. याचे आणखी एक गमक म्हणजे आमच्या व्याकरणकारांनी काही अलंकारांना दिलेली नावे असमाधानकारक वाटल्याने त्यांनी त्यांचे पुनश्च नामकरण केले आहे.

अलंकार

| जुने नाव | नवे नाव |
|---|---|
| रूपकातिशयोक्ती | निगरण |
| मालारूपक, साङरूपक, परंपरितरूपक, सावयव रूपक | महारूपक. |
| अप्रस्तुत प्रशंसा | अन्योक्ती. |
| लेश | विपर्यय |
| सार | उत्कर्ष. |
| व्याजस्तुती, व्याजनिंदा | व्याजोक्ती. |

आपल्या अलंकार शास्त्राच्या विवेचनात गुरुदेवांनी उदात्त म्हणजे Sublime या अलंकाराचाही समावेश केला आहे. 'उदात्तं वस्तुतः सम्पत्।' असे त्याचे लक्षण संस्कृत साहित्यशास्त्रात दिले आहे. खरे तर संस्कृतात शृंगार, वीर, करुण इत्यादी रसांचा निदर्शक शब्द आहे. परंतु इंग्रजीत Sublime या शब्दाने जो रस ध्वनित होतो त्याला चपखल प्रतिशब्द संस्कृत रसव्यवस्थेत नाही. 'उदात्त रस' किंवा 'कल्पनाशालित्व' असा नवा शब्द मालाकार चिपळूणकरांनी आपल्या काव्यसमीक्षेत बनविला आहे. कांट म्हणतो, सौंदर्याचा संबंध सांताशी असतो तर भव्योदात्ताचा अनंताशी असतो. कांटच्या चिकित्सेमध्ये (Critique) गुरुदेवांना एक उणीव दिसते. ती म्हणजे कांटने ज्ञानदृष्टीचा म्हणजे इंटघुइशनचा (Intuition) विचार केलेला नाही. कांटच्या ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतरात 'इंटघुइशन' शब्द येतो. पण तो 'परसेप्शन' म्हणजे इंद्रियजन्य ज्ञान अशा अर्थाने. बुद्धीला ज्यांचे आकलन होऊ शकत नाही अशा गोष्टींचे ज्ञान करून देणारी, बुद्धीपलीकडची अतींद्रिय शक्ती या अर्थाने गुरुदेव 'इंटघुइशन' हा शब्द वापरतात. जिच्या साहाय्याने आध्यात्मिक जगात प्रवेश करता येतो ती शक्ती म्हणजे ज्ञानदृष्टी. तिचा विचार कांटने केला नाही. याचे कारण कांटला भव्योदात्त व दिव्य यांचा संबंध एखाद्या काचेतून पाहावा तसा अस्पष्ट दिसला. म्हणूनच कदाचित् कांटने आपल्या 'कलाभिरुचीची चिकित्सा' या ग्रंथात भव्योदात्ताला सुंदर व ध्येयभूत (Teleological) यांच्यामध्ये स्थान दिले असावे. पण गुरुदेवांना ही मांडणी चुकीची वाटते. त्यांच्या मते सुंदर व भव्योदात्त यांच्यामध्ये ध्येयभूत असावयास पाहिजे. सूत्ररूपाने—

१) कांटची मांडणी :

सुंदर → भव्योदात्त → ध्येयभूत.

२) गुरुदेवांची मांडणी :

सुंदर → ध्येयभूत → भव्योदात्त.

डॉ. रुडाल्फ ऑटो यांनी मांडलेली 'परम पवित्र' (The Holy) ही कल्पना गुरुदेवांच्या 'ज्ञानदृष्टी' या कल्पनेशी मिळतीजुळती आहे. ज्ञानदृष्टी ही शुद्ध तर्कबुद्धी, व्यावहारिक दृष्टी व कलाभिरुची यांच्या वरची— पलीकडची शक्ती आहे. तसेच 'परमपवित्र' हे तत्व

सत्य, शिव, सुंदर यांच्या आतील आहे. या परम पवित्रालाच ऑटो 'गूढ भय' म्हणतो. कृष्णाचे विश्वरूप पाहून अर्जुनाच्या मनात जो भाव उन्मळून आला तेच हे गूढत्वपूर्ण भय होय.

थोडक्यात सूत्ररूपाने कांटचे भव्योदात्त, ऑटोचे परमपवित्र व गुरुदेवांची इन्टघुइशन या तिन्ही कल्पना एकाच स्वरूपाच्या, एकाच पातळीवरच्या म्हणता येतील. गुरुदेवांच्या साहित्यशास्त्रात या 'इन्टघुइशन' ला एकमेवाद्वितीयम असे स्थान आहे. किंबहुना साऱ्या साहित्यशास्त्रालाच त्यांचे हे अपूर्व योगदान आहे असे म्हटले तर अतिशयोक्ती होऊ नये.

वक्ता व श्रोता यांच्यात संवादित्व (Rapport) असेल म्हणजे भावनिक समानता साधलेली असेल तरच विचारांचे आदान-प्रदान सुरू होईल. अध्यात्मशास्त्रात तर 'हे हृदयीचे ते हृदयी घातले' अशी ही प्रक्रिया आहे. सामान्याचे मन व महामानवाचे मन यांची 'वेव्ह लेंग्थ' जमल्याशिवाय ती साधणार कशी ? अज्ञानात चाचपडणाऱ्या सर्वसाधारण साधकाच्या मनाला साक्षात्कारी संताच्या उच्च मनापर्यंत पोचता येत नाही हीच खरी अडचण आहे. कारण श्री अरविंद म्हणतात त्याप्रमाणे– "The Synoptic centre is the dialectic of transformation from mind to Super-mind." दुसरे म्हणजे चोहोबाजूने पाण्याने वेढलेल्या जमिनीच्या तुकड्याप्रमाणे हे माणूस नावाचे बेट आहे. त्या माणसाला समाज (कम्युनिटी) किंवा 'कम्युनन' म्हणजे सख्यभाव यांचे आवाहन व्हावे तरी कसे ? अशा वेळी प्रेषिताची भाषा समकालीनापर्यंत पोचविणे ही एक समस्याच होऊन बसते. दोघातील रुंद दरी सांधणारा पूल बांधण्यासाठी 'शब्दा' खेरीज दुसरे साधन नाही.

शब्द (बीज-मंत्र)
↓
ध्वनिमूल्य
↓
विचारमूल्य (अर्थ-प्रक्रिया)
↓
(ध्वनी+अर्थ यांच्या एकत्रीकरणातून)
↓
अध्यात्म-मूल्य,

शब्दातून प्रकट होणारे अध्यात्ममूल्य अशा क्रमाने साधकांपर्यंत किंवा वाचकांपर्यंत पोचवावयाचे आहे. तशात आजच्या विज्ञानयुगात हा प्रश्न अधिकच अवघड होऊन बसला आहे. पूर्वी माणूस माणसाशी बोलत होता. संवाद होत होता तो 'मी' व 'तू' यांचा. पण आता माणूस उभा आहे 'कॉम्प्युटर' पुढे म्हणजे यंत्रापुढे. 'मी' आणि 'तू' मध्ये 'ते' (यंत्र) उभे आहे.

I → Thou<br>(मी) → (तू) } पूर्वी

I → It → Thou<br>(मी) → (ते) → (तू) } आता

असा बदल झाल्यामुळे शब्द > अर्थ > मूल्य > संवादित्व या साखळीला सांधणाऱ्या कड्याच तुटल्यासारखे झाले. यंत्राने माणसाचे विघटन केले. माणूस आपला चेहरा हरवून बसला. त्याचे माणूसपण गमावले. (Man is de-personalised).

ह्यावर उपाय एकच. गुरुदेव म्हणतात त्याप्रमाणे एक प्रकारचा 'मटिरियल जॉन्डिस' झालेल्या ह्या संस्कृतीचे 'डिमटिरियलाइझेशन' झाले पाहिजे. म्हणजे समाजमनाचे भौतिकतेकडून आध्यात्मिकतेकडे संक्रमण झाले पाहिजे. ह्यासाठी साहित्यशास्त्राला नव्या सामाजिक भाषाविज्ञानाची म्हणजे 'Social linguistics' ची जोड दिली पाहिजे.

हे ओळखूनच गुरुदेवांनी निंबाळच्या आश्रमात एक नवी आध्यात्मिक प्रयोगशाळा उघडली. मृत समाजमनाला संतवचनामृताची संजीवनी मात्रा दिली. नवी वैष्णवनिष्ठांची मांदियाळी गोळा केली. निंबर्गी संप्रदायावर भक्तीचा कळस उभारला. नामस्मरण भक्तीच्या माध्यमातून नवे अध्यात्मपीठ उभे केले. वेद-उपनिषदे, गीता-ब्रह्मसूत्रे यांची फेर मांडणी केली. परमार्थाचे पाणिनी बनून साक्षात्काराचे नवे व्याकरण लिहिले. वेदव्यासाप्रमाणे साहित्याचे नवे शास्त्र निर्माण करून श्रीशारदेच्या पायी वाहिले. तिला विनविले,

"सा मां पातु सरस्वती भगवती
निःशेष जाड्या पहा।" ■

# बखर दत्तो वामनांची / सदाशिव आठवले

दत्तो वामन पोतदार ह्यांचे निधन झाले दिनांक सहा ऑक्टोबर एकोणीसशे एकोणऐंशी रोजी. म्हणजे आज मितीस ह्या घटनेला सहा वर्षे लोटून गेलेली आहेत. ह्याचा अर्थ त्यांचे जीवन आणि कार्य ह्या बाबी आता 'इतिहास' झाल्या आहेत. ऐतिहासिक व्यक्तीचे कार्य आणि ऐतिहासिक घटना ह्यांची मूल्यमापने शक्य तितकी पूर्वग्रहमुक्त, निःपक्षपाती आणि तटस्थपणे व्हावीत; कल्हणाच्या शब्दात ती केवळ 'सत्यार्थ कथने' असावीत हे भूतकाळाच्या आढाव्याचे मूलभूत तत्त्व कैलासवासी दत्तो वामनांनाही मान्य होते. तेव्हा त्यांच्या जीवनकार्याचे समालोचनही त्याच पद्धतीने व्हायला पाहिजे. त्यांनी काय केले, समाजाला काय दिले, त्यातले काय उरले, आणि तसेच काय करावयाचे, द्यावयाचे राहिले–करता येणे शक्य असूनही काय करावयाचे ठेविले आणि कां–ह्या सगळ्याचाच ऊहापोह झाला पाहिजे– जितका जमेल तितका निर्विकारपणे. 'जमेल तितका' म्हणण्याचे कारण हेच की ही सर्व चिकित्सेची उठाठेव कोणता तरी माणूसच करीत असतो. कमी अधिक प्रमाणात इतिहास घडविणारी असामान्य माणसे जिथे अपूर्ण असतात, चुकत असतात; कळत-नकळत नको ते मागे ठेवून जात असतात, तिथे इतिहास लिहिणाऱ्या सामान्यांची कथा ती काय? त्यांची विवेचने काहीशी एकांगी, अपुरी आणि इतर अनेक प्रकारे सदोष राहिली तर ती क्षम्य वाटोत न वाटोत, पण समजून घ्यायलाच हवीत.

दत्तो वामन पोतदारांच्या कार्याचे स्वरूप जाणून घेण्यापूर्वी त्यांच्या जीवनचरित्राचा एक लघुपट नजरे-समोरून जाणे आवश्यक आहे. दत्तो वामन कुलाबा (आताचा रायगड) जिल्ह्यातील बिरवाडी ह्या गावी दिनांक पाच ऑगस्ट अठराशे नव्वद रोजी जन्मले. पहिल्या तीन इचार यत्ता ते त्याच खेडेगावातील शाळेत शिकले. परंतु ते दहा वर्षांचे असतील-नसतील त्या वेळी त्यांच्या वडिलांनी ते गाव सोडले आणि वकील म्हणून पुण्यास बस्तान मांडले. दत्तोपंतांचे माध्यमिक आणि महाविद्यालयीन शिक्षण; व पुढचे सगळेच कार्य पुण्यातच झाले. म्हणजे त्यांच्या कार्याची कक्षा महाराष्ट्रभर किंबहुना भारतभर रुंदावत असली तरी त्याचा केंद्रबिंदू नेहमीच ह्या नगरीत राहिला. एकोणीसशे दहा साली ते फर्ग्युसन महाविद्यालयातून बी. ए. झाले. त्यांचे औपचारिक शिक्षण येथेच थांबले. शाळा-कॉलेजातील परीक्षांतून दत्तोपंत फारसे चमकल्याची कुठे नोंद नाही.[१] परंतु त्याला तसा अर्थही नाही. परीक्षेतील यश आणि पुढील जीवनातील कामगिरी ह्यांचा काही संबंध असतोच असे नाही हे आपण सगळे जाणतोच. एकोणीसशे दहासनामध्ये पुण्यास भारत इतिहास संशोधक मंडळाची स्थापना झाली. त्या प्रसंगी दत्तोपंत हजर होते; मात्र सभासद झाले सन एकोणीसशे तेरामध्ये! एकोणीसशे अकरा सालापासून एकोणीसशे छत्तीस सालापर्यंत ते शिक्षण प्रसारक मंडळीच्या सेवेत होते. ह्या अवधीत ते त्या संस्थेच्या मराठी शाळेचे मुख्याध्यापक, कॉलेजमध्ये प्राध्यापक; नूतन मराठी विद्यालय प्रशाळेचे मुख्याध्यापक आणि मीमांसा विद्यालयाचे संचालक अशा विविध पदांवर होते. ह्या सर्व जागा त्यांनी अत्यंत कार्यक्षमतेने सांभाळल्या. ह्या काळात त्यांनी विद्यार्थ्यांना केलेल्या उपदेशपर भाषणांच्या छोटया छोटया पुस्तिका प्रसिद्ध आहेत. ह्या संस्थेच्या सेवेत त्यांनी जी पडली ती जबाबदारी चोख बजाविली असली तरी प्रा. नारळीकरांप्रमाणे काही नवीन शैक्षणिक प्रयोग केल्याचे आढळत नाही.[२] एकोणीसशे छत्तीस साली ते संस्थेच्या सेवेतून निवृत्त झाले. उरलेल्या त्रेचाळीस वर्षांच्या आयुष्यात त्यांनी पुन्हा कधीही, कुठेही नोकरी अशी केली नाही. मात्र मानद पदाधिकारी म्हणून (बहुधा मानधन न घेता, आणि क्वचित कधी घेतलेच असेल तर ते अत्यंत अल्प आणि न मागता मिळाले असेल तरच) ह्या चार दशकांहून

अधिक काळात त्यांनी अनेक संस्था-संघटनांचे काम पाहिले.

दत्तो वामन पोतदार ह्या किमान दोन व्यक्ती होत्या. एकाच देहात वसत असल्यामुळे त्या वेगळ्या दिसत नसत इतकेच ! पैकी एक दत्तो वामन संस्था उभ्या करणारे आणि चालवणारे संघटक तर दुसरे लेखक-संशोधक होते. प्रथम पहिल्या पोतदारांचे स्वरूप पाहू. शिक्षण प्रसारक मंडळीत नोकरी करीत असतानाच्या काळातही ते आपल्यासाठी नवी नवी कार्यक्षेत्रे शोधीत होते असे दिसते. एकोणीसशे तेरा सालापासून भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कामात ते रस घेऊ लागले होते. एकोणीसशे चौदा मध्ये ते वसंत व्याख्यानमालेचे चिटणीस झाले आणि ती जबाबदारी पुढे चार वर्षे सलगपणे त्यांनी सांभाळली. एकोणीसशे बावीस साली भारतीय ऐतिहासिक अभिलेख आयोगाच्या कामात ते लक्ष घालू लागले. ह्या कालखंडातली त्यांची सर्वात मोठी कामगिरी म्हणजे 'भारतीय इतिहास परिषदे'ची स्थापना. एकोणीसशे पस्तीसमध्ये भारत इतिहास संशोधक मंडळाच्या विद्यमाने ह्या संस्थेची उभारणी झाली तेव्हा तिचे नामकरण 'आधुनिक भारतीय इतिहास परिषद' असे होते. त्यापूर्वी तेरा-चौदा वर्षांपासून अस्तित्वात असलेल्या 'प्राच्यविद्या परिषदे'च्या अधिवेशनांनाही दत्तोपंत हजर असत. त्या ठिकाणी हर्षपूर्व काळातील इतिहास संशोधनालाच वाव असे. मध्ययुगीन आणि अर्वाचीन भारतीय इतिहास दुर्लक्षिला जाई, आणि म्हणूनच वेगळी भारतीय इतिहास परिषद उभी करण्याचा खटाटोप पोतदारांनी केला. ह्या परिषदेचे पहिले अधिवेशन भारत इतिहास संशोधक मंडळातर्फे पुण्यातच झाले. तेव्हापासून गेले अर्धशतक बहुधा दरसाल ह्या परिषदेची अधिवेशने होत आहेत. दिल्ली, अहमदाबाद, हैद्राबाद, मद्रास, त्रिवेंद्रम, कलकत्ता अशा भारताच्या सर्व भागातील मोठमोठ्या शहरांतून ही अधिवेशने झाली असून तेथे वाचल्या गेलेल्या शोधनिबंधांचे कित्येक खंडही प्रसिद्ध झाले आहेत. ह्या परिषदेच्या एखाद्या अधिवेशनाचे अध्यक्षपद मिळणे म्हणजे त्या व्यक्तीच्या इतिहासाच्या क्षेत्रातील उल्लेखनीय अशा कामगिरीची पावतीच समजली जाते. स्वतः पोतदारांना ती एकोणीसशे अठ्ठेचाळीसमध्येच मिळाली.

एकोणीसशे छत्तीसनंतर तर दत्तोपंत संस्थात्मक कार्यासाठी पूर्ण वेळ देऊ शकत होते. भारताच्या भाषाविषयक समस्यांकडे त्यांचे अगदी त्यांच्या कॉलेजच्या शिक्षणकाळापासून लक्ष होते. इंग्रजीवर त्यांचे चांगले प्रभुत्व होते. त्या भाषेची महतीही ते जाणून असत. तथापि मराठी, गुजराथी, बंगाली वगैरे आमच्या प्रांतिक भाषांचा विकास झाला पाहिजे, आणि संपूर्ण भारतासाठी राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा प्रसार झाला पाहिजे ह्या विषयी ते अतिशय आग्रही होते. महाराष्ट्रात हिंदीच्या अध्ययनास काँग्रेसमुळे चालना मिळालेलीच होती. दत्तोपंत हिरिरीने त्या कार्याकडे वळले. एकोणीसशे अडतीसपासून सहा-सात वर्षे ते महाराष्ट्र राष्ट्रभाषा समितीचे अध्यक्ष होते. पुढे मुंबई प्रांताचे हिंदुस्थानी बोर्ड आणि महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा ह्यांचे अध्यक्ष म्हणून एकोणीसशे पन्नासपर्यंत ते त्या क्षेत्रात कायम कार्यरत होते. मराठी साहित्य आणि साहित्य-संस्था ह्यांच्याकडे तर त्यांचे विद्यार्थीदशेपासूनच लक्ष होते. एकोणीसशे दहा मध्ये बी. ए. झालेला हा वीस वर्षांचा तरुण पुढे बारा वर्षांनी मुंबई विद्यापीठाच्या वाङ्मय विभागाचा सदस्य झाला. एकोणीसशे बत्तीसमध्ये कोल्हापूरच्या साहित्य संमेलनात एक विभागाध्यक्ष, पुढे दोन वर्षांनी उज्जैनच्या मध्यभारत मराठी साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष, एकोणीसशे तेहतीस ते एकोणीसशे छत्तीस ह्या वर्षातील महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादकत्व आणि एकोणीसशे एकोणचाळीस सालच्या अहमदनगरच्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षस्थान ही मराठी साहित्याच्या प्रांतातली, वयाची पन्नाशी उलटण्यापूर्वीची त्यांची घोडदौड डोळे दिपविणारी आहे.

इसवी सन एकोणीसशे पन्नासमध्ये त्यांची षष्ट्यब्दी साजरी झाली आणि त्यानिमित्त एक गौरवग्रंथ निघाला. त्या ग्रंथात त्यांनी लिहिलेल्या संशोधनात्मक व अन्य स्वरूपांच्या स्फुटांची यादी आहे. त्यांची संख्या साडेचारशेच्या वर आहे. त्याचबरोबर त्यांचा किती संस्थांच्या कार्यात ह्या ना त्या नात्याने सहभाग होता ह्याचीही एक यादी आहे. ती त्यांनी स्वतःच दिलेली असल्यामुळे शंभर टक्के अधिकृत मानली पाहिजे. अशा संस्था अठ्ठ्याहत्तर होत्या ! त्यात वर उल्लेखिलेली इतिहास मंडळें आणि साहित्य संस्था अर्थात आहेतच; पण त्याखेरीज 'बालवीर संस्था', 'कलोपासक मंडळ', 'शारदोपासक मंडळ', 'डेक्कन जिमखाना', 'तांत्रिक शिक्षण संस्था', 'भारतीय संगीत प्रसारक मंडळ', 'येरवडा तुरूंग', 'तमाशा सुधारणा समिती', 'आर्य क्रीडोद्धारक मंडळ'

अशा किती तरी तऱ्हा! 'कऱ्हाडे ब्राह्मण संघ' हे त्यातलेच पण मुद्दाम लक्षात घेतले पाहिजे असे एक प्रकरण होय!! साठीनंतरही त्यांचा हा संस्थांच्या कामाचा व्याप कमी-अधिक प्रमाणात आणि कमी-अधिक उत्साहाने व आस्थेने अखेरपर्यंत असाच चालू होता. पण ह्यातून नेमके काय साधले गेले? स्वत: पोतदारांनी काय मिळविले? समाजाला काय मिळाले? ह्याची उत्तरे शोधावयाची आहेत; पण त्या आधी त्यांच्यातला दुसरा माणूस की जो विचारवंत होता, लेखक होता, इतिहास संशोधक आणि इतिहास भाष्यकारही होता, त्याने काय केले ह्याचाही आढावा घेतला पाहिजे. त्यानंतरच दोहींचे वेगवेगळे व एकत्रित असे मूल्यमापन यथायोग्यपणे करता येईल.

सन एकोणीसशे बावीस ते एकोणीसशे पंचाहत्तरपर्यंतच्या काळात 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार', 'मराठी इतिहास व इतिहास संशोधन', 'महाराष्ट्र साहित्य परिषदेचा इतिहास' व 'टिळकांचे सांगाती' अशी काही पुस्तके; 'थोरले माधवराव पेशवे', 'जयपूर-दर्शन', 'भारतीय भाषिक नीती' अशा काही पुस्तिका आणि वेगवेगळ्या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना अथवा पुरस्कार, पुस्तक परीक्षणे, संशोधनात्मक स्फुटे ह्या स्वरूपातले पाचशे-साडेपाचशे लेख, एवढे लेखनकर्तृत्व दत्तो वामनांच्या हातून झालेले आहे. मोजदाद केली तर साधारणपणे मराठीतील सुमारे तीन हजार पृष्ठे आणि इंग्रजीतील साधारणत: पाचशे पृष्ठे एवढा हा संभार होईल. भाषावार प्रांतरचना, भाषावार विद्यापीठे आणि मातृभाषेच्या माध्यमातून सर्व प्रकारचे उच्च शिक्षण हे त्यांचे प्रथमपासूनचे पक्के आग्रह. ह्या संदर्भात त्यांनी कित्येक व्याख्याने दिली. त्यातील काही पुस्तिकांच्या रूपाने प्रसिद्ध झाली आहेत. शिवाय प्रसंगाप्रसंगाने मुद्दाम स्वतंत्र लेखही लिहिले.

सन एकोणीसशे बारा-तेरापासून तर सन एकोणीसशे चौऱ्याहत्तर-पंचाहत्तरपर्यंत भारतीय इतिहास संशोधक मंडळाच्या वार्षिक इतिवृत्तातून, संमेलनवृत्तातून आणि त्रैमासिकातून त्यांची संशोधनपर लिखिते जवळजवळ सातत्याने येत राहिली होती. 'अंजनवेल तालुक्याची वहिवाट', 'घोड्याचा एक जुना पायबंद', 'चिंचवड-मोरया गोसावी देवालय कधी बांधले?', 'नाना फडणीस यांजकडील गावे', 'यशवंतराव होळकरांची पेंढारी पुढाऱ्यास पत्रे', 'बहिणाबाईची गुरुपरंपरा', 'मामले तळियाचा महजर', 'चिंचवड येथील दोन शिलालेख', 'श्रीधरकृत उखाहरण', 'श्रेष्ठांचे उपाध्ये व पैठणास भेट', 'ज्ञानेश्वरकालीन तेलगू ग्रंथातील मराठी गाणी', 'रामटेक येथील चित्र' ही त्यांच्या संशोधनपर टिपणांची काही शीर्षके. ह्यावरून त्यांना किती बारकाईने आणि किती विविध विषयांत संशोधन करण्यात रस असे ह्याची काहीशी कल्पना येईल. 'भाऊसाहेबांची बखर' पासून तर 'हिंदी शिल्पशास्त्र' पर्यंत नानाविध ग्रंथांना त्यांनी पुरस्कार किंवा प्रस्तावना लिहिल्या. ह्या सर्व लेखनांतून त्यांचे स्वत:चे नवे संशोधन, इतर संशोधकांशी असलेले मतभेद, काही घटनांचे त्यांनी लावलेले अन्वयार्थ ह्या सर्वांचे विराट दर्शन घडते. दत्तो वामनांनी काही लिहिलेच नाही अशी एक वरीच पसरलेली समजूत आहे; पण ती खरी नाही. त्यांनी पुष्कळ लिहून ठेवलेले आहे. खरे म्हणजे त्यातील जे जे मोलाचे आहे त्याचे एक-दोन संकलित ग्रंथ निघणे आवश्यक आहे. अर्थात त्यांनी लिहिले त्यापेक्षा किती तरी अधिक ते लिहू शकले असते, असे मात्र निश्चितपणे म्हणता येईल. मग ते का झाले नाही? पुढील विवेचनातून त्याचे काही एक उत्तर मिळेल.

महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही अनेकांच्या तोंडी असलेले हे एक नाव. दत्तो वामन पोतदार म्हणजे एक 'मोठा माणूस' अशी असंख्यांची धारणा असे. महाराष्ट्राबाहेर इतिहास परिषदेसारख्या विद्वत्सभांच्या ठिकाणी पोतदार गेले की उत्तर हिंदुस्थानी मंडळी 'पेशवा आ गया!' म्हणून त्यांचे स्वागत करीत. त्यात कुचेष्टेचा भाग अजिबात नसे हे तसे, प्रसंग प्रत्यक्ष पाहिलेल्या सर्वांनाच ठाऊक आहे. हे त्यांचे मोठेपण नेमके कशात होते? भारताच्या इतिहासाच्या कोणत्या तरी एखाद्या प्रादेशिक वा सांस्कृतिक अंगाचे ते विशेषज्ञ होते काय? त्यांनी विपुल संपादन किंवा संकलन तरी केले काय? काही मूलगामी इतिहासभाष्य दिले काय? ह्या सर्व प्रश्नांची उत्तरे नाही अशीच द्यावी लागतील. ते उत्कृष्ट बोलू शकत—मराठीतून आणि इंग्रजीतूनही; परंतु तरीही त्यांचे भाषण हमखास चांगले होईलच ह्याची खात्री नसे. कित्येकदा त्यांनी श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले, हलवून सोडले हे खरेच; पण त्यांचे भाषण रटाळ, कंटाळवाणे झाले असे प्रसंगही काही कमी नाहीत. ज्ञानाच्या क्षेत्रात ते मुख्यत: इतिहासकार म्हणूनच ओळखले जात. पण भारताचा किंवा त्याहून मर्यादित बोलायचे तर मरा-

...२

ठ्यांचा इतिहास मराठी भाषिकांपर्यंत, सर्वसामान्य मराठी वाचक आणि विद्यार्थ्यांपर्यंत पोचविण्याचे काम त्यांनी केले नाही. ते रियासतकार सरदेसायांनी केले. अलीकडे बाबासाहेब पुरंदऱ्यांसारख्यांनी केले. काही प्रमाणात ते न. र. फाटक आणि वेंद्रे ह्यांच्यासारख्यांनीही केले असे म्हणता येईल. मराठ्यांच्या इतिहासातील काही प्रसंगावरून कादंबऱ्या आणि नाटके बेतणारांनी काय केले त्याविषयी न लिहिणे बरे; पण त्यांच्यामुळे सर्वसामान्यांना काही खरेखोटे भूतकालाचे दर्शन झाले हे तर नक्कीच. काही असले तरी सामान्यांपर्यंत पोचू शकणारे प्रमाणभूत इतिहासलेखन दत्तो वामन पोतदारांकडून झाले नाही हे बाकी राहतेच. त्या बाबतीत रियासतकारांचे स्थान आजतागायत पहिले, किंबहुना एकमेव राहिले आहे. ठिकठिकाणी हिंडून पोतदारांनी जुने कागदपत्र पुष्कळ जमा केले, पण तरीही राजवाडे किंवा ग.हृ. खरे ह्यांच्या तुलनेने त्यांचे तेही काम उघड उघड कमी दिसते. जुन्या कागदपत्राचे संपादन, मूळ अस्सल कागदपत्रांचे खंड प्रसिद्ध करण्यातही राजवाडे, सरदेसाई, वा. वा. खरे, ग. हृ. खरे इत्यादींशी तुलना करता पोतदारांचे काम अल्पच म्हणावे लागेल.

. तथापि असे असूनही पोतदारांचे नाव इतिहासाचे क्षेत्रात सतत दुमदुमत राहिले. कारण एक तर त्यांनी त्या विषयाचा व्यासंग कधीच सोडला नाही. अक्षरबद्ध व्हायची राहून गेली असली तरी पोतदारांना किती विषयांची किती विपुल आणि सूक्ष्म माहिती होती हे त्यांच्या सहवासात आलेल्या प्रत्येकाच्या प्रत्ययाला आलेले आहे. अनेकांशी बोलून, चर्चा करून, कित्येकांना वाचनलेखनाला प्रवृत्त करून त्यांनी इतिहासाचा अभ्यास जागता ठेवला. त्यासाठी केलेले संघटनात्मक कार्य तर केवळ अजोड होय. भारत इतिहास संशोधक मंडळाचे ते संस्थापक नसले तरी प्रारंभापासून त्या संस्थेशी निगडित होते. कित्येक वर्षे तिथे कार्याध्यक्ष, उपाध्यक्ष, अध्यक्ष वगैरे पदांवर राहून किंवा पदावाचूनही आयुष्यभर ते ह्या संस्थेला चिकटून राहिले; अनेक अडचणींच्या प्रसंगातून त्यांनी तिला निभावून नेले. भारतीय इतिहास परिषद ही तर त्यांची राष्ट्रीय पातळीवरची चिरस्मरणीय कामगिरी. देशभर त्याची दखल घेतली गेली. म्हणजे 'पेशवे'पदात तसा अर्थ नसला तरी ते सुखासुखी मिळत नाही आणि टिकत नाही हेच इतिहास सांगतो! महाराष्ट्राच्या पातळीवर उपर्युक्त भारत इतिहास संशोधक मंडळाखेरीज महाराष्ट्र साहित्य परिषद, राष्ट्रभाषा सभा आणि महाराष्ट्र विद्यापीठासाठी उभी केलेली जनशक्ती आणि त्यातून प्रथम जन्माला आलेले पुणे विद्यापीठ ही त्यांची चालती बोलती स्मारके आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषद आणि राष्ट्रभाषा सभा ह्यांचे ते पालक होते; तर पुणे विद्यापीठाचे जनक आणि पालक होते.. काही वर्षे त्यांनी ह्या विद्यापीठाचे कुलगुरुपदही भूषविले. संघटनात्मक, संस्थात्मक स्वरूपाच्या त्यांच्या अशा कार्याबद्दल महाराष्ट्र सदैव कृतज्ञच राहील.

—पण म्हणून दत्तोपंतांच्या इतर सर्व संस्था आणि संघटनांतील सहभागाविषयी आणि विविध मंडळे आणि आयोग ह्यांच्यावरील नेमणुकीविषयी आणि तेथे त्यांनी उरकलेल्या उद्योगाविषयी काय म्हणावे? बालवीर संघटना, क्रीडामंडळे, संगीत सभा वगैरे संस्थांचे काम दत्तो वामन त्यांच्यातून नसते तरीही ठीक चालले असते असे वाटते! काही संस्था आणि मंडळावरील त्यांच्या काही कामगिरी(!)च्या संदर्भात अनेक प्रश्न उपस्थित करता येतील. उदाहरणार्थ तमाशा सुधारणा समिती. ह्यावर सरकारने त्यांना कशासाठी नेमले? केवळ तमाशा हा एक जुना, ऐतिहासिक प्रकार आहे म्हणून? बरे, सरकारने नेमले तरी पोतदारांनी ते काम का स्वीकारावे? आपल्याला सगळे समजते आणि आपण प्रत्येक ठिकाणी असलेच पाहिजे अशी काही मनोविकृती, काही विचित्र अहंगंड त्यांच्यात होता की काय? ह्या तमाशा सुधारणा समितीपुढील एक प्रश्न— 'दौलतजाद्या'ची पद्धत असावी की नसावी? आणि ह्यावर पोतदारांचे ठणठणीत मत असे की ती प्रथा राहिलीच पाहिजे! 'दौलतजाद्या'च्या ईर्ष्येने चांगल्या तमाशाचे कसे वाटोळे होते हे पुष्कळांनी पाहिले असेल. "ह्या चवलीचे म्हणणे काय?" "ह्या पावली चे म्हणणे काय?" "हा रुपया काय मागतो?" अशा चढाओढीत गाणारणीला, नाचणारणीला कुठलेही एखादे नृत्यगान सरळपणे पुरे करू द्यायचे नाही आणि नुसत्या धुमाकुळात रात्र घालवायची ह्याला काय म्हणावे? ही कसली कला? तेव्हा एक नृत्य-संगीतमय नाट्यप्रकार म्हणून तमाशाकडे पहायचे असेल तर त्या ठिकाणी 'दौलतजाद्या'सारखे पाटील आणि सावकार मंडळींचे चाळे चालू द्यावयाचे काय? उदाहरणादाखल ही एक बाब घेतली आहे. ज्या क्षेत्रात आपल्याला फारशी गती नाही, उमज नाही, जिथे आपल्यावाचून काही अडेल असे नाही अशा संस्था आणि

मंडळे कोणती हे दत्तो वामनांना स्वत:लाच सहज समजू शकले असते आणि तशी कित्येक कामे ते नाकारू शकले असते आणि आपला वेळ अधिक चांगल्या कामी लावू शकले असते. लोक दत्तो वामनांकडे जात, त्यांना आग्रह करीत आणि त्यांचा नाइलाजच होई असे कधी घडत असेल, पण अशाही प्रसंगी दत्तो वामनांसारखी मोठी माणसे नम्रपणे नकार देऊन बाजूला राहतात हेही आपण पाहतोच की नाही ? आणि नाइलाज, निरुपाय म्हणूनच ते प्रत्येक ठिकाणी हे ना ते पद स्वीकारीत होते असेही म्हणता येणार नाही. स्वत: होऊन, पुढाकार घेऊन जिद्दीने ते सरसावत असत. कित्येक जागी ते निवडणुका लढवून आणि जिंकून जाऊन बसत हे सर्वज्ञात आहे. पुणे नगर वाचन मंदिराच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीत एकदा त्यांना प्रसिद्ध विनोदी लेखक चि. वि. जोशी ह्यांनी हरवले होते. ही गोष्ट पुष्कळ पुणेकरांच्या लक्षात असेल ! सारांश प्रत्येक ठिकाणी असणे, शक्यतो अध्यक्ष, नाहीतर उपाध्यक्ष, निदान कार्यवाह आणि गेला बाजार खजिनदार म्हणून तरी असणे हा म्हणजे त्यांचा एक षोकच होता. व्यसनच म्हणाना– तपकिरीचे व्यसनही जबर होते, तरी पण तिचा क्रमांक दुसराच ! आता ह्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या आणि लोकशाही मूल्यांच्या काळात दत्तो वामनांनी अमुक का केले आणि तमुक का केले नाही असे विचारणे गैर आहे हे खरेच; परंतु त्यांनी अमुक न करता तमुक केले असते तर ते आमच्या– महाराष्ट्राच्या, भारताच्या आणि एकंदर ज्ञानाच्या जगताच्या– दृष्टीने बरे झाले असते असे मांडण्याचे लेखनस्वातंत्र्य आम्हाला देखील आहेच की !

सन एकोणीसशे अठ्ठावन-एकोणसाठच्या सुमारास शासनाकडून त्यांच्यावर एक विस्तृत शिवचरित्र लिहिण्याचे काम सोपविण्यात येऊन साधनसामग्री जमा करण्यासाठी दहा हजार रुपयांचा चेकही त्यांना मिळाला. महाराष्ट्रात त्या वेळी पुष्कळ इतिहासकार होते, आजही आहेत; परंतु त्यांच्याइतका अधिकारी विद्वान अन्य कोणी नव्हता, आणि आजही नाही, हे मान्य करायलाच पाहिजे. चार-पाच वर्षे इतर सर्व फुटकळ कामे बाजूला सारून ते शिवचरित्र लिहायला बसले असते तर ते हमखास हातावेगळे झाले असते. दत्तो वामनांचे शिवचरित्र म्हणजे केवळ शिवपुराण किंवा शिवलीलामृत झाले नसते. बाणभट्टासारख्या दरबारी इतिहासकाराप्रमाणे ते केवळ स्तुतिपाठक कधीच नव्हते. शिवाजीच्या लोकोत्तर व्यक्तिमत्त्वाची आणि अभूतपूर्व कार्याची पूर्ण जाणीव असूनही त्यांनी भावडेपणे आणि अप्रामाणिकपणे एकही विधान केले नसते, असे त्यांच्या वेळोवेळीच्या ठिकठिकाणच्या ऐतिहासिक चिकित्सेवरून स्पष्टपणे दिसू शकते. 'मराठे व इंग्रज' ह्या पुस्तकाच्या परीक्षणात त्यांनी मराठी सत्ताधीशांचे दोष अत्यंत सडेतोडपणे दाखविले आहेत.[३] "महाराष्ट्राच्या भावी पारतंत्र्याच्या बेडीची पहिली कडी सन १७५५ त नानासाहेबा (पेशवा) ने नकळत घडविली. आणि शिवाजीची दूरदेशी आपले ठायी नसल्याचे त्याने सिद्ध केले." ही दत्तोपंतांची टीका आहे, नानासाहेबांनी आंग्र्यांच्या आरमाराविरुद्ध इंग्रजांची मदत घेतली त्या संदर्भातली. त्यांची ऐतिहासिक पुरुषांच्या कर्तृत्वाच्या मूल्यमापनातली भूमिका त्यांनी एकोणीसशे शहात्तर साली दिलेल्या एका व्याख्यानात नि:संदिग्धपणे अवतरलेली आहे. ते म्हणतात, "ज्यांची नावे आपण उच्चारतो त्यांच्या जीवनचरित्राचा अत्यंत बारकाईने अभ्यास केला पाहिजे. केवळ त्यांची स्तुती करून त्यांच्यात काही दोष नव्हते, असे म्हणून भागत नाही. चुका कशा होतात हे आपण शोधून काढले पाहिजे. चुका जाणून त्या दूर करण्याचा प्रयत्न करून पुढील जीवनात सुधारणा करता येते."[४] आणि ह्याहीपूर्वी कित्येक वर्षे म्हणजे सन एकोणीसशे एकतीसमध्येच सी. व्ही. वैद्य ह्यांच्या इंग्रजीतील "Shivaji, The Founder of The Maratha Swaraj" ह्या पुस्तकाला लिहिलेल्या इंग्रजी पुरस्कारात "His (C. V. Vaidya's) thesis that Shivaji was the father of the conception and inception of Hindu Swaraj is not so easy to detend...his Statements may require to be changed or even challenged'[५] असे जे म्हटले आहे त्यावरून प्रथमपासून त्यांची दृष्टी निर्भेळ ऐतिहासिक सत्यावरच खिळलेली असे, ह्याविषयी शंका राहत नाही. पुरंदरे दफ्तराच्या तिसऱ्या भागात त्या दफ्तराच्या संपादकांनी देशस्थ ब्राह्मणाचा अभिमान धरून सखारामबापूंची जी भलावण केली आहे, तिला दत्तोपंतांनी दिलेले उत्तर हेही ह्या संदर्भात मुद्दाम ध्यानात घेण्यासारखे आहे.[६] ह्याचा अर्थ असा नव्हे की, दत्तो वामनांचे सर्वच संशोधन आणि विवेचन अगदी निरपवाद बिनचूक असे. काही त्रुटी राहून गेल्या असतील– शिवचरित्र लिहिले असते तर त्यातही राहिल्या

नसल्याच असे नाही. तथापि काही झाले तरी ते शिव-चरित्र झाले नाही, ही एक फार मोठी हानी झालेली आहे. कदाचित कुणीतरी, केव्हातरी ती भरून काढेलही; पण आज घटकेला तरी एकंदरीत आनंदच दिसतो आहे !

दत्तो वामनांनी संस्था-संघटनांच्या कार्यात फार गुरफटून जायला नको होते, असे वर म्हटले आहे; पण म्हणून त्या द्वारा त्यांनी जे केले ते नाकारता येईल किंवा त्याचे मोल कमी करता येईल, असे मात्र नाही. अनुषंगाने इथे आधी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे ती अशी की, पोतदार ज्या संस्थांशी संबंधित होते त्या वाङ्मयीन किंवा इतर विविध स्वरूपातले सांस्कृतिक कार्य करणाऱ्या होत्या. टिळकांप्रमाणे त्यांनी परकी सत्तेविरुद्ध शिंग फुंकले नाही; ज्योतिबा फुले, लोकहितवादी, आगरकर, आंबेडकर यांच्याप्रमाणे सामाजिक अन्यायाविरुद्ध बंड पुकारले नाही. कुठल्याही लढाऊ संस्थेत ते कधी शिरले नाहीत. कामगारांचे, शेतकऱ्यांचे, अस्पृश्यांचे किंवा आदिवासींचे वगैरे प्रश्न त्यांनी कधी धसास लावले आहेत, ही कामे करणाऱ्या संघटनांच्या बाजूला ते कधी फिरकलेले दिसत नाहीत. आता प्रत्येकाने ह्यांपैकी काही तरी केलेच पाहिजे असे नाही. कुणी एखाद्याने केवळ बौद्धिक, सांस्कृतिक कार्यापुरती आपली कक्षा आखून घेतली म्हणजे काही गुन्हा घडला असे नाही. येथे सांगावयाचे आहे ते एवढेच की, विशिष्ट अशाच कार्यक्षेत्रात राहिल्यामुळे दत्तो वामनांना कधी शासनाशी किंवा समाजाशी संघर्ष करावे लागले नाहीत. लढाच म्हणावयाचा तर तो त्यांनी एकच केला— भाषावार राज्यरचना आणि भाषावार विद्यापीठ ह्यासाठी. म्हणजे महाराष्ट्र राज्य आणि मराठी माध्यम ह्या गोष्टी त्यांच्यामुळे— त्यांच्या एकट्यामुळे आल्या असे नाही; पण त्यांच्या वैचारिक पायाभरणीचे श्रेय त्यांचे त्यांना द्यायलाच हवे. हा लढा देखील दत्तो वामनांनी रस्त्यावर येऊन दिला नाही. सत्याग्रह, मिरवणुकी, मोर्चे, धरणी पाहणी वगैरे प्रकार त्यांना मानवणारे नव्हते. तत्संबंधीच्या शासकीय आणि सामाजिक समित्यांतून आणि लहान-मोठ्या सार्वजनिक व्यासपीठावरून त्यांनी आपले म्हणणे खडसावून मांडले. प्रत्यक्ष आंदोलनाचे प्रसंगी मात्र त्यांची पावले फार सावधपणे पडत (एकंदरीत सावधपणे चालणे हा त्यांच्या आयुष्यातला एक कायमचा मंत्रच होता. ते आजन्म ब्रह्मचारी होते हे सगळ्यांनाच ठाऊक आहे, पण त्यांनी आजन्म ब्रह्मचर्याची शपथ घेतलेली नव्हती; दरवर्षी ते एक वर्ष ब्रह्मचारी राहण्याची शपथ घेत हे कदाचित पुष्कळांना माहीत नसेल. सावधानतेचा आणखी पुरावा कशास पाहिजे ?)

दत्तो वामनांनी आयुष्यभर केलेल्या कार्याच्या पावत्या त्यांना समाजाकडून आणि शासनाकडून मिळत गेल्या. मराठी साहित्य संमेलनाच्या आणि भारतीय इतिहास परिषदेच्या अध्यक्षपदांचे उल्लेख वर झालेच आहेत. एकोणीसशे सेहेचाळीसमध्ये शासनाने त्यांना महामहोपाध्याय पदवी प्रदान करून गौरविले. प्रयागच्या हिंदी साहित्य संमेलनाकडून 'साहित्य वाचस्पती' आणि काशी विद्यापीठाकडून 'डी. लिट्' ह्या पदव्या त्यांना मिळाल्या. एकोणीसशे सदुसष्टमध्ये ते 'पद्मभूषण' ही झाले. भारतात भाषिक राज्ये झाली आणि मातृभाषेच्या माध्यमातून उच्च शिक्षण देणारी विद्यापीठेही उदंड झाली. वर वर पाहता त्यांची स्वप्ने साकार झालेली त्यांना डोळे मिटण्यापूर्वी पाहता आली.

पण म्हणून त्यांच्या सर्व अपेक्षांची पूर्ती झाली का ? पुणे विद्यापीठ ह्या नावाने पहिले महाराष्ट्र विद्यापीठ आले. नंतरची शिवाजी, मराठवाडा, अमरावती ही सर्व मराठी माध्यमातून शिक्षण देणारी महाराष्ट्र विद्यापीठेच आहेत. श्रीमती नाथीबाई ठाकरसी विद्यापीठ, नागपूर विद्यापीठ आणि आता मुंबई विद्यापीठसुद्धा मराठी मातृभाषेचा कमी अधिक अवलंब करून उच्च शिक्षणाचा प्रसार करीत आहेत. परंतु म्हणजे नेमके काय चालले आहे हे आपण प्रत्यक्ष पाहत आहोत. महामहोपाध्यायांना हे अभिप्रेत होते काय ? "रा. ब. गणेश चिमणाजी वाड ह्यांच्या आठवणी व त्यांच्या पेशवे दफ्तर कार्याचे मूल्यमापन" ह्या विषयावर फेब्रुवारी एकोणीसशे अडुसष्टमधील आपल्या भाषणात पेशवे दफ्तराविषयी लिहिताना ते म्हणतात, "दफ्तर पक्क्या बंदोबस्तात आहे. उंच दगडी इमारत आहे. आगीची भीती नको म्हणून दिवेच लावीत नाहीत. आता कुणाला काडीही टाकता येणार नाही. हा सर्व बंदोबस्त इंग्रजांनी केला. नाही तर पेशवे दफ्तराची रद्दी झाली असती." आधुनिक इतिहाससंशोधन, त्यांचे नवे तंत्र इतिहासनिवेदन आणि त्याचे स्वरूप हे काही आपले नाही. पाश्चात्त्यांमुळेच ते येथे आले असेही त्यांनी स्पष्ट नमूद केले आहे.[७] इंग्रजांचे राज्य वाईट असले, त्यांनी आपले शोषण केले असले तरी ज्ञानाच्या क्षेत्रात आपण त्यांच्या

कित्येक शतके मागे आहोत, आणि त्यांच्या बरोबरीने येण्यासाठी आणि सर्व विषयांत त्यांच्या तोडीचे ग्रंथ निर्माण करण्यासाठी अपार कष्ट करावे लागतील ह्याची त्यांना जाणीव होती. परंतु "जेथे विद्यापीठे कर्तव्यभ्रष्ट, विद्वान मंडळी भ्रांत व आळशी" तेथे काय होणार असा त्यांनी एकोणीसशे बावीस सालीच सवाल टाकला होता.[८] आज चौसष्ट वर्षांनंतर तरी आपण त्यांच्या सवालाला जवाब ठरेल, असे काही तरी कर्तृत्व दाखवू शकतो काय? सन एकोणीसशे त्रेपन्न मध्ये त्यांना परिस्थिती दिसली होती. आणि बडोद्याच्या वाङ्मय-परिषदेच्या सोळाव्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून बोलताना "ज्ञानाच्या अनेक शाखांत अद्यापि काहीच मशागत झालेली नाही." अशी खंतही त्यांनी व्यक्त केलेली होती.[९] ही अनास्था दूर होण्याचे चिन्ह नाही. अगदी इतिहास विषयापुरतेच बोलायचे झाले तर एकोणीससे सदतीस साली त्या संबंधात लिहिताना दत्तो वामनांनी दाखवून दिले होते की, तेथील बहुमोल कागदांच्या वीस हजार रुमालांपैकी (तीनचार कोटी कागदपत्रे), फार तर दहा रुमाल भरतील एवढेच कागद छापून प्रसिद्ध झाले होते. "जेव्हा महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन होईल तेव्हाच ह्या दप्तराचा यथोचित परामर्ष घेणे सुकर होईल."[१०] अशी तेव्हा त्यांना आशा वाटली होती. पेशवे दप्तर पुण्यातच आहे. पुणे विद्यापीठ स्थापन होऊन सदतीस वर्षे झाली. पेशवे दप्तराकडे कोण फिरकते आहे. गावोगाव गल्लीबोळात महाविद्यालये निघाली आहेत. हळूहळू जिल्हावार विद्यापीठे होतील. आज पाच लाख विद्यार्थी उच्च शिक्षण घेत असले तर उद्या पन्नास लाख घेऊ लागतील; महाविद्यालये पाचशेची पाच हजार होतील, विद्यापीठांची संख्या सहावरून साठावरही जाईल. हा संख्यात्मक विकासही आवश्यकच आहे. शिक्षण 'पाण्यासारखे उदंड पसरावे' असेही दत्तो वामन एकदा म्हणाले होते. (सध्या महाराष्ट्रात शिक्षण उदंड होत आहे, पाण्याचाच दुष्काळ आहे!) पण म्हणजे मराठी माध्यम होऊन आज ज्या प्रकारचे पदवीधर बाहेर पडत आहेत, ज्या पातळीचे प्राध्यापक त्यांना शिकवून शहाणे करीत आहेत, हे सगळे असे चित्र दत्तो वामनांना मुळीच पाहावयाचे नव्हते. प्रस्तुत लेखक एकदा त्यांच्याशी ह्याबाबत बोलला होता तेव्हा ते म्हणाले होते, "अहो, मला काय सांगता? माझं चुकलं असेल, मी गणपती करायला गेलो आणि माकड झाले आहे खरे; आता तुम्ही हे सुधारा, तुमचे मूर्तिकार कौशल्य दाखवा." आपणा सर्वांपुढेच हे आव्हान आहे. दत्तो वामन गेले. थोडेबहुत का होईना, पण भरीव कार्य आणि चांगले आदर्श मागे ठेवून गेले आहेत. त्यांनी आपल्याला रस्ता पाडून दिला आहे. त्या मार्गाने पुढे पुढे जायचे की मागे मागे सरकत पुन्हा पेशवाईला जाऊन भिडायचे हे तुम्ही आम्हीच ठरवायचे आहे.

१) } इथे लेखकाची माहिती अपुरी किंवा चुकीची
२) } असू शकेल. ती कुणी दुरुस्त केल्यास चांगलेच.
३) न. चिं. केळकर कृत 'मराठे व इंग्रज' ह्या पुस्तकाचे परीक्षण.
४) श्रीशिवचरित्राचे पैलू : संपादिका कमल गोखले पुणे, १९८०, पृ. ६७
५) सी. व्ही. वैद्यांचा ह्या शीर्षकाचा इंग्रजी ग्रंथ. म. म. पोतदारांचा इंग्रजी पुरस्कार, पुणे, १९३१. पृ. १–२
६) पुरंदरे दप्तर भाग ३, पुणे, १९३४. दत्तो वामनांचा पुरस्कार, पृ. २–३
७) मराठी इतिहास व इतिहास संशोधन, पुणे, १९३५ पृ. १
८) मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, पुणे, १९२२ उपोद्घात पृ. ९
९) भारतीय भाषिक नीती, पुणे, १९५३ पृ. १४
१०) पेशवाईच्या सावलीत– ना. गो. चापेकर, पुणे, १९३७. दत्तो वामनांचा पुरस्कार पृ. १

■

## साभार स्वीकार

### नाटक–एकांकिका

**हॅलो चार्लस् !** : माधव गडकरी; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. २७ △ **नर्सेस क्वार्टर्स व इतर एकांकिका** : तारा वनारसे; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६ रु. ४० △ **माझा खेळ मांडू दे** : सई परांजपे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. २५ △ **जय जय रघुवीर समर्थ** : प्रेमानंद गज्वी; अभिनव प्रकाशन मुंबई; १९८६; रु. १२ △ **दरवेशी आणि इतर एकांकिका** : जयंत पवार; अभिनव प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. १० △

# बसवलिंगस्वामी (चरित्र व वाङ्मय) : काही विचार / चंद्रशेखर कपाले

बस्वलिंग अथवा बसवलिंगस्वामी हे मराठी वीरशैव संत साहित्यिकांपैकी एक महत्त्वाचे नाव. मन्मथस्वामींचे शिष्य लिंगेश्वर यांचे हे पुत्र व शिष्य. सर्वच संतकवींचे वैशिष्टय हे की, त्यांनी प्रसंगी इतरांची, भक्तांची, संतांची चरित्रे वर्णिली परंतु स्वतःविषयी फारसे लिहिले नाही. बसवलिंगांनीही संतमालिका लिहिली, मन्मथस्वामींच्या जन्माचे, समाधीचे अभंग लिहिले, बसवेश्वरांच्या जन्माचे अभंग लिहिले, परंतु स्वतःचा ठावठिकाणा मात्र दिला नाही. त्यामुळे त्यांच्या रचनेतून आलेल्या काही उल्लेखांवरून व इतर संतचरित्रकारांनी दिलेल्या तुटपुंज्या माहितीच्या आधाराने बसवलिंगस्वामींच्या चरित्राविषयी अनुमाने करावी लागतात.

सतचरित्रकार महिपतीबुवा ताहराबादकर यांनी आपल्या 'भक्तविजय' ग्रंथात अनेक संतांची चरित्रे विस्ताराने वर्णिली आहेत. परंतु ज्या संतांची वर्णने विस्ताराने देता आली नाहीत अशांची नामावली ५७ व्या अध्यायाच्या शेवटी दिली आहे. तेथे एक ओवी पुढीलप्रमाणे आहे,

गोसावीनंदन स्वामी वामन । गिरीबाई चिन्मयनंदन ।
बस्वलिंगाचे ऐकूनि कीर्तन । जगज्जीवन संतोषे ॥१७९॥

बसवलिंगांविषयी संतचरित्रात आलेला हा एकमेव व पहिला उल्लेख. मन्मथ, लिंगेश्वरादी अन्य पूर्वकालीन वीरशैव संतांचा उल्लेख मात्र कोठेच नाही. 'भक्तविजय' हा ग्रंथ शके १६८४ चित्रभानुनाम संवत्सर वैशाख वद्य द्वादशीस 'प्रवरेपासूनि दक्षिणेस । ताहाराबाद गाव पाच कोस । भक्तविजय अति सुरस । झाला असे ते ठायी ॥२१६॥ अ. ५७.

महिपतींनी केलेल्या वर्णनावरून दोन अनुमाने निघतात. १) बसवलिंग हे महिपतीबुवांच्या काळात किंवा त्यांच्या पूर्वी होऊन गेले असले पाहिजेत. २) बसवलिंग हे चांगले कीर्तनकार असले पाहिजेत. आणि ते वारकरी व समर्थ सांप्रदायिकांना आप्तस्वकीय वाटत असावेत.

शाहीर रामजोशी यांच्या 'बारशीच्या भगवंतावरील' लावणीत बसवलिंगांसंबंधी काही माहिती आलेली आहे. तेथे 'बसवलिंग हा जंगम याणें संगमसुखि लाविला' असा तर उल्लेख आहेच, परंतु पुढे 'जयराम' नावाच्या साधुपुरुषाची माहिती देऊन दोघांचेही वास्तव्य बार्शीत असल्याचे स्पष्ट वर्णन आलेले आहे.

या लावणीच्या आधारे तीन गोष्टी सिद्ध होतात. १) बसवलिंग हे जंगम होते. २) त्यांचे वास्तव्य बार्शी शहरात होते. ३) महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते वीरशैव असूनही बार्शीच्या भगवंताचेही उपासक होते. आता हे 'जयराम' कोण व त्यांचा बसवलिंगाशी नेमका कोणता संबंध होता याचा अधिक शोध घेणे मात्र जरुरीचे आहे. बसवलिंगांचे एक पद भगवंताविषयी उपलब्ध झाले आहे, (स. वा. मंदिर, धुळे. बाड क्र. ६९७), ते असे.

भक्तांसि बंधन कैचे भगवंत पाहाता द्रिष्टी ॥धृ॥ राया आंबरुसी गर्भ ॥ आपण सोसी पद्मनाभ ॥ दासा देतो अभय लाभ ॥ करुनी सुखरूप ॥१॥ स्वरूपसुंदर शामलीळा ॥ मुगुटकुंडल रत्नकीळा ॥ चंदन चर्चित भाळी टिळा ॥ वदनी आंब्रुत द्रीस्टी ॥२॥ अंब्ररुसीचे गर्भ वारि ॥ रुसी दुर्वास कैवारी ॥ बस्वलिंगाचा साहाकारि ॥ द्रीस्टी केल्या संतोष्टि ॥३॥

डॉ. पंडित आवळीकरांनी बसवलिंगांचा काळ शके १७००मानला आहे. (विवेक चिंतामणी, प्रस्तावना, पृ.२२) परंतु त्यांच्या म्हणण्याला भक्कम पुराव्याचा आधार नाही. ज्याअर्थी श. १७०० पूर्वी होऊन गेलेल्या महिपती बोवादि चरित्रकारांनी त्यांचा उल्लेख आपल्या ग्रंथात केलेला आहे त्याअर्थी चांदोरकर, भावे इत्यादींनी म्हटल्याप्रमाणे बसवलिंगांचा काळ शके १६०० म्हणजे सतराव्या शतकाचा उत्तरार्ध हाच गृहीत धरणे योग्य होईल.

संत-कवी-काव्य-सूचीकार गो. का. चांदोरकर यांनी बस्वलिंगांविषयी दिलेली माहिती अशी, 'यांच्या श्रीखंड्याख्यानावरून व ह्यांचे संबंधी असलेल्या महिपतींच्या उल्लेखावरून शके १५२१ नंतर व १६३७ पूर्वी अगर त्या सुमारास केव्हा तरी यांचा काल आहे. यांनी स्वतःस जयरामात्मज म्हणविलेले आढळते.' ग्रंथः गजगौरीव्रत; संतमालिका, रुक्मिणी भावार्थ, भामाविलास, श्वानउद्धार, श्रीखंड्याख्यान, उमामहेशसंवाद, मुरलीचरित्र.

वि. ल. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वता'त वस्वलिंगांबद्दल उल्लेख आढळतो तो असा. 'रामसुतात्मजा' प्रमाणेच मिश्ररचना वसवलिंगही करितो. वसवलिंगांचा काळही शके १६०० च्या आसपास असावा. याची भामाविलास, उमामहेश संवाद, गजगौरीव्रत आख्यान वगैरे बरीच कविता उपलब्ध आहे. यांपैकी गजगौरीव्रत काव्यसंग्रहात छापिले आहे. वस्त्रलिंगांची माहिती महिपतीबुवांनी आपल्या ग्रंथात दिली आहे.

वसवलिंगांच्या चरित्राविषयी सांप्रदायिकांतही विशेष माहिती उपलब्ध नाही. तरी पण सांप्रदायिक गाथ्यातील त्यांच्या अभंगांतून येणारी आत्मचरित्रात्मक वर्णने त्यांच्याविषयी काही महत्त्वाची माहिती पुरवितात. अध्यात्म भक्तिमार्गावरील वसवलिंगांच्या वाटचालीचे चित्र त्यात चांगले उमटले असल्याने ते अभंग येथे देत आहे.

'मुळी बाप होता ज्ञानी । तेव्हा लागलो ह्या ध्यानी ॥१॥
जगी बाप ऐसा व्हावा । त्याचा वंश मुक्तीस जावा ॥२॥
पोटी येता हरले पाप । लिंगेश्वर मायबाप ॥३॥
वसवलिंग पोटीचा बाळ । त्याची पुरविली आळ ॥३॥

(काडादी गाथा अ. क्र. ५२)

दैवे माझा जन्म सुखाचा पै केला ।
पोटी जन्म दिला साधुचिया ॥ १ ॥
बाळपणी दिक्षा लावली गुरुची ।
संसाराची रुची न कळे मज ॥ २ ॥
स्मरण, भजन, पूजन संतांचे ।
सदा कीर्तनाची प्रेम गोडी ॥ ३ ॥
नाही जाऊ दिले अन्य ठायी चित्त ।
धन्य गोतवित्त देव झाला ॥ ४ ॥
सर्व सुख मज दावी आपुले ठायी ।
वसवलिंगा पायी स्थिर केले ॥ ५ ॥

(का. गा. १७)

बहुता जन्मी मी पुनीत झालो ।
तरीच याच्या पोटी आलो ॥ १ ॥
माझा बाप कळवळयाचा ।
ठेवा दिधला निजधनाचा ॥ २ ॥
हाती यकांती ठेवणे दिले ।
तव ते लोकात प्रगट झाले ॥ ३ ॥
जन ठेवत पुत्राची घेत ।
येथे येउनी भलते नेत ॥ ४ ॥
सर्व जनासी पुरले पाही ।
परी माझे सरले नाही ॥ ५ ॥
म्हणे वस्वया आघटीत गोष्टी ।
आयती खातो बापाची रोटी ॥ ६ ॥

(पराडकर बाडावरून)

सत्पुरुषाची चिन्हे सांगितली शास्त्री ।
कैसी त्याची परी पाहू आता ॥ १ ॥
होणारा सारिखी आठविली बुद्धी ।
काय कृपानिधी करील पाहो ॥ २ ॥
काय मज हाती करवील संसार ।
किंवा सारासार वैराग्याचा ॥ ३ ॥
वसवलिंग म्हणे काही न कळे मज ।
करील शिवराज तेचि खरे ॥ ४ ॥

(का. गा. १४)

आपुला निश्चय मनाचा हा झाला
परतोनी आला ऐसा नाही ॥ १ ॥
भोगियला आम्ही संसारचा भोग ।
आता वाटे त्याग करावा हो ॥ २ ॥
अग्नीचे ते सुख मानी जैसी सती ।
पुढे मोक्षगती भ्रतारासी ॥ ३ ॥
वसवलिंग म्हणे तैसेची करावे ।
आता काय पहावे मागे पुढे ॥ ४ ॥

(का. गा. १५)

करीन अट्टाहास आपुल्या जीवाचा ।
पाहीना देवाचा महिमा आता ॥ १ ॥
टळटळीत ज्ञान न कळे मज पूर्ण ।
आत्मत्वे निपुण चित्त होय ॥ २ ॥
गुरुपुत्र म्हणे गुरुगम्य नेणे ।
तेचि लाजिरवाणे जनामध्ये ॥ ३ ॥
क्षत्रियाचा पुत्र पळू लागे रणी ।
मग तो काय जनी बरवा दिसे ॥ ४ ॥

राजपुत्र राज्य सांडूनिया भिक्षा ।
माागितली दीक्षा बरवी नसे ॥ ५ ॥
सभाग्याच्या पोटी जन्मला करंटा ।
काय जनी मोठा जाणीजे तो ॥ ६ ॥
बसवलिंग म्हणे तैसी आम्हां लाज ।
सत्पुरुषाचे बीज कैसे आम्ही ॥ ७ ॥
(का. गा. १६)

धन्य त्याचा जन्म शिवभक्ताचे कुळी ।
जेथे चंद्रमौळी वास करी ॥ १ ॥
संसाराचा बंध तयाचा तुटला ।
पूर्णत्वासी आला म्हणूनिया ॥ २ ॥
(का. गा २३)

...सोसवेना आम्हां जन्म आणि मरण ।
मग गेलो शरण सद्गुरुसी ॥ ७ ॥
सद्गुरुने केली दोघा बुझावणी ।
मज केले धनी ब्रह्मांडाचे ॥ ८ ॥
प्रपंच परमार्थ जीव केला शिव ।
ऐसा गुरुराव बाप माझा ॥ ९ ॥
बसवलिंग म्हणे धन्य गुरुराज ।
आम्ही करू काज गुरुकृपे ॥ १० ॥
(का. गा. ४३)

परमार्थ हा नोव्हे लेकराच्या गोष्टी ।
येथे व्हावा पोटी अनुताप ॥ १ ॥
दगडाहून जीव करावा कठीण ।
अंतरीचा शीण सांडूनिया ॥ २ ॥
मृत्यू झाले त्याची सांडावी ही आस ।
तैसे व्हा उदास संसारासी ॥ ३ ॥
बसवलिंग म्हणे कराराचे काम ।
आहे त्यासी धाम जवळीच ॥ ४ ॥
(का. गा. ४४)

उपरोक्त अभंगांतून बसवलिंगाचे जे व्यक्तिचित्र साकारते ते असे : मन्मथ परंपरेतील लिंगेश्वरासारख्या ज्ञानी, अधिकारी गुरुवर्गी (माहेश्वर) संताच्या पोटी जन्म लाभल्यामुळे बसवलिंगास धन्यता वाटते. किंबहुना पित्याच्या ऋणामुळेच आपण योग्यतेला चढलो, मोक्षाचे धनी झालो ही भावना अनेक तऱ्हांनी व्यक्त झाली आहे.

पित्याने आपल्या पुत्रावर योग्य संस्कार केल्यामुळेच बसवलिंगाचे जीवन कृतार्थ झाले. त्यांना संतसमागमाची, भक्तिप्रेमाची, कीर्तनाची गोडी लागली. पिता, गुरु, पुत्र, शिष्य. तरीपण मोक्षाची वाट तशी सोपी नाही. संसार करावा की वैराग्य स्वीकारावे अशा द्विधा मन:स्थितीत मन्मथासारख्या परमगुरुवरच विसंबणे बरे. संसाराचा भोग भोगल्यावर त्यागाशिवाय मन:शांती कशी लाभणार ? मनाचा निर्धार झाला. जीवाच्या अट्टाहासाने देवाचा महिमा पाहायची प्रतिज्ञा केली. अज्ञात मार्गावर पाऊल तर ठेवले. आता हाती घेतले सतीचे वाण सांडणे नाही. मागे फिरणे नाही. त्यातून लिंगेश्वरासारख्या ज्ञानी पित्याच्या पोटी जन्म घेऊन, मोक्षाची वाट अवघड म्हणून अर्ध्या वाटेतून माघार घ्यायची हे 'सत्पुरुषाच्या बीजा'स शोभणारे नव्हते. साधकावस्थेतील हे अनुभव मोलाचे होते. सद्गुरूला शरण गेल्यावर त्याच्या कृपेने प्रपंचाचा परमार्थ झाला. जीवाचा शिव झाला. अर्थात ही वाटचाल सोपी नव्हती. संसारातून मन काढून त्याला ईशचरणी रुजू करायचे म्हणजे सुलभ, सहजसाध्य गोष्ट नव्हे. त्यासाठी पोटी अनुताप व्हावा, जीव दगडाहून कठीण करावा लागतो. संसाराची फसवी आशा सोडून मोठ्या करारीपणाने जीव झोकावा लागतो. मग मात्र मोक्षधाम दूर नाही. ही आत्मानुभूती बसवलिंगांना आली आणि म्हणूनच ते सदैव भजन, पूजन, कीर्तनात रंगून जाऊ लागले. मग प्रपंचाचा परमार्थ आणि जीवाचा शिव कसा होणार नाही ? महीपतींनी म्हणूनच नोंद करून ठेवली, 'बस्वलिंगाचे ऐकूनि कीर्तन । जगज्जीवन संतोषे.'

संतकवि-काव्य सूचीकार चांदोरकर आणि महाराष्ट्र-सारस्वतकार वि. ल. भावे यांनी बसवलिंगाच्या नावावर दिलेल्या ग्रंथांची यादी आणि त्यांच्या पित्याचे वा गुरूचे म्हणून दिलेले 'जयराम' हे नाव सांप्रदायिकांना ज्ञात नाही. त्या उलट सांप्रदायिकांना माहीत असलेली बसवलिंगांची अभंगरचना, शिवानंदबोध (गुरुगीता) मन्मथस्वामींच्या जन्म व समाधीप्रसंगाचे अभंग, बसवेश्वरांच्या जन्मासंबंधीचे अभंग इत्यादी साहित्याची नोंद मराठी वाङ्मयाच्या इतिहासकारांनी घेतलेली नाही. तसेच बसवलिंगाचे पिता वा गुरु 'जयराम' नसून 'लिंगेश्वर'च होत हे उपरोक्त अभंगांवरून निर्विवाद सिद्ध होते.

वाङ्मयेतिहासकार आणि सांप्रदायिकांच्या माहितीत असा भेद असल्यामुळे बसवलिंग नावाचे दोन कवी आणि तेही एकाच काळात होते काय असा प्रश्न अभ्यासकांच्या मनात निर्माण होतो. तशी शक्यता मीही अन्यत्र व्यक्त

केली आहे. या संदर्भात अधिक संशोधन होणे अगत्याचे आहे. श्री. रा. चि. ढेरे यांनी मात्र वरील गोष्टींची फारशी चर्चा न करता आपले मत व्यक्त केले आहे ते असे, 'वीरशैव मराठी ग्रंथकारांपैकी बस्वलिंगांची बरीच प्रकरणे उपलब्ध झालेली आहेत. परंतु त्यात सांप्रदायिक पृथगात्मतेचा स्पर्श मुळीच नसल्यामुळे बस्वलिंगांचे वीरशैवत्व आपल्या नजरेत भरले नाही.' (इंद्रायणी नोव्हें-डिसें. १९६३)

बस्वलिंगांचे अप्रकाशित साहित्य बऱ्याच मोठ्या संख्येने भा. इ सं. मंडळ, पुणे; समर्थ वाग्देवता मंदिर, धुळे; सरस्वती महाल लायब्ररी तंजावर; जयकर ग्रंथालय पुणे विद्यापीठ इत्यादी ग्रंथालयांतून व जुन्या मठांतून प्रसिद्धीची वाट पाहत पडून आहे. काही ठिकाणी मी स्वत: जाऊन आलो असल्यामुळे तेथील साहित्याच्या अवलोकनावरून मलाही असे वाटत आहे की, बसवलिंग या नावाचे दोन कवी नसून इतिहासकारांनी नोंदविलेले ग्रंथ व सांप्रदायिकांच्या संग्रही असलेले साहित्य हे एकाच बसवलिंगाचे असले पाहिजे. कारण सांप्रदायिक गाथ्यातील काही अभंग, पदे व गुरुगीता असे काही साहित्य, समर्थ वाग्देवता मंदिर, धुळे; सरस्वतीमहाल लायब्ररी, तंजावर इत्यादी ठिकाणीही उपलब्ध आहे.

त्यांच्या काही प्रकरणांतून व अभंगांतून सांप्रदायिक पृथगात्मता दिसून येत नसल्यामुळे त्यांचा अंतर्भाव कोणी वारकरी तर कोणी समर्थ संप्रदायात केला असावा. व तशा भावनेनेच त्यांच्या साहित्याचा संग्रह केवळ वीरशैवच नव्हे, तर वारकरी व विशेषत: समर्थ सांप्रदायिक मठांतूनही झाला असला पाहिजे. हा संग्रह होत असताना आपापल्या सांप्रदायिक दृष्टिकोनातूनच त्यांच्या साहित्याचा स्वीकार व विचार केलेला दिसतो. वस्तुत: बस्वलिंगांच्या साहित्यातून व्यक्त होणारा धार्मिक व आध्यात्मिक दृष्टिकोन उदारतेचा आहे. वीरशैव सांप्रदायिकांच्या संग्रहातील त्यांच्या वाङ्मयातून जरी क्वचित स्वसंप्रदायाचा अभिमानपूर्वक उल्लेख येत असला तरी एकंदरीत अन्य वीरशैव संतांपेक्षा त्यांचा दृष्टिकोन अधिक उदार, व्यापक व सर्वसमावेशक असल्याचे आपल्या प्रत्ययास येते. (पाहा– प्राचीन मराठीच्या नवधारा– रा. चि. ढेरे; साहित्यसंवेद– चंद्रशेखर कपाळे.)

चांदोरकरांनी बसवलिंगांना 'जयरामात्मज' ठरविल्याचे दिसत असले तरी ते नाव बसवलिंगांनी वर्णिलेल्या संतमालिकेतील एका संतांचे असले पाहिजे, असे वाटते. संतमालिकेत 'मानुरी नगरी मुंडी पैगंबराची आली: माझ्या नागदेवे ज्याने भिंती ग चालविली ॥ १२ ॥ (स. वाग्देवतामंदिर, बाड १०) हे बसवलिंगांचे उद्गार त्यांना आपल्या परंपरेच्या आदिगुरुविषयी वाटणारी आत्मीयता सिद्ध करणारे आहेत.

बसवलिंगांचा काळ सतराव्या शतकाचा उत्तरार्ध असला पाहिजे हे वाङ्मयेतिहासकारांना व सांप्रदायिकांनाही मान्य असल्याचे दिसते. साहित्यांतर्गत पुराव्यानेही हे सिद्ध होण्यासारखे आहे. बसवलिंगांच्या 'संतमालिका' व इतर संतवर्णनपर काही पदांतून वीरशैव संतांचा उल्लेख नाही. याचे कारण एकतर मन्मथ लिंगेश्वर ही सांप्रदायिक गुरुपरंपरा असल्यामुळे त्यांचे वर्णन संतमालिकेत आले नसावे. दुसरे म्हणजे मराठी संतांचा व तत्कालीन महाराष्ट्रातील अन्य संप्रदायांचा प्रभाव अशा वातावरणात बसवलिंगांच्या साहित्याची जडणघडण झाली आहे. या सर्व संदर्भाने त्यांच्या साहित्याचा अभ्यास झाला पाहिजे. साधुसंतांविषयी त्यांना वाटत असलेले प्रेम कसे संप्रदायातीत होते हे सिद्ध करणारे त्यांचे एक अप्रकाशित पद येथे देतो–

संतांचा महिमा काय कोण ऐसा वाणी ॥ ६ ॥ केवळ ईश्वरी आवतार ॥ ज्याचा चाले साक्षात्कार ॥ करिती जडजीवा उद्धार ॥ मस्तकी ठेवुनिया पाणी ॥ १ ॥ ज्ञानेश्वराचा अभेद ॥ मुखे रेडा बोले वेद ॥ तुकोबाचे पै कागद ॥ बुडवू न शके हे पाणी ॥ २ ॥पाषाणाची मोर्ती भली ॥ नामदेवे जेवविली ॥ शरीराची पुष्पे जगी तो हा कबीर ज्ञानी ॥ ३ ॥ मुकुंदराज केशवस्वामी ॥ रामदास आणि जयराम येको जनार्दनाचे नाम ॥ कीर्ति नोव्हे पै सानी ॥ ४ ॥ चरणस्पर्शे तरती वचने करिती ब्रह्मचि पूर्ण ॥ ऐसा संत मोतिगहत ॥ बस्वलिंगाचे ध्यानी ॥

स. वाग्देवता मंदिर, बाड (६)

बसवलिंगांच्या समग्र वाङ्मयाचा आढावा या ठिकाणी घेणे शक्य नाही. केवळ त्यासंबंधीची काही चर्चा करणे एवढाच या लेखाचा हेतू. बसवलिंग हे मूलत: वीरशैव संत कवी असले तरी त्यांचे बरेचसे साहित्य संप्रदायातीत आहे व त्याच्या प्रेरणा नागेश, वारकरी व समर्थ संप्रदायातही असल्याचे आढळते. किंबहुना असेही म्हणता येईल की, बसवलिंगाचे साहित्य हे तत्कालीन महाराष्ट्रात अस्तित्वात असलेल्या अनेक संप्रदायांच्या सुसंस्कारसमन्वयाचे सुंदर व गोड फळ आहे. ■

...३

# ज्ञानयज्ञाची सांगता / उषा मा. देशमुख

भारतीय संशोधन विद्येचे कंठमणी, प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृतीचे भाष्यकार, प्राच्यविद्यापंडित, अभिलेखविद्याविशारद, नाणकशास्त्रज्ञ, जागतिक कीर्तीचे संस्कृत आणि प्राकृत साहित्याचे गाढे व्यासंगी, पद्मभूषण महामहोपाध्याय डॉ. वासुदेव विष्णु मिराशी तथा नानासाहेब मिराशी हे महाराष्ट्र शारदेच्या गळघातील कौस्तुभ होते असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. डॉ. मिराशी हे जागतिक कीर्तीचे संशोधक होते व त्यांनी अनेक ज्ञानशाखांमध्ये नुसते पदार्पण केले होते, असे नव्हे, तर त्या ज्ञानशाखांत अवगाहन करून हाती आलेले सिद्धांत सातत्याने मांडले होते. वास्तविक आयुष्यभर एकाच ज्ञानशाखेत संशोधन करता करता एखाद्याची हयात संपते, परंतु डॉ. मिराशी यांच्या संशोधनाचा व्याप महाकाय असून जवळजवळ हयातभर म्हणजे १९१७ पासून १९८५ पर्यंत सातत्याने ते आपल्या संशोधनात एकरूप झाले होते. म. म. पां. वा. काणे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, दत्तोपंत पोतदार, ग. ह. खरे इत्यादी संशोधक वगळता मिराशी यांनी केलेल्या संशोधनाइतका व्यापक आवाम कोणत्याही इतर भारतीय, मराठी अथवा पाश्चात्त्य संशोधकाच्या ठिकाणी दिसून येत नाही. संशोधन हे व्रत स्वीकारून आपल्या ज्ञानयज्ञाची सांगता करून नानासाहेब आपल्या अखेरच्या अवभृत स्नानास सिद्ध झाले होते ते माझ्याच चिरंजीवांच्या इस्पितळात नागपूर मुक्कामी ! तीन एप्रिल एकोणीसशे पंचाऐंशीत ! मिराशी यांचे संशोधन जसे प्रदीर्घ आहे तसेच त्यांना सुदैवाने आयुष्यही प्रदीर्घ लाभले होते. आणि अखेरच्या क्षणापर्यंत त्यांची प्रतिभा, प्रज्ञा आणि पांडित्य सजग अवस्थेत होते, हे विशेष ! आपला व्याण्णवा वाढदिवस त्यांनी अतिशय उत्साहात आणि प्रसन्नतेत घालविला होता. याच सुमारास त्यांचा अखेरचा (आता ठरलेला) ग्रंथ 'स्टडीज इन एन्शंट इंडियन हिस्ट्री' प्रसिद्ध झाला. व तो आपणास बघावयास मिळेल किंवा नाही. याविषयी नानासाहेब स्वतः साशंक होते व तसे त्यांनी ग्रंथाच्या प्रस्तावनेत नमूद केले होते. परंतु त्यांच्या जन्मदिनीच या ग्रंथाचे प्रकाशन झाले.

इ. स. १९१७ मध्ये डॉ. मिराशींनी संस्कृत विषय घेऊन मुंबई विद्यापीठाची एम. ए. ची पदवी मिळविली. वेदांत हा त्यांचा आवडीचा विषय होता. व लगोलग त्यांना संस्कृतचे सहाय्यक प्राध्यापक म्हणून एलफिन्स्टन महाविद्यालयात अध्यापनाचे काम मिळाले. १९१९ साली ते नागपूरमध्ये त्या वेळच्या मॉरिस कॉलेजमध्ये सहाय्यक प्राध्यापक म्हणून रुजू झाले. अखेरपर्यंत ते नागपूर येथेच वास्तव्य करून होते. विदर्भातील अमरावती येथील विदर्भ महाविद्यालयाचे ते प्राचार्य होते. व तेथून निवृत्त होताच त्यांनी आपले वास्तव्य नागपूर येथेच अखेरपर्यंत ठेवले संशोधनाच्या अभिक्रियेला विशेष चालना मिळावी म्हणून डॉ. मिराशी यांनी विदर्भ संशोधन मंडळाची स्थापना केली व त्याचे वार्षिकांक काढून विविध विषयातील संशोधकांना त्यात लिहिते केले. डॉ. मिराशी यांनी इंग्रजी, हिंदी आणि मराठी या तीन भाषांमधून लेखन केले व त्यापाठीमागे त्यांचा हेतू मूलतः आपले संशोधन अधिकाधिक लोकांपर्यंत पोहचवावे व त्यांतील सत्यांशाची छाननी व्हावी हा असे. इंग्रजी भाषेतील लेखनामुळे त्यांना जागतिक कीर्ती मिळाली. हिंदी भाषेतील लेखनामुळे भारतीय मान्यता मिळाली. आणि मातृभाषेतील लेखनातून ते संस्कृत, प्राकृत आणि मराठी साहित्याच्या गाभ्यापर्यंत पोहचू शकले. किंबहुना डॉ. मिराशी यांनी संशोधनाचा श्रीकार गिरविला तोही मातृभाषेतून आणि त्यांच्या संशोधनाची अखेर झाली तीही त्यांच्या अखेरच्या 'डॉ. कोलते यांचे प्राचीन भारतीय इतिहासविषयक संशोधन' (संशोधनाची क्षितिजे १९८५) या लेखाने ! इंग्रजी, मराठी आणि हिंदी या तिन्ही भाषांवर त्यांचे सारखेच प्रभुत्व होते.



अनुक्रमणिका

डॉ. मिराशी यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील कुवळे या गावी झाला. माध्यमिक व उच्चशिक्षण कोल्हापुरात झाले. एम. ए.ची पदवी त्यांनी मुंबईत घेऊन अध्यापनाच्या व्यवसायाला मुंबईतच सुरवात केली. व कालांतराने ते मध्यप्रांत वऱ्हाडात आले आणि नागपूर येथे स्थायिक झाले. कोकण, पश्चिम महाराष्ट्र आणि मध्यप्रांत, नागपूर वऱ्हाड ही डॉ. मिराशी यांची कर्मभूमी आणि कार्यक्षेत्र होते. त्या भूमीच्या परंपरेचा प्राचीन इतिहास आणि संस्कृतीचा शोध घेऊन जणू त्यांनी तिचे ऋण फेडले होते.

डॉ. मिराशी यांच्या संशोधनाला राजमान्यता आणि विद्वत्मान्यता ही सुरुवातीपासूनच मिळत गेली. १९४१ मध्ये भारत सरकारने त्यांना महामहोपाध्याय या पदवीने भूषविले. १९५१ मध्ये नाणकशास्त्र परिषदेचे ते अध्यक्ष झाले. १९५६ साली अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९५६ मध्ये भारताचे पहिले राष्ट्रपती बापू राजेंद्रप्रसाद यांनी त्यांना ताम्रपट देऊन गौरविले. सागर विद्यापीठ, नागपूर विद्यापीठ, वाराणसी विद्यापीठ आणि मुंबई विद्यापीठ यांनी डॉ. मिराशी यांना सर्वोच्च समजली जाणारी डी. लिट् ही पदवी देऊन सन्मानित केले. विविध विद्यापीठांच्या सर्वोच्च सन्मानित पदव्या मिळविणारे डॉ. मिराशी हे जगातील एकमेव भारतीय गणले गेले. १९६१ मध्ये डॉ. मिराशी इतिहास परिषदेचे अध्यक्ष झाले. व नाणकशास्त्र परिषदेने त्यांना डॉ. राधाकृष्णन यांच्या हस्ते सन्मान्य सभासदत्व बहाल केले. साहित्य अकादमी, कालिदास स्मारक समिती, साहित्य संस्कृतिमंडळ, शिवप्रतिष्ठान इत्यादी संस्थांनी डॉ. मिराशी यांच्या संशोधन कार्याचा गौरव केला आहे. १९७५ मध्ये भारत सरकारचा पद्मभूषण हा किताबही डॉ. मिराशी यांना मिळाला. डॉ. मिराशी यांच्याकडे चहूबाजूंनी सन्मान धावत आले. पण त्यांची संशोधनातील अविचल निष्ठा कधी ढळली नाही. आपल्या विद्यार्थ्यांवर त्यांचा अपार जीव होता. डॉ. भाऊसाहेब कोलते, डॉ. मा. गो. देशमुख हे त्यांचे विशेष जिव्हाळ्यातले विद्यार्थी होते. डॉ. मिराशी अमरावतीला प्राचार्य असताना हे दोघेही त्यांचे सत्‌शिष्य त्यांचे सहाध्यायी होते, सहकारी होते. संशोधनाची प्रेरणा डॉ. मिराशींनी आपल्या विद्यार्थ्यांमध्ये मुरविली व त्यातून एक संशोधकांची मोठी परंपरा विदर्भात निर्माण झाली आहे. मला आजही आठवते आहे. डॉ. माधवराव देशमुखांचा विदर्भ संशोधन पत्रिकेत 'मणिरामकविकृत शृंगार मंजिरी' हा लेख प्रसिद्ध झाला होता. व नानासाहेब मिराशी आमच्या त्या वेळच्या धंतोलीतील टिकेकर मार्गावरील सरनाईकांच्या बंगल्यात लेखांच्या कात्रणांसह सकाळीच उपस्थित झाले आणि त्या दोघांची चर्चा माध्यान्ह काळापर्यंत चालू राहिली. निरलस आणि निरपेक्ष बुद्धीने सत्याचा शोध घेण्याची अखंड ईर्ष्या डॉ. मिराशी यांच्या ठिकाणी होती हेच वरील उदाहरणावरून दिसून येते. त्यांचे व्यक्तिमत्त्व म्हणजे साधी राहणी, उच्च विचारसरणी या धर्तीचे होते. ते नेमके आणि नेटके बोलत असत. थांबून थांबून बोलण्याची अशी त्यांची एक शैली होती. सभासंमेलने आणि संप्रदाय, मठ यापासून ते सतत दूर असत. मूलतः ते रमून जात ते ताम्रपट शिलालेखांच्या रेषांमध्ये, शब्दांमध्ये! प्रापंचिक संकटांनी ते कधी कोसळले नाहीत किंवा टीकाप्रहारांनी कधी विचलित झाले नाहीत. धीरगंभीरता ही जशी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची ठेवण होती, तसेच त्यांचे संशोधनही अतिशय धीरगंभीर आणि वस्तुनिष्ठ असेच होते.

**भारतीय इतिहास आणि संस्कृतिसंशोधन**

डॉ. मिराशी यांच्या जवळजवळ सत्तर वर्षांतील संशोधनाचे दोन विभाग करता येतील. एक म्हणजे संस्कृत, प्राकृत मराठी साहित्यविषयक त्यांनी केलेले संशोधन आणि दुसरे म्हणजे भारतीय इतिहास आणि संस्कृतिसंशोधन हे होय. डॉ. मिराशींच्या संशोधनाचे हे दोन्ही भाग पुनः परस्परपूरक आणि परस्परानुप्रवेशी असे आहेत. कालिदास, भवभूतीचा शोध घेता घेता ते तत्कालीन ताम्रपट, शिलालेख राजवंश आणि नाणेसंशोधन करण्यात एकरूप होत असत, तर नाणे, राजवंश शोधनातून तत्कालीन साहित्याच्या शोधनापर्यंत येऊन पोहचत असत. या दृष्टीने डॉ. मिराशी हे एकमेव असे संशोधक ठरतात की, त्यांची शोधदृष्टी चतुरस्र वेध घेत घेत भारतीय सांस्कृतिक जीवनाचा शोध घेत जाते. अतिप्राचीन कालखंड साक्षात करीत असता मात्र सत्याचा अपलाप आणि पुराव्यांची निष्काळजी मांडणी ते खपवून घेत नसत.

नागपूर जिल्ह्यातील रामटेकजवळचे नंदिवर्धन हे वाकाटक राजांचे राजधानीचे ठिकाण होते. वत्सगुल्म (वाशीम) येथे या राजवंशाची दुसरी राजधानी होती. वाकाटकांनी जवळजवळ २५० वर्षे विदर्भावर राज्य केले. हा सारा इतिहास 'वाकाटक नृपती आणि त्यांचा

काल ' या डॉ. मिराशी यांच्या ग्रंथात आला आहे.कोकण आणि कोल्हापूर प्रांतात राज्य करणारे शिलाहार यांचाही मूलगामी शोध ' शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख ' या ग्रंथात घेतला गेला आहे. ' सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख ' हा ग्रंथ १९७९ साली साहित्य संस्कृती मंडळाने प्रसिद्ध केला. सातवाहनांचे राज्य महाराष्ट्र, गुजरात, मध्यप्रदेश,कर्नाटक,आंध्र या प्रांतापर्यंत पोहोचले होते. हा राजवंश महाराष्ट्रीय असून या राजांची राजधानी पुण्याजवळील जुन्नर असून नंतर ती प्रतिष्ठान (पैठण) येथे गेली. या तिन्ही ग्रंथांवरून महाराष्ट्राचा जवळजवळ दीड-दोन हजार वर्षांचा इतिहास सप्रमाण डॉ. मिराशी यांनी स्पष्ट केला व उजेडात आणला. ' कलचुरि नृपति आणि त्यांचा काळ ' हाही डॉ. मिराशी यांचा ग्रंथ महत्त्वपूर्ण ठरतो. डॉ. मिराशी यांचे हे इतिहास लेखन शास्त्रशुद्ध चिकित्सक आणि अस्सल साधनांवर आधारलेले आहे. तत्कालीन राजसत्ता, राजकीय, सामाजिक, धार्मिक परिस्थिती, साहित्यातून येणारे विविध पुरावे, स्थापत्य शिल्पकला आणि चित्रकला, तत्कालीन ताम्रपट, शिलालेख आणि नाणी यांचाही पुरावे म्हणून आधार घेऊन डॉ. मिराशी यांनी वस्तुनिष्ठ शोध लावले आहेत. व आपली विधाने सप्रमाण सिद्ध केली आहेत. सत्याचा शोध घेत असता तर्कशुद्ध विचारप्रणाली जशी ते मांडतात त्याचप्रमाणे कल्पनाशक्तीचेही विवेकपूर्ण उपयोजन करतात. त्यांच्या संशोधनाची पद्धती ही मूलतः विश्लेषणात्मक, संश्लेषणात्मक आणि निगमनात्मक (इन्डक्टिव्ह) अशी आहे. डॉं मिराशी यांचे हे सारे संशोधन प्राचीन महाराष्ट्राशी आणि त्याच्या इतिहासाशी निगडित असले तरी त्यांनी यादव राजांचे शिलालेख व ताम्रपट यांवरही अनेक लेखांमधून प्रकाश टाकला आहे. यावरून वाकाटक, शिलाहार, सातवाहन, कलचुरी, राष्ट्रकूट आणि यादव इत्यादी अतिप्राचीन महाराष्ट्रीय राजवंशांवर, त्यांच्या इतिहासावर आणि संस्कृतीवर डॉ. मिराशी यांनी प्रकाश टाकला आहे. व हे सर्व राजवंश महाराष्ट्रीय कसे होते हे सप्रमाण सिद्ध करून दाखविले आहे. व त्यासाठी आपल्या आधीच्या संशोधकांनी केलेल्या संशोधनाची दिशा समजावून घेत, त्यात नवी भर घालण्याचा प्रयत्न डॉ. मिराशी यांनी सतत केला म्हणूनच त्यांना जगन्मान्यता मिळाली. मॅक्समुल्लर, बूल्हर, कीलहार्न, ओल्डनबर्ग, ब्लूमफील्ड, मॅक्डोनेल या पाश्चात्त्य संशोधकांचे ऋण डॉ. मिराशी यांनी मान्य केले आहे. (संशोधन मुक्तावली सर : ७ पृष्ठ २१६)

महाराष्ट्रीय राजवंशांचा शोध घेत असतानाच ' महाराष्ट्र ' या देशनामाचाही साकल्याने विचार डॉ. मिराशी यांनी मांडला आहे. देशावरून भाषेला नाव पडते हे लक्षात घेता वररुचीच्या काळी ' महाराष्ट्र ' हे देशनाम प्रचलित होते, यात शंका नाही, हे डॉ. मिराशी यांचे मत सर्वमान्य झाले आहे. ' वऱ्हाड ' आणि ' विदर्भ ' यावरही डॉ. मिराशी यांनी प्रकाश टाकला आहे. वरदा तीरावरील प्रदेश ज्यामध्ये येतो तो वरदाकट > वरदातट होय. वरदातटाचे ' वऱ्हाड ' झाले असे डॉ. मिराशी यांनी संशोधन मुक्तावलीच्या ' प्राचीन विदर्भ ' सर तीन मध्ये संशोधन मांडले आहे. तसेच मराठी भाषेच्या उत्पत्तीसंबंधीही ' पहिला मराठी लेख कोणता ? असा प्रकाश टाकला आहे.

Studies in Indology च्या चार खंडांतून डॉ. मिराशी यांनी भारतीय इतिहास, संस्कृती, साहित्य आणि मूर्ती, शिल्प, नाणे यांवर भरीव संशोधन केले. असून तेही जगत्मान्य झालेले आहे.

**डॉ. मिराशी यांचे पुराभिलेख संशोधन**

प्राचीन संस्कृतीचा आणि इतिहासाचा शोध घेण्याची जी अस्सल साधने आहेत त्यांत शिलालेख आणि ताम्रपट यांचा सिंहाचा वाटा असतो. त्यांच्या साह्याने प्राचीन समाजजीवन, धर्म, साहित्य, भाषा, लिपी, राजवंश इत्यादी गोष्टींवर प्रकाश पडतो. पुराभिलेखांचे वाचन करणे ही अतिशय जिकिरीची गोष्ट असते. परंतु डॉ. मिराशी यांनी आपली प्रज्ञा, प्रतिभा आणि बहुश्रुतता या संशोधनासाठी सिद्ध ठेवली होती असेच त्यांच्या समग्र संशोधनातून लक्षात येते. सत्याचा पाठपुरावा करण्यासाठी दगडावरील रेषा त्यांना भक्कम आधार वाटत असत. विविध सूक्ष्मातिसूक्ष्म पुरावा स्वीकारून त्यांच्या साह्याने डॉ. मिराशी आपल्या गृहीत कल्पनेपर्यंत येऊन पोहोचतात, असे त्यांच्या पुराभिलेख संशोधनातून समजते. डॉ. मिराशी यांचे पुराभिलेखन संख्येने विपुल आहे. Epigraphica India च्या अकराव्या खंडापासून डॉ. मिराशी यांनी लेखनास प्रारंभ केला. व सदतीस-अडतिसाव्या खंडापर्यंत सातत्याने ते लेखन करीत राहिले. त्याशिवाय Indian Antiquary, Indian Historical Quarterly यामध्येही डॉ. मिराशी यांनी सातत्याने लेखन केले. नागार्धन ताम्रपटाची चर्चा,

वाकाटककालीन ताम्रपटातील पद्मपुरम्‌ची चर्चा, तृतीय इंद्रवर्धन राजाच्या तिथीच्या निमित्ताने झालेली चर्चा, पंडारण्यपल्ली दानपत्राचे पुनः संपादन करताना झालेली चर्चा यातून डॉ. मिराशी यांच्या स्वयंप्रभप्रज्ञेची साक्ष पटते. सत्यनिष्ठ संशोधनाचा एक परिणत संभार असे डॉ. मिराशी यांच्या संशोधनाविषयी बोलावे लागेल. त्यांची शोधदृष्टी नेहमी परिपूर्णतेकडे जाणारी आणि अंतिम सत्याचा शोध घेणारी अशी आहे. पुराभिलेख-शास्त्राच्या संशोधनाचा वस्तुपाठच डॉ. मिराशी यांच्या संशोधनाने उभा केला आहे. कुलचुरीचेही संवत्सराच्या संदर्भातील त्यांचे संशोधन असेच अतिशय मौलिक ठरले आहे. देवदत्त भांडारकर आणि डॉ. मिराशी यांचा झालेला वाद येथे स्मरतो. तसेच दिनेशचंद्र सरकार यांचेशी झालेले वाग्युद्ध विलक्षणच म्हणावे लागेल.

डॉ. मिराशी यांनी प्राचीन भारतीय इतिहासाचा कालपट आपल्या संशोधनातून संपन्नपणे प्रकट केला. प्राचीन इतिहास शोधण्याची साधने म्हणजे पुराभिलेख आणि नाणी ही होत. डॉ. मिराशी यांना या दोन्ही शास्त्रांत गती असल्यामुळे त्यांनी पुराभिलेख आणि नाण्यांच्या साह्याने भारतातील राजवंशांचे इतिहास सप्रमाण सिद्ध केले. भारत शासनाच्या पुरावस्तू खात्याने 'भारतीय उत्कीर्ण लेखसंग्रह' या प्रसिद्ध ग्रंथमालेचा चौथा, पाचवा व सहावा खंड म्हणून डॉ. मिराशी यांचे ग्रंथ प्रसिद्ध केले. एकूण सहा खंड पुरावस्तू खात्याने आतापर्यंत प्रसिद्ध केले आहेत त्यांतील तीन डॉ. मिराशी यांचे आहेत. ते असे : 1) The Corpus Inscriptions Indicarem Vol IV Inscription of Kalchuri-Chedi Era. 2) Vol V-Inscriptions of Vakatakas 3) History and Inscriptions of the Satavahanas and Western Kshatrapas पैकी 'सातवाहन आणि पश्चिम क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख' आणि 'कलचुरी-चेदी संवताचे कोरीव लेख' असे मराठी भाषेतूनही ग्रंथ भाषांतरित झाले आहेत. सूक्ष्म तपशील, अभ्यासपूर्ण प्रस्तावना आणि विपुल शिलालेख ताम्रपट यांचे संदर्भ असल्यामुळे या ग्रंथांतून डॉ. मिराशी यांनी घेतलेले परिश्रम आणि त्यामुळे त्यांना मिळालेली जगन्मान्यता यांचा पडताळा येतो.

**कलचुरी-चेदिसंवताचे कोरीव लेख**

डॉ. मिराशी यांनी द्विभागात्मक ग्रंथात एकूण एकशे अठ्ठावीस कोरीव लेखांचे वाचन, संपादन आणि पुनः-स्थापन केले आहे. हे सर्व लेख केवळ कलचुरीवंशीयाचे नाहीत. कॅप्टन वुइलफोर्ड, डॉ. जेम्स वर्ड आणि रेव्हरंड स्टीव्हनसन यांनी बनारसच्या ताम्रपटावरील कालोल्लेख चुकीचा वाचला गेल्यामुळे झालेले घोटाळे डॉ. मिराशी यांनी स्पष्ट केले आहेत व कलचुरी संवत आणि चेदिसंवत हे स्वतंत्र आहेत यावर प्रकाश टाकला व या संवताच्या प्रारंभकालाचा शोध घेतला व तो निश्चित केला. कलचुरी-चेदी संवत या नावाने ओळखला जाणारा संवत मूळचा कलचुरींनी सुरू केलेला नसून तो आभीरांचा मूळ असून पुढील काळात कलचुरी नृपतींनी व इतरांनी आपापल्या राज्यात सुरू केला.

**सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख :**

सातवाहन हा महाराष्ट्रातील ज्ञात आद्य राजवंश ठरतो. त्याच्या काळी राज्यशासन, धर्म, साहित्य व कला यांतील प्रगतीमुळे गौरवान्वित झालेला होता. पण मध्ययुगीन अंधारयुगात भारतीयांना त्याची आठवणही नव्हती. चैत्य व विहारलेणी महाराष्ट्रात नाशिक, कान्हेरी आणि कार्ले येथे सापडतात. पण ती पांडवलेणी आहेत असा गैरसमज होता. या लेण्यांतून लहानमोठे कोरीव लेखही उपलब्ध झाले व त्याच्या यथादृष्ट प्रती रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्ये प्रसिद्ध झाल्या. त्यांचे वाचन मात्र परिपूर्ण रीतीने झालेले नव्हते. रामकृष्णपंत भांडारकर, भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर, कीलहार्न, बॅनर्जी इत्यादी संशोधकांनी कार्ले, कान्हेरी आणि नाशिक येथील कोरीव लेखांचे वाचन आणि अनुवाद करण्याचा प्रयत्न केला होता. हे सर्व संशोधन डोळ्यांपुढे ठेवून डॉ. मिराशी यांनी 'सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख' हा प्रबंध इंग्रजी आणि मराठी भाषेतून सिद्ध केला. या ग्रंथाचे सरळ दोन भाग पडतात. पहिल्या भागात सातवाहन आणि क्षत्रप यांचा इतिहास आला असून दुसऱ्या भागात कोरीव लेखांच्या बरोबर नाणी, चित्रे, मूर्तिशिल्पे, ताम्रपट, शिलालेखांचे ठसे यांची छायाचित्रे आलेली आहेत. त्यातून डॉ. मिराशी यांचा व्यासंग लक्षात येतो. पुनः हे सर्व लेख प्राकृतात असल्यामुळे त्या सर्वांचा मराठी अनुवादही दिला गेला आहे.

महाराष्ट्राचा आद्य आणि वैभवशाली राजवंश सातवाहन आणि तत्कालीन महाराष्ट्र, गुजराथ, काठेवाड

आणि माळवा या प्रदेशांवर काही काळ राज्य करणारे पश्चिमी क्षत्रप यांचे सर्व उपलब्ध कोरीव लेख देणारा सर्वांगीण इतिहास सांगणारा असा हा ग्रंथ लिहून डॉ. मिराशी यांनी इतिहास लेखनाचा आणि संशोधनाचा एक मानबिंदू निर्माण केला आहे. त्यांच्या या व्यासंगाची सुरवात सातवाहन राजवंशाच्या नाण्यांच्या अभ्यासातून झाली. 'विदर्भातील तन्हाळा सातवाहन नाणीसंचय' या लेखापासून म्हणजे जवळजवळ १९४०–४५ पासून सातवाहन राजवंशाविषयीचे चिंतन डॉ. मिराशी करीत होते. या नाण्यांच्या अभ्यासातून मिळालेल्या पुराव्यांची इतिहासातील, साहित्यातील राजांच्या नावांशी आणि शिलालेखांशी सांगड घालून डॉ. मिराशी यांनी आपल्या संशोधनाला परिपूर्णता आणली त्यासाठी चित्रकला, शिल्पकला यांचेही संदर्भ त्यांनी तपासून घेतलेले दिसतात. सातवाहनकालीन सामाजिक, धार्मिक आणि आर्थिक परिस्थिती आणि साहित्य ही या ग्रंथातील प्रकरणे डॉ. मिराशींच्या परिपक्व परिणत प्रज्ञेची साक्ष देतात सातवाहन राजा हाल याच्या 'सत्तसई' मधील निवडक जानपद गीतांचाही विचार करून लोकसाहित्याच्या अंगाने तत्कालीन सांस्कृतिक जीवन तपासून घेतले आहे. सूची, शब्दकोश देऊन या संशोधित ग्रंथाला परिपूर्णता आली आहे. इतिहास आणि संस्कृती यांच्या संशोधनामुळे डॉ. मिराशी यांची गणना जगातील संशोधकांत होऊ लागली. इतके हे संशोधन मौलिक स्वरूपाचे आहे.

शिलाहार नृपतिविषयक डॉ. मिराशी यांचे संशोधनही मूलगामी स्वरूपाचे आहे. ९ व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंत कोकणात शिलाहारांची सत्ता होती. परदेशी त्यांचा व्यापार उदीम होता. त्यांनी अनेक मंदिरेही बांधली होती. डॉ. मिराशी यांना शिलाहारांचे साठ कोरीव लेख मिळाले व त्यांतून त्यांनी शिलाहार नृपतींवर नवा प्रकाश टाकला. शिलाहारांच्या सहा शाखांपैकी तीन शाखा मूळ असून त्या उत्तर कोकण, दक्षिण कोकण आणि कोल्हापूर परिसरात होत्या. व स्थानक (ठाणे), बालपट्टण (खारे पाटण) व कोल्हापूर या त्यांच्या राजधान्या होत्या. शिलाहार मूळचे कन्नड भाषिक असून तगरपूर > तेरणा > तेरयेथील ते रहिवासी होते. हे डॉ. मिराशी यांनी काही कानडी शिलालेखांच्या आधारे सिद्ध केले. कोरीव लेखांतून सीलार > शिलार > सिमलार > शैलाहार > शिलाहार असे उल्लेख मिळतात.

**मुद्रा संशोधन**

पुराभिलेखशास्त्र, इतिहास आणि संस्कृती, साहित्य यांप्रमाणेच नाणकशास्त्राचा व्यासंगही डॉ. मिराशी यांचा फार दांडगा होता. या विषयातील विविध सन्मान, पारितोषिके त्यांना मिळाली होती व त्यांचे या विषयावरील जवळजवळ पन्नास लेख आज उपलब्ध होतात. विदर्भात सापडलेल्या नाण्यांच्या अभ्यासातून डॉ. मिराशी यांनी विविध राजवंशावर प्रकाश टाकला. सातवाहन क्षत्रप, महिष, नल, कलचुरी, चंदेल इत्यादी राजवंशांच्या अभ्यासासाठी तत्कालीन नाण्यांचा महत्त्वपूर्ण साधनसामग्री म्हणून डॉ. मिराशी यांनी उपयोग करून घेतला. तन्हाळा या गावी सोळाशे सातवाहनकालीन नाणी असलेला संचय मिळताच डॉ. मिराशी यांच्या संशोधनाला चालना मिळाली व रॅप्सन आणि स्मिथ यांचे या बाबतीतील संशोधन कसे अपुरे आहे, हे त्यांनी सिद्ध केले. तन्हाळा संचयात एकूण अकरा शिलाहार राजांचीच नाणी आहेत. त्यांतील कुंभ सातकर्णी आणि कर्ण सातकर्णी या राजांची नाणी प्रथमच मिळाली होती. डॉ. मिराशी यांनी तन्हाळा नाणी संचयाच्या साह्याने सातवाहन राजांच्या इतिहासातील अनेक त्रुटी भरून काढल्या आहेत. विदर्भात सापडलेल्या क्षत्रप राजांच्या नाण्यांच्या अभ्यासातून तत्कालीन आर्थिक इतिहासही डॉ. मिराशी यांनी उभा केला. विविध पुराणांचा आधार घेऊन गौतमीपुत्र सातकर्णीचा पुत्र पुळुमावी याच्या कारकीर्दीत कुंतलदेश सातवाहन साम्राज्यात सामील झाला होता. नाण्यांच्या अभ्यासातून महिषक देशाचे भौगोलिक स्थान संस्कृत साहित्य आणि बौद्ध वाङमय यातील आधाराने निश्चित केले. विष्णुकुंडी नाण्यावरील डॉ. मिराशी यांचे भाष्यही अपूर्व ठरते. शिलालेखांतून आलेल्या नाण्यांच्या उल्लेखावरूनही अनेक गुंते डॉ. मिराशी यांनी सोडविले आहेत.

नागपूर विद्यापीठाच्या संशोधन प्रकल्पात Studies in Indology-Vol. III मध्ये Ancient Indian Coins यावरील डॉ. मिराशी यांचे संशोधन संगृहित झाले आहे.

**साहित्य संशोधन**

डॉ. मिराशी नागपूरच्या मॉरिस कॉलेजमध्ये १९१९ पासून संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काम करीत होते. त्या वेळी श्री. व्यं. केतकरांना त्यांच्या ज्ञानकोषाच्या महान कार्याबद्दल मानपत्र देण्याचा समारंभ डॉ. मिराशी

यांच्या अध्यक्षतेखाली ठरला. त्यात डॉ. केतकरांनी 'मालविकाग्निमित्र' या कालिदासाच्या नाटकावर, आणि कालिदासाचा स्वभाव, त्याचे ज्ञान, उज्जयनी व विदर्भ यांचे परस्परसंबंध याविषयी विलक्षण मते प्रसृत केली. डॉ. मिराशी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात तेथेच सर्व मतांचे खंडन केले आणि त्यांच्या साहित्य-संशोधनाला सुरवात झाली. नागपूरच्या 'महाराष्ट्र' या साप्ताहिकात सलग सहा लेखांची मालिका डॉ. मिराशी यांनी लिहिली व त्यातूनच 'कालिदास' हा त्यांचा महत्त्वपूर्ण ग्रंथ १९३४ साली प्रसिद्ध झाला. महाकवी कालिदासावरील हे पहिले संशोधन ठरले व डॉ. मिराशी यांना जागतिक कीर्ती मिळाली. या ग्रंथाच्या जवळ-जवळ सर्व भारतीय भाषांतून आवृत्त्या निघाल्या आहेत. या ग्रंथात कालिदासविषयक अनेक प्रश्नांचा ऊहापोह डॉ. मिराशी यांनी केला आहे. कालिदासाचा काळ यापूर्वी ख्रिस्तपूर्व पहिले शतक मानीत असत. व तो विक्रमादित्याच्या सभेत राजकवी होता असा समज होता. हा अपसमज साधार पुराव्यांच्या साह्याने खोडून काढून कालिदासाचा काळ, प्रदेश आणि चरित्र यावर त्यांनी नवीन प्रकाश टाकला व त्यातून कालिदास हा ख्रिस्तोत्तर चारशेच्या सुमारास गुप्त सम्राट द्वितीय-चंद्रगुप्त-विक्रमादित्य याच्या आश्रयास होता हे सिद्ध केले. कालिदासाच्या नाटचकृतींचे समालोचन आणि रसग्रहण करताना डॉ. कीथ आणि रवींद्रनाथ टागोर यांच्या मतांचाही साकल्याने ऊहापोह केला आहे. कालिदासाच्या संदर्भातील डॉ. मिराशी यांचे दुसरे पुस्तक म्हणजे 'मेघदूतांतील रामगिरी अर्थात रामटेक' हे होय. 'मेघदूत' या काव्यातील यक्ष ज्या रामगिरीवर वास्तव्य करून होता तो रामगिरी नेमका कोणता? यावर आपले संशोधन डॉ. मिराशी यांनी केंद्रित केले. व प्रो. विल्सन, प्रो. का. बा. पाठक यांच्या सिद्धांतांचा परामर्श घेतला.

मेघदूतातील रामगिरी म्हणजे मध्यप्रांतातील सरगुजा संस्थानातील रामगढ होय. या प्रो. पाठक यांच्या मताचा विचार करून डॉ. मिराशी यांनी वाकाटकांच्या ताम्रपटांवरून द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्य याने आपली कन्या प्रभावती ही वाकाटक राजा द्वितीय चंद्रसेन याला दिली होती. त्याच्या अकाली मृत्यूमुळे त्याचा पुत्र दिवाकरसेन राज्यावर आला. परंतु तो अल्पवयीन असल्यामुळे राणी प्रभावती राज्यकारभार बघत असे. तिच्या मदतीसाठी काही अधिकारी चंद्रगुप्ताने पाठविले, त्यांत कवी कालिदास होता. वाकाटकांची राजधानी नंदिवर्धन म्हणजे रामटेकजवळील नगरधन ही होती. तेथून विष्णुपूजेसाठी राणी रामगिरीला येत असे. त्या वेळी कालिदासाला 'मेघदूत' काव्य स्फुरले असावे म्हणून मेघदूतातील रामगिरी म्हणजे रामटेकच होय, हे ताम्रपट, मुद्रा यांच्या संशोधनातून सिद्ध झाले व हे मत आज सर्वमान्य झाले असून रामटेकला महाराष्ट्र शासनातर्फे कालिदास स्मारकही उभारले गेले आहे. या ग्रंथात 'रामगिरीविषयक अन्य मतांचे परीक्षण', 'मेघदूतातील रामगिरी ते विदिशा हा मेघमार्ग', 'यादव नृपती रामचंद्र याचा रामटेक येथील शिलालेख', 'प्रभावती गुप्ताचा ऋद्धपूर ताम्रपट', 'रामटेक येथील देवालय व तीर्थे यासबंधी महानुभावीय ग्रंथातील उतारे' इत्यादी प्रकरणांतून साद्यंत माहिती पुराव्यासह सिद्ध केली आहे. डॉ. मिराशी यांच्या संशोधनदृष्टीचा विशेष या वेळी लक्षात येतो तो म्हणजे, विशिष्ट विषयाचे चुकीच्या मार्गाने चालू असलेले संशोधन लक्षात घेऊन ते आपली लेखणी परजतात व सर्व पुराव्यानिशी ते सिद्ध होतात. आधी स्वतंत्र लेखरूपाने किंवा लेखमालिकांनी विषयविवेचन घडत जाते व एकूण विषयाचे महत्त्व जाणून त्यातून समग्रतेने आणि साकल्याने ग्रंथ-निर्मिती केली जाते. पुन्हा हे ग्रंथ इंग्रजी, मराठी व हिंदी भाषेतून कधी अनुवादित होतात किंवा कधी डॉ. मिराशी यांनी स्वतः ते लिहिले आहेत. पुन्हा आपल्या संशोधित लेखांचे संकलन म्हणजे डॉ. मिराशी यांची ग्रंथसंपदा नसते. पुन्हा नव्या नव्या पुराव्यांची आणि मांडणीची भर पडून तो ग्रंथ सर्वांगपरिपूर्ण झालेला असतो.

**भवभूती :**

कालिदासाप्रमाणेच दुसरा महाकवी आणि विदर्भकवी भवभूती हाही डॉ. मिराशी यांच्या चिंतनाचा विषय ठरला आहे. १९६८ मध्ये प्रथम मराठीतून आणि १९७४ मध्ये इंग्रजीतून हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. भवभूतीच्या साहित्याचे व चरित्राचे संशोधन करणारा हा एकमेव व पहिलाच मराठीतील ग्रंथ म्हटला पाहिजे. संशोधन मुक्तावलीच्या पहिल्याच सरात 'भवभूतीचे जन्मस्थान', 'भवभूतीच्या नाटकातील कालप्रियनाथ' हे दोन लेख आलेले होते. भवभूतीचे जन्मस्थळ, देशकाळ, तत्कालीन परिस्थिती आणि त्याच्या व्यक्तित्वाचा विकास याविषयीची महत्त्वपूर्ण सामग्री डॉ. मिराशी यांनी या ग्रंथात उपलब्ध करून दिली आहे. व भव-

भूतीच्या नाटकांचा रसास्वादही घेतलेला आहे. तसेच भवभूतीची नाटके ज्याच्या जत्रेत प्रथम रंगभूमीवर आली तो कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनी येथील महाकाळ नसून काल्पी येथील सूर्यदेव होय, हा डॉ. मिराशी यांचा सिद्धांतही सर्वमान्य झाला आहे.

भवभूतीने ' महावीरचरित ' नाटकात आपले जन्म-स्थान म्हणून ' अस्ति दक्षिणापथे पद्मपूरनाम नगरम् ' असे सांगितले आहे. ' मालतीमाधव ' नाटकाच्या प्रस्तावात तो म्हणतो ' अस्ति दक्षिणापथे विदर्भेषु पदम्पूरम् नाम नगरम्...' पण डॉ. कनिंगहॅम यांनी ग्वाल्हेरच्या नैऋत्येकडील पन्नास मैलांवरील नरवर हे भवभूतीचे जन्मगाव ठरविले तर डॉ. गर्दे यांनी पद्मावती म्हणजे नरवर हे गाव नसून त्याच्या जवळचे ' पवामा ' किंवा ' पदम्पवामा ' हे असले पाहिजे हे सिद्ध केले. या सर्वांचा परामर्श घेऊन डॉ. मिराशी यांनी साधार विवेचन केले व ते आता मान्य झाले आहे. त्यासाठी त्यांनी वाकाटकांच्या ताम्रपटातील ' पदम्पुराम् ' ही संकल्पना आधारासाठी घेतली होती.

संस्कृत साहित्यविषयक या तीन महत्त्वपूर्ण ग्रंथांशिवाय डॉ. मिराशी यांनी शेकडो शोधनिबंध लिहिलेले उपलब्ध आहेत. किंबहुना ' संशोधन मुक्तावली ' सर एक ते दहा मध्ये आणि स्टडीज इन इण्डॉलॉजीच्या खंडातून ते आलेले आहेत. त्यात संस्कृत नाटकातील मत्तवारिणी, दशकुमारचरित, हर्षचरित लघुसिद्धान्त कौमुदी, हालाची गाथा सप्तशती, रामायण, रामाच्या मूर्ती, रावणलंकेचे स्थान, वाल्मीकी व अगस्त्य यांची आश्रमस्थळे, रघुवंश, काणे यांचा धर्मशास्त्राचा इतिहास, काव्यमीमांसा, पुराणे, नेवासे उत्खननाचा वृत्तांत, ज्ञानेश्वरी, बाणाचे साहित्य, गुणाढ्याचा स्थळकाळ, विक्रमसंवत आणि शकसंवत, स्थापत्य व शिल्प, कोल्हापूरचे महालक्ष्मी मंदिर, धारशिवची लेणी बौद्ध की जैन, मार्कंडेय मंदिर, मृच्छकटिक, एक प्राचीन कविमंडळ, सोड्ढलाची उदयसुंदरी कथा— अशी कितीतरी नावे नमूद करता येतील.

प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती याविषयीचे आणि संस्कृत साहित्याविषयीचे डॉ. मिराशी यांचे संशोधन थक्क करणारे असे आहे. पाश्चात्य संशोधनशास्त्रातून प्रगत झालेली शोधदृष्टी आणि भारतीय संशोधनशास्त्रातून परंपरेने आलेली शोधदृष्टी यांचा समन्वय डॉ. मिराशी यांच्या संशोधनातून व्यक्त होतो. तपशिलांचे बारकावे, पुराव्यांची सत्यता, परंपरेचा धागा आणि विविध जीवनकक्षांतून हाती आलेले सत्याचे कण यांच्या जुळणीतून आणि शिस्तबद्ध मांडणीतून डॉ. मिराशी यांचे संशोधन परिपूर्ण झाले आहे. म्हणूनच ' संशोधन मुक्तावली ' च्या पहिल्या सरापासून दहाव्या सरापर्यंत किंवा ' स्टडिज इन इन्डॉलॉजी ' च्या चारही खंडांत केवळ एका एका विद्याशाखेतील संशोधनाला स्थान मिळालेले नाही, तर ताम्रपट शिलालेखांबरोबर नाण्यांचा विचार केलेला असतो व नाण्यांच्या विचारातून राजवंशावर, संस्कृतीवर, समाजजीवनावर डॉ. मिराशी प्रकाश टाकीत असतात. त्यासाठी आधाराला म्हणून मेघदूत, रामायण, सत्तसई, मृच्छकटिक इत्यादी साहित्यकृतीही स्वीकारलेल्या असतात. डॉ. मिराशी यांच्या अनेक विद्याशाखाशरण आणि गुंतागुंतीच्या आविष्कार अभिव्यक्तीमुळे त्यांचे संशोधन अतिशय व्यामिश्र आणि व्यापक झाले आहे. संशोधन हेच जणू डॉ. मिराशी यांचे जीवनाच्या गाभ्याशी समरसून गेलेले चिंतन होते. तत्परता, विषयाचा वेध घेण्याची हातोटी, सत्यशोधनातील तळमळ, त्यासाठी केलेला व्यासंग हे त्यांच्या जीवन जगण्याशी जणू एकरूप झाले होते. मृत्यूची भीती डॉ. मिराशींना वाटत नव्हती. उलट अचानक जर तो आला तर हाती घेतलेले काम राहून जाईल याचीच बोच आणि खंत त्यांना शेवटी शेवटी लागून राहिली होती. आधुनिक भारतातील संशोधनाचे महर्षी, असे त्यांना म्हणत असत. याचे कारण सभासंमेलनापेक्षा पुस्तकांची, ताम्रपट शिलालेखांची सोबत त्यांना अधिक महत्त्वाची वाटत असे. डॉ. मिराशी यांच्या संशोधनाचा मूळ पाया म्हणजे त्यांच्या दृष्टीची भेदकता, अचूकता आणि वाचनाची अद्ययावतता हा आहे. एखाद्या लढवय्याने रणांगणावर विविध डावपेच करीत विजय मिळवावा तसे डॉ. मिराशी हे संशोधनातील लढवय्ये ठरतील. सत्याच्या परिपूर्णतेचा प्रदेश पादाक्रांत करण्यासाठी पुराभिलेख, नाणी, शिल्प, चित्रकला, प्राकृत भाषा, लोककला, इतिहास, संस्कृती आणि साहित्य अशा अनेक आघाडयांतून पुढे जात अंतिम निर्णयापर्यंत ते येऊन पोहोचत. अजूनही त्यांच्या निष्कर्षांना कुणी आव्हान दिलेले ऐकिवात नाही. नानासाहेब मिराशी यांनी संशोधकाची एक पिढी निर्माण केली, तिला मार्गदर्शन केले आणि संशोधनाचा वस्तुपाठ तिच्याकडून गिरवून घेतला. विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर विद्यापीठ,

विदर्भ साहित्य संघ या संस्थांवर त्यांनी अपत्यवत् प्रेम केले. आपल्या विशाल अशा विद्यार्थीवर्गाचे ते आवडते 'सर' होते. डॉ. मिराशी यांचे संशोधनाचे स्वरूप विघातक नसून विधायक होते. काटेकोरपणा, वक्तशीरपणा, चिकित्सावृत्ती, सत्यदर्शनातील निर्लेपता आणि 'अहंकाराचा वारा न लागो भाषा शरीरा' अशी वृत्ती. यामुळे डॉ. मिराशी यांचे संशोधन त्या त्या क्षेत्रात अद्वितीय ठरले आहे.

डॉ. नानासाहेब मिराशी हे प्रतिभावंत संशोधक आणि सहृदय आस्वादक रसिक होते. ते कुशल अधिकारी होते, तसेच प्रेमळ पिता आणि शिक्षकही होते. काही वर्षांपूर्वी त्यांचे विद्वान सुपुत्र डॉ. मिराशी कर्करोगाने मृत्यू पावले, पण नानासाहेबांच्या ठिकाणचा स्थितप्रज्ञ अविचल राहिला. डॉ. मिराशी यांच्या संशोधनाचा वारसा पुढील शतकातील संशोधकांना दीपस्तंभासारखा प्रकाश देत राहील यात शंका नाही.

## म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांची ग्रंथसंपदा

**मराठी ग्रंथ :**

१) कलचुरि नृपति आणि त्यांचा काल–१९५६.
२) कालिदास– १९३४ (प्र. आ.) १९५७ (द्वि.आ.)
३) भवभूती–१९६८.
४) मेघदूतांतील रामगिरी अर्थात् रामटेक–१९५८
५) वाकाटक नृपति आणि त्यांचा काल–१९५७
६) विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक १९५८–१९५९
७) शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख–१९७४
८) संशोधन मुक्तावली सर १ ते ९–१९५४ व १९७९
९) सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रय यांचा इतिहास आणि कोरीव लेख–१९७९

डॉ. मिराशी फेलीशीटेशन व्हाल्यूम (इंग्रजी)–१९६५. संपा–ग. त्र्यं. देशपांडे, ए. एम. शास्त्री आणि व्ही. डब्ल्यू करंबेळकर (विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर)

**इंग्रजी ग्रंथ :**

1) Inseriptions of the Kalachuri chedi Era.
2) Inseriptinns of the Vakatakas.
3) Inseriptions of Silaharas.
4) Studies in Indology Vol-I to IV
5) Kalidas.
6) Studies in Ancient Indian History.

**हिंदी– उरिया, कानडी, तमीळ, तेलगू :**

१) कालिदास
२) भवभूती.
३) मेघदूतमें रामगिरी अर्थात् रामटेक.
४) कलचुरी नरेश और उनका काल
५) वाकाटक राजवंश का इतिहास तथा अभिलेख

**वा. वि. मिराशी--चरित्रविषयक लेख :**

१) महाराष्ट्रीय संशोधकासोबत एक संध्याकाळ (मुलाखतकार. भास्कर नंदनवार) : सोबत –३० मार्च १९७५
२) म. म. डॉ. वासुदेव विष्णु मिराशी– पुरुषार्थ मार्च १९६८
३) संशोधन महर्षी डॉ. वा. वि. मिराशी– वि. भि. कोलते. म. टाइम्स–२१ एप्रिल १९८५
४) श्रेष्ठ संशोधकाचा अस्त–शोभना गोखले: केसरी– १४ एप्रिल १९८५

**वा. वि. मिराशी–स्फुट लेख :**

१) अय्यण वंशचरित–एक बनावट ऐतिहासिक संस्कृत काव्य: भा. इतिहास आणि संस्कृती : जाने. १९७४
२) गुणाढ्य आणि बृहत्कथा, धर्मभास्कर : फेब्रु. १९७८
३) मूळ हरिवंशाचा काल– नवभारत : ऑगस्ट १९७०
४) 'सेतुबंधा'ची समस्या– नवभारत : मार्च १९७८
५) त्रिभाषा सूत्रात संस्कृतचे स्थान– नवभारत : दिवाळी १९७०
६) पेटिकाशीर्षक लिपी (बॉक्सहेडेड कॅरेक्टर्स)– युगवाणी: एप्रिल-मे १९७४
७) कोल्हापूरच्या महालक्ष्मीचे देवालय कोणी व केव्हा बांधले– नवभारत : फेब्रु. १९७४
८) प्रा. शेंववणेकर यांचे गजाननविषयक अभिनव संशोधन– नवभारत : जाने. १९६५
९) आभीर नृपती यांचा नागार्जुनीकोंड येथील शिलालेख– भा. इतिहास आणि संस्कृती : जुलै १९६५
१०) उत्तर कोकणच्या शिलाहारांच्या इतिहासावर नवीन प्रकाश-इतिहास आणि संस्कृती : एप्रिल १९७०
११) कालिदास गुप्तकालातच होऊन गेला– तरुण भारत (नागपूर) : १२ एप्रिल १९७० पृ. १५

...४

१२) गुणाढ्याचे जन्मस्थान– भा. इ. आणि संस्कृती : जाने. १९७७

१३) गुप्तकालातील एक समस्या : रामगुप्तलेख. १. नवभारत : डिसें. १९६९ पृ. ३०. ले. २. नवभारत : जाने. १९७०

१४) गुप्तांच्या इतिहासातील एका कालखंडावर नवीन प्रकाश– नवभारत : ऑगस्ट १९७८

१५) ताजमहाल पूर्वी शिवमंदिर होता काय ?– सा. तरुण भारत (नागपूर): (१०।१२।६७ पृ. ५)

१६) दहिगाव येथील क्षत्रप आणि त्रैकूटक नाण्यांचा संचय तरुण भारत (नागपूर): डिसें. ७२

१७) पहिला मराठी कोरीव लेख कोणता ?– म. सा. पत्रिका : जुलै–सप्टें. १९६८

१८) पूर्वकालीन राष्ट्रकूटांच्या मानपूर राजधानीचा शोध–नवभारत : ऑक्टो. १९८०

१९) श्री. पु. ना. ओक आणि बटेश्वरचा शिलालेख- सा. तरुण भारत : फेब्रु. १९६८

२०) प्राचीन महाराष्ट्राचा थोर राजा गौतमीपुत्र सातकर्णी– धर्मभास्कर : दिवाळी १९७८

२१) भारतीय युद्धाचा काल– नवभारत : ऑक्टो. १९७६

२२) माळव्याच्या प्राचीन इतिहासावर नवीन प्रकाश– इतिहास आणि संस्कृती : एप्रिल १९७१

२३) रामगढ हा मेघदूतातील रामगिरी नव्हे युगवाणी : सप्टेंबर १९७२

२४) रामदेवराव यादवांचा एक अपूर्ण ताम्रपट– भा. इतिहास आणि संस्कृती : जुलै १९७०

२५) रावणाच्या लंकेचे स्थान– नवभारत : जून १९७४

२६) वाटेगाव येथील सातवहान नाण्यांचा संचय– एप्रिल १९७३

२७) विदर्भाच्या वाकाटकपूर्वकालीन इतिहासावर नवीन प्रकाश–तरुण भारत– १९७५

२८) सातवाहन कुलोत्पन्न राजाच्या मातृनामनिदर्शक नावाची व्युत्पत्ती– नवभारत : सप्टेंबर १९७७

२९) हूणविजेता यशोधर्मन याच्या चरित्रावर नवीन प्रकाश– नवभारत : फेब्रुवारी. १९८० ■

## साभार स्वीकार

### कविता

**सांजउन्हे** : व. शं. खानवेलकर; मंगला खानवेलकर, डोंबिवली; १९८६; रु. १२ △ **रत्नमाळा** : ब्रह्मानंद देशपांडे–संपादक; राऊळ प्रकाशन, औरंगाबाद; १९८६; रु. ८० △ **अक्षर** : सुहासिनी इर्लेकर; धारा प्रकाशन, औरंगाबाद; १९८४; रु. २० △ **पाहून यावे नव्या जगाला** : रजनीनाथ; सौ. रजनी पटवर्धन, पुणे ४; १९८६; △ **कविता सायलीच्या** : शैला सायनाकर; प्रचार प्रकाशन, कोल्हापूर; १९८६ रु. २० △ **शब्दांकित** : प्रकाश कामतीकर; नवल पब्लिकेशन सेलू; १९८६; रु. २० △ **माझिया गजला मराठी** : खावर; लखोटा प्रकाशन, तळेगाव दाभाडे; १९८६; रु. १५ △ **गावच्या आठवणी** : मोहन सोनवणे; संदीप प्रकाशन, पुणे २; १९८६; रु. ११ △ **महेश्वर पंडितांचे श्रीऋद्धिपूरमाहात्म्य** : ज. शा. देशपांडे–संपादित; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; १९८५; रु. १२ △ **परमार्थबोध** : दि. श्री. दुनाखे– संपादित; श्रीधरस्वामी स्मारक ट्रस्ट, नाझरे; १९८६; रु. ८ △ **समाधी** : बाळासाहेब वोरसे; मंगल प्रकाशन, नागपूर १०; १९८४; रु. ६ △ **सत्यम् शिवम् सुंदरम्** : कवी मकरंद; शहा प्रकाशन, सातारा; १९८६; रु. ३ △ **मंजुमेघ** : डॉ. दत्तात्रेय जोग; मनोहर ग्रंथमाला प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. १० △ **रानकामुन्या** : उषा भालेराव; डॉ. शशिकांत वाघ, औरंगाबाद; १९८६; रु. २० △ **ध्वजवंदन** : नृसिहाग्रज; ललिता जोशी, पाटील चाळ, दौंड; १९८२; रु. ५ △ **अरुण** तुकाराम खिल्लारे–संपादक; जीवन प्रकाशन, सोनखेड; १९८६ रु. १७ △ **खातीचे थेंब** : सरोजिनी ताम्हणे, मनोहर ग्रंथमाला प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. १० △ **बाळांसाठी गाणीच गाणी** : राजा मंगळवेढेकर; शैलेन्द्र प्रकाशन, पुणे; १९८६ रु. १० △ **धमाल** : राजा मंगळवेढेकर; शैलेन्द्र प्रकाशन, पुणे; १९८६ रु.२० △

# शंकर पाटील : कथा विशेष / मधु जामकर

शंकर पाटलांची कथा वाचताना या कथेत हरिभाऊंची स्फुट गोष्ट, गुर्जरांची संपूर्ण गोष्ट, दिवाकर कृष्णांची लघुकथा, फडक्यांच्या कथेतील व्यक्तिचित्रण आणि गाडगीळांच्या कथेतील व्यक्तिमनाचे दर्शन अशा विविध अवस्थांतून वाटचाल करणाऱ्या मराठी कथेचा संपूर्ण कायापालट झालेला, उच्च असा कलात्मक बिंदू दिसतो. पाटलांनी जी कथा लिहिली ती सर्वस्वी 'ग्रामीण' आहे, हे तिचे वैशिष्टच नसून तीत वावरणारी सर्वच पात्रे प्रादेशिकतेच्या, ग्रामीणतेच्या तेथील संस्कृतीच्या सीमा-रेषा ओलांडून केवळ मानवी मनाच्या मूलभूत रेषा स्वतः-भोवती आखून घेतात हे तिचे विशेष आहे. या कथेने ग्रामीण जीवनाचा परिसर ओलांडून, ग्रामीण बोलीतून स्वतःचे भावविश्व सार्वत्रिकतेच्या कुशीत समृद्ध केले आहे. पाटलांच्या पूर्वी अशी ग्रामीण कथा व्यंकटेश माडगूळ-करांनी लिहिली होती. पण या कथेत अवास्तव असे व्यक्तीचे स्तोम आले होते. माडगूळकरांची 'माणदेशी माणसं' त्यांच्या भोवती असणारा परिसर जिवंत करतात; पण त्यावर स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा ठेवून या परिस-रास केवळ आपलेसे करतात. त्यामुळे ही माणसं स्थूल व एकसूरी वाटतात. याउलट पाटलांच्या कथेतून ग्रामीण परिसराबरोबरच एखाद्या व्यक्तिमनाचा शोध वेगवेगळ्या भूमिकेतून आणि वेगवेगळ्या पातळ्यांवरून घेता येतो. या कथेतील व्यक्तीचे बाह्यविश्व आणि अंतरंग यामध्ये एक अतूट संबंध राहतो. या कथेत जे अनुभवविश्व साकार होताना दिसते तेच मुळी स्वयंपूर्ण असते. पाटलांची कथा एकाच वेळी माणूस, त्याचे बाह्यविश्व, त्याचे अंतर्विश्व, त्यांच्यातील परस्परसंबंध, त्यातील गुंतागुंत, त्यांच्या कुटुंबातील माणसांची मने यांचा शोध तळापर्यंत जाऊन घ्यायला लावते. ही कथा प्रकृतीचा विचार करताना ग्रामीण वाटते, तर प्रवृत्तीचा विचार करताना ती नागरी वाटते. वस्तुतः ग्रामीणता हे तिचे वैशिष्ट्य नाही, ते तिचे मूल्यही नाही. तर मानवी मनाच्या स्पंदनाशी नाते दृढ करणे व वाचकांना केवळ याच स्पंदनांची शाश्वत अशी भावानुभूती देणे हे तिचे कार्य आहे. पाटलांच्या अगोदर ग्रामीण कथेचा पहिला कलात्मक टप्पा व्यंकटेश माडगूळकर. त्यांनाही पाटलांच्या कथेची मजल गाठता आली नाही. नंतरच्या टप्प्यात येणारे ग्रामीण कथाकार आनंद यादव हे देखील पाट-लांच्या कथेशी स्पर्धा करू शकत नाहीत. त्यापुढेही ग्रामीण कथाकार सखा कलाल थोडेफार पाटलांजवळ येतात आणि तिथेच रेंगाळतात. सखा कलाल यांची 'ढग' ही कथा आणि शंकर पाटलांची 'ऊन' ही कथा ही जुळी भावंडे वाटतात. मराठी ग्रामीण कथा ज्या विविध वळणातून आज वाटचाल करीत स्वतःचे आगळे वेगळे वैशिष्ट्य दाखवीत आहे, तिचा विचार करता शंकर पाटील आज तरी मानदंडाची कथा बाळगून आहेत.

शंकर पाटील हे अभिजात कथाकार असल्यामुळे त्यांना वेळीच कुठे थांबावे याचे भान आहे. त्यांनी एके ठिकाणी A champion cannot retire like anyone-else असा हेमिंग्वेचा दाखला दिला असला तरी आपल्या कथेत कसदारपणा व पृथगात्मता असली पाहिजे याची ते दखल घेतात. 'लिहिणे' ही क्रिया त्यांच्या दृष्टीने महत्त्वाची नसून, आपण का लिहितो या प्रश्नाने ते अस्वस्थ होतात व याच अस्वस्थतेची कथा ते सादर कर-तात. व्यंकटेश माडगूळकर किंवा आनंद यादव यांनी ग्रामीण कथेबरोबर ग्रामीण कादंबरीही लिहिली. इतरही वाङमय प्रकार हाताळले. हे दोन्ही लेखक अजूनही लिहितात. त्यांचे लिहिणे थांबले नाहीच. पण हे सर्व लेखन अस्वस्थता देणारे नाही. माडगूळकरांची 'माणदेशी माणसं' किंवा आनंद यादवांची 'गोतावळा' तुम्हा आम्हाला ज्या अस्वस्थतेवर नेऊन सोडतात ती अस्व-स्थता माडगूळकर 'करुणाष्टक' किंवा 'सत्तांतर' मधून अथवा आनंद यादव 'माऊली' किंवा त्यांच्या आत्मपर लेखनातून देत नाहीत. असे असूनही या लेख-

कांची लेखणी थांबत नाही. या पार्श्वभूमीवर शंकर पाटलांचे 'थांबणे' अधिक कलापूर्ण वाटते. 'टारफुला' सारखी समर्थ ग्रामीण कादंबरी त्यांनी लिहिली व ते थांबले आणि कथेत सुद्धा कलात्मकता व अस्वस्थता यांचा सांधा जुळत नाही हे कळताच त्यांचे कथालेखनही थांबले. अर्थात 'कलावंताच्या हुकमतीची कुंडली' कुणालाही मांडता येत नाही हे जरी खरे असले तरी तडजोडवादी भूमिकेने 'मागणी तसा पुरवठा' कलावंताने करू नये हे देखील खरेच आहे.

शंकर पाटलांच्या कथेचा विशेष हा की ती ग्रामीण परिसरात वाङ्मयबाह्य कारणापासून अगदी दूर आहे. ग्रामीण कथेचा झेंडा घेऊन पाटील कधीच साहित्य विश्वात वावरले नाहीत. ग्रामीणता हे आपल्या कथेचे भूषण त्यांनी कधीच मानले नाही. आजचे ग्रामीण वाङ्मय 'सवता सुभा' स्थापन करीत आहे. ग्रामीण कथाकार स्वतःची अशी चळवळ करू पाहतात. ग्रामीण कथेच्या नावाखाली स्वतःच्या अस्मिता दाखवून 'ग्रामीण साहित्य संमेलनाची' गरज सांगितली जाते. या पार्श्वभूमीवर शंकर पाटील अगदी वेगळे वाटतात. आज जी ग्रामीण वाङ्मयाची स्वतंत्र चूल मांडली जाते, त्यापासून ते दूर तर आहेतच. पण या संमेलनात देखील ते वावरत नाहीत. आपण एक प्रतिभेचे देणे असलेले कलावंत आहोत, यावर त्यांची श्रद्धा आहे. कलेशी सातत्याने इमान राखणे हे आपले ध्येय आहे. आपल्या वाङ्मयास जे 'ग्रामीण' विशेषण लावले जाते ते एक 'साधन' आहे. 'वाङ्मय' हे आपले साध्य आहे याची त्यांना सर्वस्वी जाण आहे. मराठी वाङ्मयाचा इतिहास लक्षात घेता ज्या कलावंतांनी आपल्या कलाकृतींचा चळवळीसाठी उपयोग केला, त्या सर्वस्वी साधन-साध्य या धुमश्चक्रात अडकून गेल्या. परिणामी त्यांना श्रेयसाकडून प्रेयसाकडे यावे लागले. प्रेयस्प्रतिभा नेहमीच सवंग लोकप्रियतेतून स्वतःचे वेगळे रूप दाखवते. वाङ्मयबाह्य कारणातून आपण वेगळे आहोत असे दाखविण्याचा तिचा प्रयत्न केविलवाणा असतो. या प्रदर्शनी धडपडीतून मराठी मनाचा, संस्कृतीचा, चांगल्या परंपरेचा वाङ्मयीन विकास तर होत नाहीच, उलट स्वत्व गमावलेले वाङ्मय मात्र हाती येते. सुदैवाने शंकर पाटील या सर्वांपासून अलिप्त आहेत, त्यांची कथा ग्रामीण असूनही ती सर्वांची वाटते ती यामुळेच, तिने दाखवेगिरी कधीच केली नाही. स्वतःचे स्तोम कधीच माजवले नाही.

शंकर पाटलांची कथा वेगवेगळे प्रयोग करते. पण ते अनुभवाचा शोध घेण्याच्या संदर्भात होतात. त्यांनी आपल्या कथेत जी ग्रामीण बोली वापरली आहे ती देखील कथेचा तळ दाखवीत आपल्या आशयाशी एकरूप होणारी आहे. आपले अनुभव आपण बाहेरून घेत नसतो तर ते आतून घेत असतो, ह्याची त्यांना योग्य ती जाण असल्यामुळे ही कथा आपली घटकावयवे स्वतंत्र दाखवीत नाही, ती स्वयंपूर्ण असते, शिवाय या कथेचा प्रयोगही 'आंतून'च आल्यामुळे ते त्याची स्वतंत्र जाणीव करून देत नाहीत. त्यांच्या कथेचा घाट अनुभवांतर्गत असतो. दुधात साखर जशी विरघळून जावी तशी ही बोली पाटलांच्या कथेत विरघळून जाते. ग्रामीण वाङ्मयाचा विचार करताना ही बोलीभाषा एक तर या कथेला उपरी तरी असते किंवा समग्र कथा या बोलीखाली चेंगरून तरी जाते. पाटलांच्या कथेत या दोन्ही बाबी दिसून येत नाहीत. शिवाय ही बोली भाषा ग्रामीण व नागरी असा भेदभाव न करता माणसांच्या मूलभूत व शाश्वत अशा जाणिवा यांनाच स्पर्श करणारी असल्यामुळे तिचे स्वतंत्र असे वैशिष्टय भाषिक पातळीवर न राहता ते सदैव मानसिक पातळीवर राहते. केवळ या बोलीभाषेमुळे ग्रामीण वाङ्मय वेगळे वाटले तरी या वेगळेपणात कलेची बूज राहीलच याची शाश्वती नाही. उलट अशा कथेत या ग्रामीण बोलीशिवाय इतर काही दिसतच नाही. शंकर पाटलांच्या कथेत जी ग्रामीण बोली येते ती कलावंताच्या व्यक्तिमत्त्वासह व हेच व्यक्तिमत्त्व आपल्या ग्रामीणतेचे परिमाण कलेच्या निकषावर आणून सोडते. शिवाय ही बोली वेदना व्यक्त करणारी असल्यामुळे तिच्या अंगी असलेली दाहकता केवळ ग्रामीण वाङ्मयास नव्हे, तर मराठी वाङ्मयासही अभूतपूर्व आहे.

ग्रामीण कथेत दारिद्र्याचा शोध घेणारे अनेक कथाकार आहेत. पण दुःखाचा शोध घेणारे केवळ शंकर पाटील आहेत. या कथाकाराने या दुःखाचा शोध घेताना कुठेही त्याचे भांडवल केले नाही, अथवा या दुःखाचा एकही पैलू अव्यक्त ठेवला नाही. त्यांच्या कथेतील पात्रे ही दुःखे भोग म्हणून स्वीकारीत नाहीत तर ती आपल्या जीवनाचा एक अपरिहार्य भाग म्हणून स्वीकारतात. या दुःखाविषयी त्यांची तक्रारही नाही. त्यांच्या 'सारवण' मधील हिरा दुःख बिनतक्रार भोगल्याशिवाय काहीच करू शकत नाही. ती म्हणते, 'कुणाऽऽला सांगायचं नाही,

काय नाही. आपलं आपण सोसायचं, आतल्या आत गिळायचं आणि होतंय तोवर करायचं, खुटलं की गप्प बसायचं." अशी या दुःखाची असाहाय्यता, अगतिकता आहे. पण तीच या कथेत प्राणभूत होऊन राहिली आहे. 'वेणा' या कथेत पाटलांना चांभाराच्या भागूच्या केवळ प्रसूतीच्या वेणा दाखवायच्या नाहीत, तर त्या बरोबरच रत्लाच्या दारिद्र्याच्या वेणा देखील दाखवणे महत्त्वाचे वाटते. या दोन वेणांपायी जे दु.ख व्यक्त होते ते संपूर्ण कथेत वाहत्या झऱ्याप्रमाणे आहे. शिवाय या दुःखाची जात मानवी मनाची अस्वस्थता वाढविणारी आहे. 'आहेर' या कथेत बाळाईच्या सगळ्या वहिणींना चांगली चांगली लुगडी नेसवली. बाळाईला मात्र लुगडे नेसवले नाही. भावाचा निरोप घेऊन निघालेल्या बाळाईला भाऊ घेतलेल्या कर्जाची आठवण करून देतो व तिला आहे न देता तशीच पाठवतो. भावाने दरिद्री बहिणीच्या मुस्कटात देऊन तिची माया लाथाडून दिलेली असते. या प्रसंगी बाळाईला जे दुःख होते त्याने वाचक अस्वस्थ होतो. हे दुःख ग्रामीण व नागरी असा भेदभाव करीत नाही. या दुःखापोटी येणारी अस्वस्थता हा पाटलांच्या कथेचा स्थायीभाव आहे. जी कथा दुःखाचा सतत मागोवा घेते, शोध घेते, प्रसंगी वेध घेते, ती कथा मानवी काळजाचा एकेक टवका काढून घेते. महाभारतातील कुंतीप्रमाणेच पाटलांच्या कथेने नियतीकडून वेदना मागून घेतली. वेदनेशिवाय कुंतीला जसे अस्तित्व नाही तसेच पाटलांच्या कथेतून वेदना वगळली तर ती अस्तित्वहीन राहील. या दुःखाचे, वेदनेचे पैलू विविध आहेत. कधी ते दारिद्र्यातून दिसतात, कधी कौटुंबिक नात्याच्या ओढाताणीतून दिसतात तर कधी समज, अपसमजातून दिसतात. पाटलांच्या कथेत या दुःखाचा शोध कधीच संपलेला नसतो. ते जरी उपहासाकडून परिहासाकडे वळले, तरी हा शोध संपत नाही. जेव्हा त्यांनी हा शोध घेणे थांबविले तेव्हा त्यांचे कथालेखन बंद झाले.

इतर ग्रामीण लेखक स्वतःला निसर्गात एकवटून देतात, तर शंकर पाटील निसर्गच स्वतःमध्ये एकरूप करून घेतात. त्यामुळे या निसर्गास पाटील या कलावंताचे आगळे-वेगळे व्यक्तिमत्त्व मिळून जाते. ही किमया ग्रामीण कथाकार सखा कलाल यांच्याशिवाय कुणालाच जमलेली नाही. या दृष्टीने पाटलांच्या वळीव, ऊन, आभाळ या कथा अभ्यासणे अगत्याचे होईल. या कथेतील पात्रे अधिक जिवंत वाटतात, ती निसर्ग त्यांच्या व्यक्तिमत्त्वात एकरूप झाल्यामुळे. आभाळ आणि ऊन या कथेत तर पाटलांची काव्यात्म भाववृत्ती दाखविणारी प्रतिमा आहे. ग्रामीण कथेत निसर्ग हा अटळ असतो. तो ज्या प्रादेशिक पातळीवरून येतो तिला वेगळे स्थान कथेत असतेच. पण पाटलांच्या कथेत हा निसर्ग मानवी मनाच्या जाणिवानेणिवांशी सोयरीक करून आल्यामुळे त्याचे स्वरूप कथेत उठून दिसते. तो कथेत केवळ झालरीवजा येत नाही, तर मानवी मनाच्या अव्यक्त रूपाचा शोध घेणे हे त्याचे कार्य असते. या कथेची सुरवात निसर्गापासून होते, तिचा विकासही निसर्गाच्या कलेकलेने होत जातो. 'वळीव' कथेत निसर्गप्रतिमा एखाद्या रूपदाप्रमाणे येते. 'आभाळ' मध्ये हाच निसर्ग भाववृत्तीचे दर्शन घडवितो, तर 'भुजंग' मध्ये या निसर्गाने मानवी मनाचे मनोज्ञ दर्शन घडविले आहे. मराठी ग्रामीण कथेत निसर्गाची अशी विविध विभ्रमे पाटलांशिवाय इतरत्र दिसून येत नाहीत. शिवाय जो परिसर त्यांना कथेद्वारे बोलका करायचा असतो तो परिसर हा या कथेचा केंद्रबिंदू असल्यामुळे तो कलावंताच्या व्यक्तिमत्त्वासह कथेतील इतर घटकांवयवे उजळवून जातो. अशा वेळी एक निखळ निसर्गकथा म्हणून या कथेकडे पाहता येते व त्याच वेळी एक माणूसकथा म्हणूनदेखील या कथेकडे पाहता येते. मुळात येथे निसर्ग व माणूस असा दुहेरी गोफ नसतोच मुळी. मराठी कथेत एक सामर्थ्यवान कला म्हणून पाटलांनी जसे निसर्गाकडे पाहिले, तसे अजून तरी कुणी पाहिले नाही.

या कथेत जी किमया निसर्ग करतो तीच किमया विनोदही करून जातो. मराठी ग्रामीण कथेत कलेच्या अंगाने विकास पावणारा विनोद शंकर पाटलांनी आणला, इतरांनी केवळ त्याचे अनुकरण केले आहे. त्यांची 'धिंड', 'मीटिंग' किंवा 'नाटक' या कथा वाचताना या विनोदाकडे लक्ष जाते. हा विनोद एक शैली म्हणून येत नाही किंवा कथेशी फटकून राहात नाही. तो आपल्या कथेचे जीवितकार्य कलापूर्ण करण्यासाठी येतो. हा विनोद रूढार्थाने प्रसंगनिष्ठ नाही. घटनाप्रधान नाही. त्यात कोटी नाही, की अतिशयोक्ती नाही. तर तो मानवी मनाच्या मूलभूत वृत्तीनेच पछाडलेला आहे. पाटलांची विनोदी कथा वाचताना आपण हास्यास्पद किंवा हास्यकारक विनोदी वातावरणास सामोरे जात नसून त्यातील विनोददेखील कथेद्वारे तुम्हाला अस्वस्थ करून जातो. पाटलांना विनोदाद्वारे एखादी विसंगती टिपायची असते. पण या विसंगतीतही मानवी मनाची

एक सुसंगतीच असते. शिवाय पाटील हे कथा-लेखन करीत नसून नेहमीच कथाकथन करीत असल्यामुळे या विनोदाने आपल्याशी एक संवाद साधलेला असतो. कथन हे पाटलांच्या कथेचा एक विशेष असल्यामुळे त्यांची समग्र कथा उठून दिसते. अशी कथा एखाद्या उत्कृष्ट निवेदकाच्या तोंडून एकदा ऐकून आपले समाधान होत नाही, तर त्याच निवेदकाच्या तोंडून हा विनोद पुन्हा ऐकण्यात आणि तो ऐकत असताना या कथनशैलीची गोडी चाखण्यात वाचकांना पुन्हा समाधान मिळते. या विनोदी कथेद्वारे व्यक्त होणाऱ्या मानवी स्वभावातील विविध गमतीदार विसंगतींमध्ये आणि त्यामुळे जीवनातील हास्यकारक विभ्रमांमध्ये वाचक कलानंद घेतो. पाटील हे निसर्गाप्रमाणेच आपल्या कथेत विनोदाचा वेध घेतात. ही विनोदकथा आपणास खळखळून हसविते व ती संपल्यावर आपण तिचे गांभीर्य मनात ठेवून राहतो. गांभीर्य आणि विनोद यांना ग्रामीण कथेच्या प्रकृतीत कलेच्या माध्यमातून एकाच वेळी कलात्मक पातळीवर आणणारे शंकर पाटील हेच एकमेव कथाकार आहेत. इतर कथाकारांप्रमाणे ते किस्सा आणि कथा असा भेद करत नाहीत. किंबहुना कुठलेच विशेषण धारण न करणारी, तडजोडीस बाजूला सारणारी ही कथा आहे. तिचा विनोदी कथा म्हणून स्वतंत्र विचार न करता ती समग्र पाटलांच्या कथा वैशिष्ट्यांसह आपल्यापुढे उभी राहते. त्यांच्या 'जीत' या कथेची आणि 'भूल' या कथेची जातकुळी एकच आहे. तसेच 'मीटिंग' या कथेविषयी सांगता येईल. विनोदास मराठी ग्रामीण कथा भरपूर राबविते. अशा वेळी एक अपवाद म्हणून शंकर पाटलांकडे लक्ष जाते.

पाटलांची कथा आपण वाचत नसतो तर ती ऐकत असतो. हरिभाऊंची 'स्फुट गोष्ट' ही आपण ऐकतच असतो. पण हे 'ऐकणे' वेगळे असते. या उलट पाटील यांची कथा ऐकताना ती आपल्याशी हृदयसंवाद साधते. पाटील, माडगूळकर आणि मिरासदार यांनी आपल्या कथाकथनाद्वारे मराठी कथा सर्वसामान्य वाचकांपर्यंत पोचवली. मराठी कवितेत रविकिरण मंडळाने केलेले कार्य कथेच्या क्षेत्रात वरील त्रिकूट कथाकारांनी केले. त्यातही शंकर पाटलांचे कथाकथन अधिक लक्षात राहते. पाटील या कथनाद्वारे वाचकांच्या मनात ही कथा अशी काही झोंबवून देतात की ती समग्र कथा येथे अस्वस्थ करून जाते. वेदना जागृत करणारी ही कथा म्हणूनच अश्वत्थामासारखी अमर वाटते. वेदना संपताच या कथेला अर्थ उरणार नाही. मानवी मनाचे बहुढंगी पापुद्रे उकलताना ही कथा ग्रामीण परिसराच्या कक्षा ओलांडून मानवी मनाच्या कक्षा अशा काही रुंदावून देते की, तिचा हा कलेविषयीचा कथनाचा सोस केवळ अपूर्व वाटतो. पाटलांची वेणा, भुजंग, सारवण, ऊन, मीटिंग या कथा आपण जेव्हा वाचतो, नव्हे, ऐकतो, तेव्हा निसर्गाद्वारे व्यक्त झालेली वेदना, हास्याद्वारे व्यक्त झालेली वेदना किंवा केवळ वेदनाच होऊन राहिलेली वेदना आपल्यापुढे मानवी जीवनाचा चित्रपट उलगडत जाते. चिंतन, मनन आणि आत्मपरीक्षणाद्वारे घडणारे जीवनदर्शन हे सारे, कलेचे नियम पाळून पाटील कथेद्वारे सांगतात. त्यांच्या कथेचा विचार गाडगीळांच्या संदर्भात विशेष उल्लेखनीय वाटतो. मराठी नवकथेला गाडगीळ आणि पाटील हे दोन समर्थ कथाकार मिळाले आहेत. या दोघांच्याही कथा मध्यमवर्ग किंवा ग्रामीण जीवन या मर्यादांचे उल्लंघन करून मानवी मनाच्या गाभ्याशी थेट नाते जोडतात. या दृष्टीने शंकर पाटलांच्या वेणा, ऊन, भुजंग या कथा मराठी ग्रामीण कथेत नव्हे, तर मराठी कथेत उत्तुंग शिखरे होऊन राहिल्या आहेत. मराठी कथेच्या इतिहासात या कथांनी जी वळणे घेतली आहेत, तिचा मागोवा घेत, मानवी मनाचा वेध घेत पाटलांचे हे कथेतील कलापूर्ण आत्मचिंतन आज तरी मराठी कथेचा मानदंड होऊन बसले आहे.

दुसऱ्या महायुद्धानंतर समाजजीवनातील कुटुंबव्यवस्था पार उधळून गेली. जीवनात माणसांची गर्दी सर्वत्र दिसते. पण ही माणसे परस्परांना समजून घेत नाहीत. जीवनमूल्ये आणि कलामूल्ये पार उद्ध्वस्त होताना पाटलांची कथा नेमकी कुटुंबसंस्था जिवंत ठेवते, माणसाला माणसाची ओळख पटवून देते हे विशेष आहे. त्यांच्या कथेत वेदना बहुधा स्त्रियांशी निगडित असली तरी या स्त्रिया मानवी मनाचे विविध नमुने आहेत. प्रथम ही कथा एका व्यक्तिमनाशी नाते जुळविते व नंतर कौटुंबिक पातळीवर तिचा परीघ पृथगात्म होतो. पति-पत्नी, दीर-भावजय, मुलगा-बाप, प्रियकर-प्रेयसी ही द्वंद्वे पाटील कुटुंबसंस्थेशी निगडित ठेवतात. पाटलांचा कौटुंबिक पातळीवरचा हा कलात्मक शोध मानवी दर्शनाचाच एक भाग असतो. म्हणून ती प्रथम 'कथा' वाटते. नंतर 'ग्रामीण' असते. मनोरंजन कालखंडात मराठी कथा अशीच 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमंते तत्र

देवताः ' या भावनेने स्त्रीकेंद्रित होती. परंतु पाटलांच्या कथेतील स्त्री ही अधिक धीट, समजूतदार, सोशिक व आपली प्रामाणिक वेदना भांडवल न करता जपणारी आहे. तिने आपल्या मर्यादित कुटुंबाचे जे क्षेत्र निवडले ते तिने केवळ वेदना म्हणून जपले. तिची वेदना सनातन असूनही आज नवे नवे उन्मेष प्रकट करणारी वाटते.

आज मराठी वाङ्मयात ग्रामीण साहित्य आणि दलित साहित्य आपल्या वेगवेगळ्या भूमिकांतून समर्थनवादी साहित्य वाचकांपुढे मांडत आहेत. या मागे मराठी साहित्याच्या कक्षा रुंदावणे ही भूमिका असेल. पण हा आविष्कार केवळ ग्रामीण किंवा दलित विशेषणातूनच झाला पाहिजे अशी वादळी भूमिका घेतली पाहिजे का? मराठी साहित्य हे समुद्रासारखे विशाल व अथांग असून त्यात विविध प्रवाहांतून येणारी वळणे शेवटी एकरूप होणारी आहेत. मानवी मन व त्याची विविध पटले हाच साहित्याचा केंद्रबिंदू असला पाहिजे. व या भोवतीच वाङ्मय घिरट्या घालणारे असावे. वस्तुतः ग्रामीण काय, दलित काय, या साहित्याला ही भूमिका निश्चितपणे पटली आहे. पण स्वतःची पोझ घेणे व वेगळेपण आवर्जून दाखविणे ही त्यांच्या मते काळाची गरज वाटते. कुठल्याही काळात साहित्य जेव्हा साधन होऊन, चळवळ होऊन समर्थनवादी होते, तेव्हा ते आपल्या भूमिकेचे समर्थन करीत असते, साहित्याचे नव्हे. अशा वेळी त्याला आपली प्रतारणा अधिक जाणवते. पण यातून मागे सरणे त्याला परवडणारे नसते. येथे हा साहित्यिक कलेचे धोके ओलांडूनही पुढे जात नाही. उलट हेच धोके सांगणारी कला तो व्यक्त करतो. आज स्वतःची वकीलपत्रे घेऊन मिरवणाऱ्या ग्रामीण साहित्यात यामुळेच शंकर पाटील नंदादीपाप्रमाणे वेगळे व मार्गदर्शक वाटतात. ■

## परिषदेचे नवीन आजीव सभासद : ऑक्टोबर १९८६ ते मार्च १९८७ अखेर

पुणे विभाग : डॉ. किशोर लक्ष्मण भिंगारे, श्री. अरविंद अनंत नातू, श्री. माधव श्रीधर रिसबूड, श्री. शरद बळवंत जोशी, सौ. स्मिता शरद नाटेकर, सौ. सुमन र. संगपाळ, (आळंदी, पुणे) प्रेमला ग. घिटे, श्री. विष्णू लक्ष्मणराव हुडके, सौ. शोभा अनिल भागवत, श्री. श्रीकांत श्रीकृष्ण साठे, विमल राजाराम कुलकर्णी, डॉ. अरुणा रामचंद्र ढेरे, श्री. अरविंद रामचंद्र रानडे, श्री. कर्नल रमेश शिराळी, सौ.शारदा अशोक शिंगे, श्री.संजय गोवर्धन शहा, श्री. रामचंद्र दिनकर देवधर, श्री.सुधांशु मुकुंद वझे, श्री. राजेंद्र दिपचंद पितळे, सौ. गुलाब गंगाधर नाईक, श्री. पंकज अरविंद नाडगौडा, श्री. गोपाळ हरी रहाळकर, श्री. भालचंद्र पांडुरंग दाते, अरविंद गदाधर देवस्थळे, जानकी संजय देसाई, श्री. मुकुंद वासुदेव गोखले, श्री.अनिल वामन केतकर, श्री.अनिल वासुदेव जोशी, सौ.प्रमिला वसंत जोशी, श्री. सदाशिव गणेश आपटे, श्री. जयंतकुमार त्रिभुवन, श्री. गोविंद बळवंत चव्हाण, श्री. पुरुषोत्तम एकनाथ कडूरकर, श्री. वासुदेव गणेश वडापूरकर.

पुण्याबाहेरील : सौ. सुषमा शरद हाडप (सातारा), श्री. शामराव आप्पाजी माने (वाळवा, सांगली), श्री. अरविंद, श्री. पुजारी, (मोहोळ) श्री. तिलोकचंद चांदमल मुनोत, श्री. दिवाकर दुनाखे (सोलापूर), प्रा. अविनाश कृष्ण बिनीवाले, श्री. राजीव लक्ष्मण वावळे, सौ. शैलजा अजित टेंगशे (कोल्हापूर), श्री. जीवन टिळक, श्री. सुधाकर गणेशराव सोनकुसळे (येवला, नाशिक), डॉ. अनिल सहस्रबुद्धे, प्रा. देवदत्त रानडे, प्रा. जगदीश हिंगे (अहमदनगर), श्री. दीपा माणिकराव जगधने, डॉ. किशोर खारकर (श्रीरामपूर), श्री. बबनराव ह. विलायते, प्रा. विश्वासराव गणपतराव काळे, प्रा. डॉ. गजानन पांडुरंग चव्हाण, रजनी सूर्यकांत कुलकर्णी, प्रा. आशा पोपटराव ठुबे, प्रा. चंद्रकांत पुंडलीक खांडगौरे, प्रा. सौ. मंजिरी मदन सोमाणी (श्रीरामपूर), सौ. रुपाली हरिश्चंद्र कुलकर्णी, श्री. प्रभाकर शिरसाठ, प्रा. अंजली शिवाजीराव पाटील, डॉ. भगवंतराव त्र्यंबक वैद्य, अभय श्रीकृष्ण खेर, दीपक भामरे, प्रा. शांताराम वामन कुलकर्णी (शिरपूर-धुळे), श्री. अशोक पांडुरंग बागूल, प्रा. श्रीमती सुमन रघुनाथ अहिरराव, श्री विलास दत्तात्रय जोशी, श्री. रविकुमार भालचंद्र शुक्ल (धुळे), श्री. प्रा. एम्. डी. शेटे, श्री. अरुण श्रीपत नारखेडे, प्रा. आर. जी. गुजराथी, प्रा. सुभाष भगवान लोहार (जळगाव), सौ. प्रज्ञा अनंतराव जोशी, श्री. अनंत माधवराव जोशी, श्रीमती शशिकला रेवणकर, श्री. सुधाकर बजाज, सौ. मेघा दा. सोमण, श्री. सु. ल. सोमण, श्री. प्रतापसिंह महाले, कु. रजनी ठकार, श्री. माधव गोपाळ धारप, श्री. भालचंद्र गोपाळ घाटे (ठाणे), श्री. बी. डी. शिंदे, सौ. कल्पना तारानाथ कामत, श्री. अनंत विनायक कान्हेरे (गोरेगाव, मुंबई), प्रा. भास्कर चंदनशिव (औरंगाबाद), श्री. सुरेश द्वादशावार, श्री. श्रीधर विश्वनाथ सहस्रबुद्धे (तळोधी, बाळापूर, चंद्रपूर), प्रा. जीवन दत्तोपंत पिंपळवाडकर, प्रा. सूर्यभान गणपतराव चव्हाण, (नायगाव, नांदेड) श्री. हरिहर कुलकर्णी (नांदेड).

: १ :

## 'मुक्तायन'–एक दृष्टिक्षेप

वसंत सावंत

" विजयासाठी माझी कविता कधीच नव्हती.
म्हणून तिजला भीती नव्हती पराजयाची
जन्मासाठी अडून केव्हा नव्हती बसली
म्हणून नाही भीती तिजला मरावयाची "

'मुक्तायन,' वाचून संपवल्यावर कविवर्य कुसुमाग्रजांचे वरील उद्‌गार मला सहज आठवले. ज्या कलावंतांनी आपल्यातील कलावंताला पूर्णपणे न्याहाळले आहे; ज्यांची स्वतंत्र निर्मितिक्षमता प्रचंड आहे; अशा कुसुमाग्रजांसारख्या कवींनीच वरील उक्ती मस्तीत लिहून जाव्यात. या दृष्टीने 'जीवनलहरी' (१९३३) पासून 'जाईचा कुंज'(१९३६), 'विशाखा' (१९२४) 'समिधा' (१९४७), 'किनारा' (१९५२), 'मेघदूत' (१९५६), 'मराठी माती' (१९६०), 'स्वगत' (१९६२), 'हिमरेषा' (१९६४), 'वादळवेल' (१९६९) 'रसयात्रा' (१९६९), 'छंदोमयी'(१९८२) आणि अलीकडे १९८४ साली प्रसिद्ध झालेला 'मुक्तायन' संग्रह–ही प्रदीर्घ वाटचाल एकंदर मराठी कवितेत अभिमानास्पद आणि गौरवाची मानावी लागते. सुमारे ५३ वर्षे इतर वाङमय प्रकारांची निर्मिती भरघोसपणे करत असताना काव्यनिर्मितीच्या साधनेत खंड पडलेला नाही. 'मेघदूत' हे कालिदासाच्या प्रसिद्ध 'मेघदूता'चे भाषांतर सोडल्यास बाकीची ही निव्वळ कवितांची निर्मिती आहे. आणि उत्कृष्ट भाषांतर हीसुद्धा एक नवनिर्मिती मानल्यास, कविवर्य कुसुमाग्रज हे नाव मराठी काव्याच्या क्षेत्रात एक नवा मानदंड निर्माण करणारे ठरते यात संशय नाही.

नाटककार वि. वा. शिरवाडकरांची नाटके ही माझ्या मते बहुतांशी उत्कट काव्येच आहेत. त्यांतील कित्येक स्वगताना लाभलेली काव्याची महत्ता मराठी रसिक कधीही विसरू शकत नाही. म्हणून मला कुसुमाग्रज हे मराठी साहित्याला लाभलेले कालिदास किंवा इंग्रजी वाङ्मयाचा मानदंड असलेल्या शेक्सपीअरसारखे वाटतात.

'मुक्तायन' हा ९३ छोटया छोटया भावकवितांचा संग्रह मुंबईच्या पॉप्युलर प्रकाशनाने प्रकाशित केला आहे. यापूर्वी काही 'आनंद' नाटकातून, तसेच इतरत्र नियतकालिकांतून विखुरलेल्या कविता या संग्रहात संग्रहित झालेल्या दिसतात. महत्त्वाचे म्हणजे नावाप्रमाणेच 'मुक्तायन' मधील सर्व कविता एका मुक्त लयीत आणि त्यावर आधारलेल्या वक्तृत्वपूर्ण शैलीचा आश्रय घेऊन अवतरल्या आहेत. अखंडपणे, सातत्याने रचना होत राहणे आणि त्यांना काव्यत्व असणे ही किमया कुसुमाग्रजांसारखा प्रतिभाशाली कवीच करू शकतो, याची साक्ष इथे पटावी. या कवितांतून रसिकाला सामान्यतः अकविता सापडणे मला तरी शक्य दिसत नाही ! या सर्व कविता मुळात काही एक ठराविक प्रयोजन वा हेतू बाळगून लिहिलेल्या आहेत, असेही नाही. त्या आपल्या अखंड होत जात असतात. म्हणूनच 'जन्मासाठी अडून केव्हा नव्हती बसली' ही कवींची उक्ती सार्थ वाटावी. ज्या कवींची वाणी सिद्ध कोटीला पोचली आहे अशा कवींमध्ये म्हणूनच जग कुसुमाग्रजांची गणना करील असे मला वाटते.

'मुक्तायना'ची मुक्त लय आणि भाषा आजच्या मुक्त युगातील मराठी कवितेच्या अभिव्यक्तीशी नाते सांगणारी आहे. त्यासाठी न मोडणारी मराठी भाषा वाकवून व मोडून वापरण्याची कुवत असावी लागते. रख्वा-

तच छंद मुरवणाऱ्या श्रेष्ठ कवींना अशा मुक्त लयीचे वरदान लाभत असते. या दृष्टीने नाटककार शिरवाडकरांनी कवी कुसुमाग्रजांना या संग्रहात सहज साथ दिलेली दिसेल. उदा. 'नट', 'खुर्च्या', 'मी', 'शॅांपेन माताजी', 'राणी' इ. कवितांची मुक्त लय लक्षणीय आहे. एकूण या कवितांचा ताजेपणा व नवता यांनाही या लयीने काही खास मदत केलेली दिसेल.

दुसरे म्हणजे 'मुक्तायना' तील कुसुमाग्रजांच्या प्रगल्भ व चिंतनशील व्यक्तिमत्त्वाचे दर्शन या संग्रहाला एक खास पृथकपणा देऊन जाते. एक रसरंगगंधलोलुप कलंदर कवी, एक विशुद्ध माणूस, एक तत्त्वज्ञ, एक जोगी, एक निसर्गभक्त अशा अनेक पैलूंनी हे व्यक्तिमत्त्व या संग्रहात जाणवत राहते. कधी एखाद्या कवितेत या अनेकांगी, समृद्ध व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय येऊन जातो. उदा. 'संत' (पृ.१३), 'नक्षत्रांनो' (पृ.४६), 'मी' (पृ.२४), 'संशोधक' (पृ.९०) इ. कवितांतून याचा प्रत्यय यावा.

या संग्रहातील काव्यविषयक भूमिका पाहताना, कविता ही कवीच्या अस्तित्वाची खूण असते. तो त्याचा 'स्व'शोध असतो. म्हणून... "तत्त्वज्ञान त्याचे विवेचन करील—पण कविता त्याचा शोध लावते." असे कवी सांगतात...केवळ कवीसाठी.

> तो करतो स्वतःचा सारांश
> इंद्रियसुंदर स्वरूपात
> सृष्टीतून उतरतो खाली,
> रहस्यदुर्गाच्या उग्र सावल्यांतून
> पहारे चुकवीत बाहेर निसटणाऱ्या
> कलंदर राजपुत्रासारखा,
> आणि
> कवीच्या संवादी हातात हात घालून
> रागदारीतील महत्तम स्वरासारखा
> भ्रमण करतो अस्तित्वाच्या सर्व सरहद्दींपर्यंत.
> —अन्यथा
> तुकारामाचा अभंग
> संभवलाच नसता. ('अन्यथा' पृ. ३४)

तो आणि आपण यांच्यातील संबंध फक्त काव्याचा असतो. असे कवीच्या आत्म्याचे इथे चित्र मिळू लागते. कविता ही त्याच्या शोधाचे एक साधन म्हणून कवी सांगतात. तर 'संवाद' (पृ. १४६) या शेवटच्या कवितेत—

> "तुम्ही जेव्हा माझ्या कवितेशी बोलता
> तेव्हा माझ्याशी बोलू नका.
> कारण माझ्या कवितेत मी असेन वराचसा
> बहुधा,
> पण माझ्या बोलण्यात मात्र तुम्हीच असाल
> पुष्कळदा."

असे सांगण्यात कवींची कविता एकाच वेळी त्यांचीही असते आणि पुष्कळदा पुष्कळांचीही असू शकते, असा भाव व्यक्त होतो. या दृष्टीने 'मुक्तायना'तील कविता एकाच वेळी कुसुमाग्रजांची आहे. तशीच ती सर्वांचीही आहे. म्हणून ती सूर्यास्ताचे चार किरण खुडून आणते. कारण तिला तुझ्या-माझ्या मनातला उद्याचा सूर्योदय जागृत ठेवायचा असतो. हा आशावाद त्यांच्या जीवनलहरींपासून 'विशाखा'पर्यंत, आणि 'वादळवेल' ते 'मुक्तायन'पर्यंत अखंड तेवत राहिला आहे. रात्रीच्या गर्भात उद्याचा उषःकाल जागृत ठेवणारे कुसुमाग्रज 'मुक्तायना'तही असे भेटून जातील. कवितेकडे पाहण्याची त्यांची उपरोक्त दृष्टी विधायक आणि मूलभूत ठरते यात शंका नाही. 'नट' या कवितेत कलावंत म्हणून समष्टीत सामावण्याची भावना... "मी एक होतो, तो अंशाअंशाने हजारांच्या जीवनात— कदाचित स्मरणातही— वाटला गेलो आहे." (पृ. ७) या ओळींतून व्यक्त होते.

अशा समष्टीरूप विश्वाचा कणा म्हणजे माणूस. तो कुसुमाग्रजांच्या चिंतनशील जाणिवेचा एक प्रमुख आधार आहे. विशेषतः यातील शोषित, आदिवासी द्रौणी अश्वत्थामासारखा चिरंतन दुःखी माणूस व त्याची वेदना 'मुक्तायना'त अनेकदा, अनेक प्रकारांनी काव्यरूप घेताना दिसेल. कुसुमाग्रजांमधला अखंड मानवतावादी कवी कोणत्याही युगाचा कवी म्हणून त्यामुळेच ठामपणे उभा राहतो. या दृष्टीने या संग्रहातील—'संत' (पृ.१३) 'स्वस्त' (पृ. २६), 'याचक' (पृ. ३८), 'तोपर्यंत' (पृ. ४१), 'आश्चर्य' (पृ. ४२), 'राजहंस माझा' (पृ.५२), 'घृणास्पद' (पृ. ५४), 'कलोजस' (पृ.५६), 'ज्योतीराव' (पृ. ७१), 'वऱ्यापैकी' (पृ. ८५), 'वनवासी' (पृ. ८९), 'अनावरण' (पृ. ३५), 'तोपर्यंत' (पृ. ४१), 'याच मातीतून' (पृ. ११३), 'विशेषणे' (पृ. १०१), 'स्वर' (पृ. १४५), इ. इ. कवितांतून या वेदनेचे विविधांगी स्वरूप प्रत्ययाला यावे. सामान्य माणसाच्या जीवनातील अगतिकता, दुःख,

...५

दारिद्र्याचा शाप, अत्याचार, विषमता, कलाहीन जीवनाचे पदर अनेकदा अनेक जागी चित्रित होतात. त्यांना अपूर्व चिंतनाची व उपहासाची धार लगडून येते. आजच्या लोकशाहीची शोकांतिका सूचित करणारी ही शब्दचित्रे म्हणूनच 'मुक्तायना'चा एक विलोभनीय विशेष ठरावीत. उदा.

"ती आदिवासी म्हातारी
प्राणांतिक भयाने धडपडत
डोंगराच्या कडेला गेली
आणि चिकटून उभी राहिली
पालीसारखी खडकाला.
उघडीवाघडी
हजार सुरकुत्यांच्या कातडीत कोंवलेली
हाडांची जीर्णाकृती.
मी क्षणभर आदिवासी झालो
आणि तिच्याकडे पाहिलं,
अहो आश्चर्य–
तिच्या एका थानाच्या गाठोळीवरून
लोंवत होतं आपलं पार्लमेंट
आणि दुसऱ्या गाठोळीवरून लोंबत होतं
आमचं साहित्य संमेलन."–'आश्चर्य' (पृ. ४२)

या नाट्यात्म मुक्त रचनेतील हे चित्र लोकशाहीतील विदारक सत्याचा कलात्मक आविष्कार करते. कुठेही आक्रस्ताळेपणा नाही. त्याचप्रमाणे 'स्वस्त'मधील कामगार स्त्रीचे व आजच्या लोकशाहीतील रोजगार हमीचे चित्र खास वोलके उतरले आहे :

"पायाखाली तुडवीत जगदंबेप्रमाणे
ग्रीष्माचे दुपारचे हिंस्त्र राक्षसी ऊन
आणि वाभळीच्या तळाशी पडलेल्या
मुलाचा आक्रोश ऐकून
चोळीतून अनिवार आवेगाने
ओघळणारे स्तन
पुन्हा चोळीमध्ये खुपसून
ती फोडते आहे
प्राणांतिक आवेशाने
पहाडी शिळांची रास
आणि घडवते आहे
उद्या येथून जाणाऱ्यांचा रस्ता
आणि परवा
देशात जन्माला येणाऱ्यांचा
भविष्यकालही
आणि हे सारे
रोजगार हमीच्या
फक्त तीन रुपयांत."

याप्रमाणेच 'राजहंस माझा'मधील झोपडपट्टीतील आई, वाहून बुडून मेलेल्या आपल्या मुलाचे कलेवर खाली टाकून, हंबरडा घशामध्येच आवरून, गुदामवाल्या व्यापाऱ्याने टाकलेल्या, कुजलेल्या धान्याची लूट करायला जाते. कवी म्हणतात, त्या मुलापेक्षा सूक्ष्म गणिताने पाहिले तर कुजलेल्या धान्याचे मूल्य अधिक होते. "मूल वुडाले म्हणजे सचिवालय, पाच ताऱ्यांचे ताजमहाल अथवा ब्रॅवोर्न स्टेडियम बुडाले नाही–" आजच्या लोकशाहीत माणसाच्या जिवाची किंमत कवींनी वोलून दाखवली आहे. आणि दारुण विषमतेचे चित्र रेखाटले आहे. मराठी साहित्यात गोविंदाग्रजांची 'राजहंस माझा निजला !' ही सुविख्यात कविता विधवा आईच्या एकुलत्या एक मुलाच्या मृत्यूचे 'निजला' असे चित्र काढते. इथे कुसुमाग्रज फक्त 'राजहंस माझा', असा शब्द वापरून त्या मुलाबद्दल आपल्या पवित्र भावना व्यक्त करतात. त्या मुलाच्या आईला रडणेही फावत नाही. कुजक्या धान्यावर जीव जगवणे ही तिची मूळ समस्या आहे. लोकशाहीप्रधान राष्ट्रात भूकबळी जाण्याइतके दैन्य, दारिद्र्य, व गरीब-श्रीमंत ही भीषण दरी कुसुमाग्रजांनी सहज चित्रांकित केलेली दिसेल.

आणि या दुर्बळांच्या अश्रूंनीच एक दिवस क्रांती पेट घेते, या तत्त्वाचा आविष्कार कुसुमाग्रज 'तोपर्यंत' (पृ. ४१) या कवितेत करतात असे म्हणता येईल. या कवितेत असामान्यांची राजधानी, रस्ते इ. सामान्यांनी बांधलेले असतात. रक्तासवांनी भिजलेले ते लांबलचक रस्ते, त्या अजस्त्र चिरेबंदी भिंती, दिमाखदार चिलखती दरवाजे ही निर्मिती सामान्यांचीच. पण असामान्यांनी त्यांच्यावर जुलूम केला की–

"–आणि असा एक दिवस उगवतो
की जेव्हा हे सारे बांधकाम
सामान्यांना करता येते समूळ उद्ध्वस्त
हाही एक नवा इतिहासच
अखेरच्या तळावर सामान्यांना सापडलेला.
पण तोपर्यंत..."

काही एक वाट पाहणे असते असे कवी सुचवतात 'विशाखा'पासून 'मुक्तायन'पर्यंत पवित्र अश्रूंची गाणी

लिहिणारे कुसुमाग्रज रसिकाला जागोजाग भेटत राहतील. ' मुक्तायना 'त उपहास आणि उपरोधाची हत्यारे अधिक धारदार झाली आहेत; यात संशय नाही.

' मुक्तायना 'तील ' पुतळ्यां 'वरच्या कविता हा एक खास विशेष मानावा लागेल असे मला वाटते. या कवितांतूनही राजकीय आणि सामाजिक उपहास व्यक्त होत राहतो. मराठी मनाला– एकंदर भारतीय मनाला– व्यक्तिपूजा अधिक प्रिय. यातून युगपुरुषांना देवत्व बहाल करण्याची, त्यांची समाधी वा पुतळा बांधण्याची उर्मी प्रबळ. परंतु ज्या राष्ट्रपुरुषांनी समाजाला वा राष्ट्राला उन्नतावस्थेत नेले त्यांची शिकवण, आचार-विचार अंगी बाणवण्याऐवजी एकदा त्याचा पुतळा किंवा समाधी बांधून मोकळे होण्यात सर्वांनाच घाई झालेली दिसावी. जिवंत असताना या युगपुरुषांना समाजाने सर्वार्थाने साथ केलेली असते असेही नाही ! त्यातून पुन्हा जातीयवादाच्या रगाड्याखाली या महापुरुषांना रगडण्यात धन्यता मानणारा आजचा समाज त्यांच्या अवनतीला कसा कारणीभूत होत असतो याचे चित्र इथे दिसू लागते. या दृष्टीने ' मुक्तायना 'तील ' अनावरण ' (पृ. ३५), ' पुतळा ' (पृ. ५९), ' ज्योतीराव ' (पृ. ७१), ' अखेर कमाई ' (पृ. १०९) या कविता लक्षणीय वाटतील. त्याबरोबर ' शिवराया ' (पृ. २७) ही कविता पाहिल्यास आजच्या विदारक परिस्थितीचे चित्र अधिक गडद व्हावे.

या कविता मुळात कविता म्हणून बऱ्याच पातळीवर यशस्वी वाटतील. यातून व्यक्त होणारा राजकीय व सामाजिक उपहास ' नरेंचि केला हीन किती नर ! ' हे केशवसुत कथित सत्य सांगणारा आहे. ज्या युगपुरुषांना आपण पवित्र मानतो त्यांचे पावित्र्य, मोठेपणा आपणच कसा नष्ट करतो हे दिसेल. उदा. ' अखेर कमाई 'मधील पाच पुतळे काय संभाषण करतात पहा–

" मध्यरात्र उलटल्यावर, शहरातील पाच पुतळे
एका चौथऱ्यावर बसले आणि टिपं गाळू लागले.
ज्योतिबा म्हणाले,
शेवटी मी झालो फक्त माळ्यांचा
शिवाजी राजे म्हणाले,
मी फक्त मराठ्यांचा.
आंबेडकर म्हणाले,
मी फक्त बौद्धांचा.
टिळक उद्गारले,
मी तर फक्त चित्पावन ब्राह्मणांचा.
गांधींनी गळ्यातला गहिवर आवरला आणि ते म्हणाले,
एकेक जातजमात तरी तुमच्या पाठीशी आहे.
माझ्या पाठीशी मात्र
फक्त सरकारी कचेऱ्यातील भिंती ! "

यावर भाष्य करण्याची गरज नाही. यातील उपहासाची धार स्पष्ट आहे. युगपुरुष म्हणून एकेकाळी मानमान्यता पावलेले हे महात्मे आज जातीयवादाच्या गर्तेत कसे लोटले गेले आहेत हे दिसेल. युगपुरुषांचे कर्तृत्व आणि शिकवण कुणाला कशी कामी येते हे पाहण्यासारखे. आपणच आपले अवमूल्यन कसे सहज करून जातो याचे दर्शन इथे घडते. या जातीयवादाने पोखरलेला अख्खा भारत देश थरथरत एकविसाव्या शतकाकडे वाटचाल करतो आहे. प्रांतीयवाद, जातीयवाद, हे माणसामाणसांमध्ये नव्या अभेद्य भिंती निर्माण करताहेत. देशाच्या सीमारेषा थरारताहेत. एकूण या पुरातन भारत देशाचा आत्मा अस्वस्थ झाला आहे. कुसुमाग्रजांची पेटती प्रतिभा ' विशाखा 'तील अनेक कवितांपासून याची सतत दखल घेत आली आहे. जिवंत सामाजिक मनाची ही चाहूल ' अनावरण ' (पृ. ३५) या बाबासाहेब आंबेडकरांच्या पुतळ्यावरील कवितेत लिहून जाते– "...मी तुमच्या पुतळ्याचं बाबासाहेब, आज अनावरण केलं (तुम्हाला कळलेच असेल) आणि नंतर तुमच्या पुतळ्याला डोळे मिटून भाविकतेनं नमस्कार केला. (' नाटक केलंस बामणा ? ')" असे म्हणत उपहासाचे फवारे उडवून कवी बाबासाहेबांना नम्रतेने म्हणतात–

"...नाही बाबासाहेब, ' तुम्ही ' हा विषय कवितेत मावणारा नाही, हे पूर्वीच लक्षात आलंय माझ्या." तुमच्या पुतळ्याचं ' अनावरण ' करून समाधान नव्हतं– तो एक अद्भुत ' अनुभव ' होता... त्या क्षणार्धात मी माझ्या संगमरवरी चौथऱ्यावरून खाली खोल खोल कोसळत गेलो, कड्यावरून दरीत भिरकावलेल्या दगडासारखा, थेट पाताळापर्यंत, जेथे ' खाली ' ही संज्ञाच शिल्लक राहिली नव्हती... त्या तळावरून मी तुमच्या पुतळ्याकडे पाहिलं. तेव्हा पुतळा दिसलाच नाही. दिसत होता, जाणवत होता.



अनुक्रमणिका

एक विराट दाहक तेजोगोल
सूर्याच्या कोरोनासारखा."(पृ. ३७)

या कवितेत कुसुमाग्रजांची बाबासाहेब आंबेडकरांकडे पाहण्याची विशाल दृष्टी व या राष्ट्रपुरुषाच्या विचारांना व आकाशगामी व्यक्तित्वाला भिडण्याची ताकद दिसते.

'ज्योतीराव' (पृ. ७१-७३) या पुतळ्यावरील कवितेची धार तर याहून उत्कट चिंतनिकेसारखी, "...ज्योतीराव परवडत नसले तरी त्यांचे पुतळे आम्हाला परवडतात आणि वर्षातून एकदा घनघोर आठवतात, लांब-रुंद लफ्फेदार भाषणांसाठी–'हेही नसे थोडके'" या उपहासाबरोबर, राजधानीच्या गर्भागारात दिमाखाने उभ्या राहिलेल्या पुतळ्याच्या रूपातील ज्योतिबांची शिकवण व सारे सत्यसंशोधन "...गावागावातल्या भिंतीवरती कोळिष्टकासारखं चढून बसलं आहे..." याची खंत व्यक्त होते. जातीयतेवर पहिला वज्रकठोर प्रहार करणारा हा महात्मा आता केवळ माळ्यांच्या जमातीत जमा झाला आहे, हे सत्य कवी सांगतात. ज्योतिबांनी दिलेले सर्व प्रकाशकिरण सत्तालालसेच्या गटारात आम्ही फेकले आहेत. आणि तुम्हाला सरंजामी पालख्यांचे भोई केले आहे. याहून अंतिम सत्य म्हणजे "...पण एक लक्षात ठेवा, ज्योतीराव, तुम्ही आता फक्त पुतळा आहात. पुतळ्यांना अधिकार नसतो, संतप्त होण्याचा, भोवतालच्या व्यवहारात उतरण्याचा. त्यांना अधिकार असतो फक्त जयंती-मयंतीच्या हारांचा, आणि एरवी काकादिक पक्ष्यांच्या विष्ठाप्रधान सहवासाचा." या म्हणण्यात पुतळेसंस्कृतीची मर्यादा आणि गोम कुसुमाग्रजांनी नेमकी शब्दांत पकडलेली दिसेल.

यावरोबरच, 'मुक्तायना'तील अनेक कवितांतून विविधप्रकारची व्यक्तिचित्रे ठामपणे डोळ्यांसमोर उभी राहणारी आहेत. मननीय व्यक्तींची जीवनधारा नेमकी शब्दांत पकडल्याशिवाय या चित्रांना रंगरूप येत नाही. ती सजीव होण्यासाठी, मर्मदायी जीवनदृष्टी, सूक्ष्म निरीक्षणशक्ती आणि अख्खा माणूस आत घेण्याची ताकद कलावंतापाशी असावी लागते. या दृष्टीने 'मुक्तायना'तील 'नट' (पृ. ५), 'निवास' (पृ. ८), 'संत' (पृ. १३), 'अनावरण' (पृ. ३५), 'याचक' (पृ. ३८), 'आश्चर्य' (पृ. ४२), 'सातवा' (पृ.५०), 'राजहंस माझा' (पृ. ५२), 'कलोजस' (पृ. ५६), 'ज्योतीराव' (पृ. ७१), 'देहूचा वाणी' (पृ. ८२), 'संशोधक' (पृ. ९०), 'राणी' (पृ. ९६), 'अखेर कमाई' (पृ. १०९), 'राधा' (पृ. १२७), 'जमीन खानदेशची' (पृ. १३२), 'हे भारत सैनिका' (पृ.१३९) 'वैरागी' (पृ. १४४) अशा अनेक कवितांतून या व्यक्तिचित्रणात्मक कलेचा वारसा कुसुमाग्रजांनी जपलेला दिसेल. यातील व्यक्तीही पुराणकालापासून इतिहासकालापर्यंत व 'कलोजस'मधील सामान्य संसारी माणसापासून आदिवासी म्हातारीपर्यंत आहेत. ही शब्द-चित्रे व त्यांचे ठसठशीत रंगाचे पोत वरील विवेचनात काही ठिकाणी आले आहेत. परंतु आजच्या युगातील एक मननीय व्यक्ती आदरणीय बाबा आमटे यांच्याशी मनोसंवाद साधून त्यांना 'संत' मानणारे कुसुमाग्रज, या युगाचे श्रेष्ठ मानवतावादी कवी वाटतात. यातील आदरणीय आमटे यांचे शब्दचित्र खास लक्षणीय उतर-तेच, पण त्यांच्यात शिरलेल्या कवी कुसुमाग्रजांना न्याहाळणेही मोठे मोहदायक आहे– आदरणीय बाबा आमट्यांसारखा कृतिशील कवी, थोर समाजसेवक, मानवतेचा उपासक आज हजारो महारोग्यांच्या व अनेक दुःखांनी ग्रासलेल्यांच्या जीवनात जगण्याचे भन्नाट वारू सोडणारा कृतिशील कार्यकर्ता या युगात आपल्या डोळ्यांसमोर वावरतो आहे. त्याचे स्वागत करताना कुसुमाग्रज म्हणतात,

"...माझ्या घराच्या एकलकोंड्या कौलावर बसले आहेत निळ्या पाखरांचे थवे,

तुझ्या वाटेवरची धूळ आपल्या पंखांवर वाहण्या-साठी...

आकाशाचं मन कळत नाही वारा होऊन मुक्त झाल्याशिवाय...

प्रकाशाच्या देवळात जाता येत नाही...दिवा होऊन भक्त झाल्याशिवाय...

म्हणून थोडं वारेपण– थोडं दिवेपण– उचललं आहे. माझ्या जिराईत अक्षरांनी, तुझ्याच, मेघशील जीवनातून...

तुझ्याच स्वागताच्या कमानीवर तोरण लावण्या-साठी..."

कारण–

"मी पाहिले आहे तुझे शिल्पचित्र तीनशे मैलां-वरून..."

"तसं पाहिलं तर कोण तू ? आणि कोण मी ?

कोसांच्या नव्हे तर जगांच्याअंतराने विभागलेले दोन अनोळखी प्रवासी."

आदरणीय बाबा आमटे यांचे शब्दचित्र रेखाटताना कुसुमाग्रज लिहितात–

...सोमनाथच्या सूर्यद्रोही जंगलात पृथ्वीच्या गर्भात पाय खोचणाऱ्या विराट वृक्षावर अपराजित कुऱ्हाड मारणारा तू–

सर्जन डॉक्टरांच्या सभागृहात
डोंगराच्या सुळक्यासारखा उभा राहून
माझ्या देहात महारोगाची लस घाला
म्हणून आव्हान फेकणारा तू–

श्वापदांच्या समूहात सिंहाचा स्वर होणारा
सर्पांच्या प्रदेशात गरुडाचं घर होणारा
वणव्याच्या समोर घनघोर पाऊस होणारा
दुःखाच्या समोर फक्त निर्मळ माणूस होणारा
दुबळ्या दयेच्या चिखलातून माणुसकीला बाहेर काढणारा तू–
पृथ्वीच्या व्यवहारात ईश्वराचा हात माणसांपर्यंत पोचवणारा तू–

"...अरे आम्ही आहोत असे करंटे की, आमच्या पेठेत लागतात पताका, फक्त मंत्री आले तर..." असा आसूडही ओढला आहे. पू. बाबांसारखे आजचे संत कसे "...निघून जातात गस्त घालीत अंधारात, उद्ध्वस्त मनाच्या मोहल्ल्यातून, आसवांच्या दलदलीतून दुःखानं उसवलेल्या दुनियेवर अमृताचं सिंचन करीत..." याचा प्रत्यय यावा.

संतश्रेष्ठ आणि कविश्रेष्ठ तुकाराम कुसुमाग्रजांनी त्याच्याच पाणनिळ्या शब्दांच्या नितळ सरोवरात माघरात्रीच्या आकाशासारखा उमटलेला पाहिला आहे. सामान्यजनांनी काढलेले सिनेमा-नाटकातील तुकारामाचे शब्दचित्र दुलदुलीत कणाहीन आणि भाबडेही इथे चित्रित होते. पण कवींना दिसलेला तुकाराम–

...तो दिसला मला
दृष्टीला उसण देणारा एक प्रचंड विस्तार,
निळ्याजांभळ्या मेघांचा विराट मेळावा
सहस्रावधी विजांचे आणि वादळांचे
पंख पालवीत,
इंद्रधनुष्यांचे रसरशीत तुकडे उधळीत
अंतराळातील शून्याच्या साम्राज्याला
प्रखर अस्तित्वाची देणगी देत
अनंताच्या रहस्यमय मंदिराकडे
मार्गक्रमण करणारा. "

असा आहे. तुकारामाची ही एक प्रतीती आहे असे मला वाटते. एका सहधर्मी कवीने इतिहासकालीन युगप्रवर्तक कवीला कसे आत सामावून घ्यावे याचा हा एक नमुना ठरावा.

पुराणकालीन साहित्यातील 'राधा' ही अनेक युगात कवींना प्रेरक ठरली आहे. आजही 'राधा' हो 'मिथ्' कवींची आवडती. कवींच्या विमुक्त प्रतिभेचे मला ते एक प्रतीक वाटते. या संकल्पनेभोवती मराठीतील प्राचीन आणि अर्वाचीन कवींच्या कविता सहज पाहता याव्यात. पण कवींच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा घेऊन उमटणारी 'राधे'वरची कविता तशी विरळच. कविवर्य पु. शि. रेगे यांची निखळ सौंदर्यवती 'त्रिधा-राधा' म्हणूनच आपल्या चिरनूतन सौंदर्यासह रसिकाला भुरळ घालीत राहते. या दृष्टीने कुसुमाग्रजांची मुक्तायनातील 'राधा' लक्षणीय आहे. या भावकवितेचे मूळ रूप उत्कट चितनिकेचे झालेले दिसेल. 'राधा'–

"त्रिकालाबाधित पुरुष मनातील
युगयात्रिक आकांक्षा
नवथर अनभिज्ञ
वेणुवादनाच्या
पाकळ्या फुलविणारी
रसज्ञता.
त्रिकाळ पाणनागांच्या प्रतिकारासाठी
किनाऱ्यावरील
प्रोत्साहन.
गौरवाच्या मस्तकी मुकुट घालणारी
नेत्रातील निःशब्द
भावारती.
जखमांचे रक्त
अस्मितेचे दहन
पापण्यांनी टिपणारी
संजीवनी.
प्रणयात मातृत्व
मिलाफलेला
पुरंध्र ओठांचा
स्पर्शोत्सव.
व्यभिचाराच्या अदम्य आमंत्रक
साहसदेशातील
मुशाफरी." (पृ. १२७. २८)

या कवितेतील 'राधे'ला एक बंदिस्त रूप प्राप्त झालेले जाणवते. कवींच्या चिंतनाने तिच्या व्यक्तिमत्त्वाचे पुराणकालीन विशेष नेमके शब्दांकित केलेले आहेत. अर्थबहुल शब्दांचा काटेकोर वापर लक्षणीय. 'रसज्ञता', 'भावारती', 'संजीवनी' यांसारख्या गुणविशेषांना प्रतिमांचे सामर्थ्य देण्यात कवी यशस्वी झालेले दिसतील. एकूण ही संपूर्ण कविता एखाद्या उभ्या, सजीव शिल्पासारखी वाटावी.

याच न्यायाने 'सातवा' (पृ. ५०) मधील सातवा चमचा रसिक मनाला खूप काही सांगून जाईल. त्याला व्यक्तित्व देण्यात कुसुमाग्रज यशस्वी होतातच, पण या निमित्ताने कोसळलेल्या घरसंसाराचे हृद्य, उत्कट व शोकात्म चित्र साकार होत जाते ते विलोभनीय आहे. 'ती असती तर' तो हरवला नसता– अशा अद्वैतरूप प्रीतीची ही कविता म्हणजे एक कहाणी होय, असेच मानावे लागेल. याप्रमाणेच 'जमीन खानदेशची' (पृ. १३२) या कवितेत सानेगुरुजी, कविवर्य केशवसुत आणि आगगाडीखाली सापडलेले बालकवी– त्यांच्या उभ्या आयुष्यासहित जाणवतात. अत्यंत कमीत कमी शब्दांतून साकारणारी ही शब्दचित्रे 'मुक्तायना'चा एक ठळक विशेष होय. कुसुमाग्रजांच्या जाणिवेचा ठाव घेणारी ही व्यक्तित्वे आहेत. एरवी इतक्या प्रत्ययकारितेने ती शब्दांत उतरली नसती.

याहून 'वैरागी' (पृ. १४४) हे शब्दचित्र व त्याची खुमारी काही न्यारीच मानावी लागते. 'वैरागी' या शीर्षकातच त्याची खुमारी दडली आहे. 'तुझ्या रूपात सूर्याच्या उगवत्या किरणांचे देवळाच्या कळसावरून निथळणारे केशरपाणी... तुझ्या शब्दांत आंब्याच्या वनात बहरलेली अल्लड कैऱ्यांच्या सुवासात माखलेली कोकिळगाणी...' असा हा 'वैरागी' कवींच्यामध्ये आत कुठे दडून असावा. कुसुमाग्रजांची निसर्गभक्ती बाभूळ झाडाच्या नकारात त्याचे रूप पाहते. इथे मला चांगल्या अर्थाने बालकवींच्या 'औदुंबरा'ची आठवण आली. या दृष्टीने बांगला देशाच्या निर्मितीची साक्ष असलेला 'भारत सैनिक'ही बऱ्याच प्रमाणात यशस्वी उतरला आहे. कवींना सर्वांत 'मधुर स्वर मनगटावरील शृंखला खळाखळा तुटण्याचा' जाणवावा, यातही राष्ट्रवादी वृत्तीबरोबर मुक्त स्वातंत्र्यवादी कवींचेच दर्शन घडते यात शंका नाही. 'मुक्तायना'तील या शब्दचित्रांची विविधता कुणाही रसिकाला जाणवावी.

'मुक्तायना'तील तत्त्वज्ञ कवींचे दर्शन हा तर त्याचा आणखी एक खास विशेष मानावा लागतो. कुसुमाग्रजांचा मुक्तात्मा त्यांच्यातील 'मी'चे दर्शन घडवताना त्याचे या जगाशी, ईश्वराशी, माणसाशी व निसर्गाशी भावसंबंध कसे आहेत हेही प्रतीतीदर्शक भाषेत नोंदवतो. जन्म आणि मृत्यू यांच्या संदर्भात काळाचे चित्र रेखाटताना काळाचा एक तुकडा जो 'दिवस' तो कवीला–

"...पण नेहमीच, कालवृक्षावरून गळणाऱ्या पर्णाचा... क्षितिजाखालून क्षणाक्षणाने वर सरकणाऱ्या मरणाचा..." प्रवास म्हणजे दिवस. 'मी' कसा? तर–

...सृष्टीतील सृजनशक्तीचा
मी आहे एक खास उन्मेष...
...माझी एक खाजगी पृथ्वी असते
जिच्यावर वावरत असतं
माझं अस्तित्व...

असे कवी सांगतात. आणि म्हणतात–

...तुम्हा लोकांना मी दिसतो ना माताजी,
तो मी नसतोच... आणि तसाही नसतोच.
तुम्हाला दिसतात त्या फक्त असतात, माझ्या रूपाचा अनुवाद करणाऱ्या रंगीत चिध्यांच्या बाहुल्या.

...माणूस आपल्यापर्यंत पोचतो, तो एका संबंधामधून, पण त्या संबंधाच्या तुकड्याहून तो केवढातरी अफाट प्रचंड असतो... (पृ. २५) हे स्वतःचे चित्र तर आहेच. पण माणसाच्या व्यापक संबंधावरचे हे भाष्य, अंतर्मुख कविवर्यांचे दर्शन घडवणारे ठरते. कवींच्या चिंतनशीलतेला भावनेचा पदर आहे. ते शुष्क वा नीरस वाटत नाही.

याहून निसर्गात हरवणाऱ्या आणि जीवनाशी तद्रूपता साधणाऱ्या कलंदर कुसुमाग्रजांना पाहण्यात एक वेगळाच आनंद आहे. उदा. 'तेव्हा' मधील (पृ. २८) पहाटे कोकिळेची चौधारी पल्लेदार स्वरावळ ऐकून संगमरवरी स्तंभाला टेकून उभी राहिलेली, किंचित हसणारी व रुपेरी वस्त्राचे हेम अलगद उचलणारी व्याधाची चांदणी. 'हरवणं' (पृ. २९) मधील सर्वेंद्रियांनिशी या जगतात, निसर्गात, जीवनाच्या इंद्रधनुष्यात बुडून जाणारा कवी भेटतो–त्याचे रूप विलक्षण मोहक आहे. कवी म्हणतात, "...हे हरवणं आता चालूच राहणार आहे...नक्षत्रांकित आकाशातून– पृथ्वीच्या नकाशातून– स्मितांच्या ताटव्यांतून...स्पर्शाच्या मैफलीतून... कोणाच्या दिठीतून... कोणाच्या मिठीतून...गीतांच्या चंद्रशालांतून...मतांच्या

कोलाहलातून...प्रेमाच्या अमृतमय पाशांतून...द्वेषाच्या सर्पाकार रोषातून..." आणि "...पापणीत साकळलेल्या एखाद्या थेंबातून आणि कोटयवधी सूर्यमाला अंतरंगात साठवणाऱ्या आकाशगंगेतूनही..." या ठिकाणी अखंड गतिशील, जीवनवादी व सर्जनशील मनाच्या कवीचे दर्शन सहज घडावे, असे मला वाटते.

जीवनाबद्दल कुसुमाग्रज एक 'खेळ' (पृ. ३२) म्हणून पाहत असावे अशी दृष्टी इथे व्यक्त होते. उदा. "...आणि लक्षात ठेव...हा एक खेळ आहे. खेळाच्याच नियमांनी बांधलेला– निर्मळ विलोरी आनंदात साधलेला..." अशा जीवनाकडे आनंदी वृत्तीने पाहणाऱ्या कुसुमाग्रजांनी पुढे संयत भाषेत म्हटले आहे–

> " आघात करायचा, पण रक्त काढायचं नाही
> जीव ओतायचा पण जीवन हरपायचं नाही
> विसर्जित व्हायचं पण स्वत्व गमवायचं नाही
> आणि आपल्या अंतरंगातील पंच, तटस्थ
> समयसूज्ञ साक्षी
> थांवा म्हणतील त्या क्षणी थांबायचं,
> आणि जवळ जमलेले
> –चंद्राचे तुकडे घेऊन आपापल्या अंधारात
> विलीन व्हायचं..."

यातील अलिप्तपणे आपल्या अंताकडे पाहणाऱ्या थोर कलावंताचे दर्शन मोठे मोहक आहे. कवींची जीवनाबद्दलची प्रगल्भ जाणीव इथे व्यक्त होते. जीवनाच्या अटळ प्रवाहात वाटयाला आलेले सुखाचे चंद्रासारखे सुंदर क्षण घेऊन आपापल्या अंधारात विलीन होण्याची कल्पना फक्त कलावंताचे मनच करू शकते.

'मुक्तायना'तील धर्म व ईश्वर याबद्दलच्या जाणिवांना चिंतनाची एक खास झलक आहे. कवी म्हणतात– मला गवसलेल्या त्या चिरनूतन ईश्वराचा धर्म नावाने ओळखल्या जाणाऱ्या जरठ दुभंगलेल्या कवचाशी सुतराम संबंध नाही. ईश्वर म्हणजे अनाद्यंत सौन्दर्य आणि अगणित आकाशांचे उगमस्थान. सर्व धर्मांनी त्याला मातीत खणलेल्या तळघात कर्मकांडाची जाळी टाकून धरण्याचा प्रयत्न केला. त्यांना फक्त विविध भाषांतील ईश्वरार्थी शब्द सापडले. बाकी काही नाही. ('फक्त शब्द' पृ. ३३)

कुसुमाग्रजांमधल्या कलावंताचा एक पाय हा पृथ्वीवरील चिखलातून चालताना, आकाशगंगेमध्ये पडलेल्या कलावंताचा पाय आहे असे मला वाटते. ('पायवाटेवर'; पृ. ३४) त्यामुळे सगळे जग अनुभवून त्याची वस्ती नेहमी नक्षत्रांवर राहिली आहे असे म्हणता येईल. 'नक्षत्रांनो' (पृ. ४६) या कवितेत कवी म्हणतात–

> "...हे नक्षत्रांनो, तुम्हीही माझ्यावर अपार प्रेम केलंत
> लक्षावधी प्रकाशवर्षांच्या अंतरावर भ्रमण करणारे
> तुमचे विश्वात्मक ज्वालांचे अगम्य विस्तार,
> निशिगंधाच्या प्रकाशित गुच्छासारखे,
> या आकाशात प्रगटले, ते माझ्यासाठीच.
> कोठल्या मैदानावर पडून माझ्या जीवनाचा धागा
> मी तुमच्या अस्तित्वाशी बांधित बसलो...
> तेव्हा–
> संसारातील सारं वात्सल्य तुमच्या दृष्टीत उमललं
> निद्रिस्त मुलाच्या कपाळावरील केस,
> आईनं बाजूला सारावेत
> त्याप्रमाणे माझ्या मन:स्थितीचे
> सारे अस्वस्थ किनारे–
> उदासीनतेचे, उद्वेगाचे, तत्वज्ञानाचे, तत्त्वशोधाचे
> केव्हा देहातून द्रवणाऱ्या शबल वासनेचे,
> केव्हा मनात उजळणाऱ्या
> धूसर साधनेचे–
> हलक्या हाताने बाजूला सारून
> तुम्हीच मला उचललंत
> सहस्र प्रकाश हस्तांनी आपल्या उराशी
> आणि म्हणालात–जगणं म्हणजे प्रेम करणं.
> फक्त प्रेम करणं..."

मग ते जगणं कुणाचंही असू दे. असा निसर्गातून जीवन जगण्याचा प्रेममय संदेश घेणारे प्रेरणा घेणारे, कुसुमाग्रजांसारखे कलावंत कवी या जगाच्या अखंड स्थिती–गतीचे साक्षी ठरत असतात. ताऱ्यांनी झुंबरलेल्या आभाळाकडून जीवनाची प्रेरणा मिळवणाऱ्या या प्रकारच्या कलावंतांचा जीवनरथ धर्मराजाच्या रथासारखा माती सोडून चालत असतो. तरच असे काही हाती लाभत असते असे मला वाटते. एरवी प्रत्येकाच्याच पायाला माती आणि गती हे सत्य !

निसर्गाशी एकजीव झालेल्या कलावंत, कुसुमाग्रजांची ही प्रकाशदायी प्रेममय जीवन दृष्टी 'मुक्तायना'त सर्वत्र फाकलेली दिसेल. आणि ही दृष्टीच, 'घृणास्पद' (पृ. ५४८) या त्यांच्याच कवितेतील भीषण व वास्तववादी जीवन जगायला उद्युक्त करील. निदान विश्वास निर्माण

करील. 'कलोजस'' मधील 'सामान्य माणूस' त्यामुळे आसूड ओढीत आपल्या ग्रहमालेचा परिवार जीवनाच्या अंतराळात मिरवीत नेणारा एक साक्षात 'सूर्यनारायण' वाटेल. 'नदी' (पृ. ४९) मधील उघड्या निळ्या वक्षावर. कवींची नजर, असह्य घट्ट दाबून धरणारी नदी त्यामुळेच एक व्यक्तित्व धारण करणारी ठरली आहे. 'नदीकिनारी' हा कलावंत कवी कालातीत खडकावर अढळ ताऱ्यासारखा बसून राहिलेला जाणवतो. त्याला 'अंधार' (पृ. ७०) स्वयंभू वाटतो. "...आपण काही काल असतो आणि नंतर अनंत काल नसतो एवढं एकच खरं–" हे सत्य पटून जाते.

परंतु आपले अस्तित्व अल्पकालीन असले तरी लक्षावधी प्रकाशधारांनी या वैश्विक काळोखाला ते कापीत असते. सहस्रमुखांनी जीवनानुभूती पीत असते. दशदिशांत ते पल्लवीत होत असते. ते नसण्याची कल्पना त्यामुळेच सहन होत नाही. म्हणूनच धर्म, धर्मग्रंथ आणि प्रेषित, संत, मवाली, नेते, ज्ञाते, आणि सैनिक, सारे सारेजण नास्तित्वाची भीती मालवण्यात गुंतलेले असतात.

या सांगण्यात एका तत्त्वचिंतकाची जीवनविषयक प्रगल्भ जाणीवच व्यक्त झालेली दिसावी. एकूण मानवी अस्तित्व, ईश्वर, मृत्यू यांविषयी 'मुक्तायना'तील हे चिंतन रसिकाची जीवनविषयक दृष्टी स्वच्छ करणारे आहे, असे मला वाटते.

अशी ही जीवनविषयक सखोल जाणीव आणि कुसुमाग्रजांचे कवितेला लगडून येणारे चिंतन. "कारण माणसं कशी जगतात यापेक्षा माणसं जगतात हे अधिक महत्त्वाचं अधिक खरंही" ('बऱ्यापैकी' पृ. ८७), "गाभारा सलामत तो देव पचास" ('गाभारा' पृ. ८१), "कारण माणसाच्या चिरंतन एकटेपणाला त्याने दिली आहे एक आई, अंधारातून हाक मारायला" ('संशोधक' पृ. ९०), "अखेरतः संस्कृती म्हणजे माझ्या मनाचं सामर्थ्य" ('संस्कृती' पृ. १०४) "हा सवाल दयेचा नाही, समराचा आहे." ('तेव्हाच' पृ. १११), "इथे पुरला आहे परमेश्वर जो होता मध्याधार सर्व धर्मांचा... दुर्बलांचा दावेदार, बलवंतांचा दास असणारा... नव्या ईश्वरतेचे पर्यायी नाव 'नास्तिकता'ही असू शकेल..." ('याच मातीनतू' पृ. ११३) असे सांगते.

सहज 'मुक्तायन' चाळतानाची ही कविमनाची स्पंदने 'मुक्तायना'च्या वजनात भर टाकणारी वाटतात. ती एकूणच कवितेला वजन व गांभीर्य प्राप्त करून देत असतात.

या संग्रहाची अर्पणपत्रिकासुद्धा बोलकी आहे. कुसुमाग्रजांनी संत मानलेल्या पू. आमटे यांच्या परिवाराच्या आनंदवन आणि भमरागड यथील कार्यास हा संग्रह अर्पण करण्यात आला आहे. विशुद्ध माणुसकीचा एक धागा दुसऱ्या धाग्याशी त्यामुळे जोडला गेला आहे. दुहीच्या आगी लागलेल्या राष्ट्राला त्यामुळे काही प्रेरणा मिळावी.

एका कवींनी दुसऱ्या कवींना वाहिलेली ही आदरांजली समाजात अखंड मानवतेचा दिवा तेवता ठेवील अशी श्रद्धा. 'मुक्तायना'च्या आशयाशी ही अर्पणपत्रिका वरीच सुसंगत आहे.

'मुक्तायन'वर टाकलेल्या या दृष्टिक्षेपात आणखीही एक गोष्ट सहज लक्षात आली. क्वचित मुक्त लय सोडून 'तूच आता' (पृ. ३१) यासारखी एखादी रचना अभंगसदृश छंदात अवतरली आहे.

दुसरे म्हणजे नाट्यात्म व वक्तृत्वपूर्ण शैलीचा आश्रय केल्यामुळे काही वेळा मूळ अनुभव कातीव किंवा सोलीव स्वरूपात व्यक्त होत नाही. तो काहीसा पसरट होत राहतो. (उदा. 'बऱ्यापैकी' पृ. ८५) तसेच, क्वचित काही कविता गद्यसदृश वाटू शकतात. (उदा. 'विस्मरण' पृ. १३४) क्वचित छपाईच्या वेळी मूळ अंतर्गत लयीचा वा बाह्य उच्चारानुसारी लयीचा खटका साधलेला दिसत नाही. पण या बरोबरच, एक असे वाटून जाईल की, मुक्त लयीत एवढा ९३ कवितांचा व सुमारे १४५ पृष्ठांचा संग्रह सरसर वाचून होणे आणि नाट्यातील स्वगतासारखा मनाला तो भिडणे, हे यश एकूण आजच्या अछंदहीन व लयहीन कवितानिर्मितीच्या काळात दुर्मीळच.

या 'मुक्तायना'तील अनेक कवितांचे शेवट मोठे मार्मिक आणि कलात्मक आहेत. ते दुसऱ्या नव्या कवितांना जन्म देणारे ठरतील. मी 'मुक्तायना'च्या नंतरच्या अशा अनेक कवितांची वाट पाहत आहे...

[मुक्तायन : कुसुमाग्रज; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; किंमत तीस रुपये]

■

## : २ :

# डॉ. आंबेडकरांचे आणखी एक चरित्र (!)

द. न. गोखले

'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' हे प्रा. डॉ. भालचंद्र फडके यांनी लिहिलेले चरित्र श्रीविद्या प्रकाशनाने गेल्या वर्षी प्रसिद्ध केले. (मूल्य ७५ रुपये, पृष्ठे डेमी ३००) या चरित्रातील आशय नि त्याची मांडणी ही एवढी अस्ताव्यस्त नि बेशिस्त आहे की, डॉ. आंबेडकरांच्या कार्यावर नि विचारांवर चरित्राचा रोख आहे, हे प्रयत्नपूर्वक समजावून घ्यावे लागते. चरित्रकाराने केव्हा वृत्तांतकथनावर भर दिला आहे, केव्हा व्यक्तिदर्शन महत्त्वाचे मानले आहे, केव्हा वादविवादाचा फड उभा केला आहे, केव्हा चालू घडामोडींवर उपदेशात्मक नि टीकात्मक ताशेरे झाडले आहेत, तर केव्हा चरित्रोपयोगी साधनसामग्रीची चर्चा केली आहे. पण वास्तविक पाहता, हे सर्व या चरित्रात गौण किंवा अप्रस्तुत आहे. एक विचारवंत नि कर्तृत्वसंपन्न लोकाग्रणी म्हणून डॉ. आंबेडकरांचे जीवन वाचकांच्या दृष्टीसमोर आकारत जावे, हे या चरित्राचे मुख्य उद्दिष्ट दिसते. पण हे उद्दिष्ट चरित्रकाराने वारंवार दृष्टिआड केल्याने त्याची फार घरसोड झाली आहे आणि चरित्र फार विषम नि व्यस्त बनले आहे.

चरित्र विषम नि व्यस्त होण्यास आणखीही काही कारणे आहेत. चरित्रकाराने सर्वत्र स्वतः डॉ. आंबेडकरांच्या चरित्राचे कथन केले आहे; म्हणजे त्याचे कथन 'तृतीय-पुरुषी' आहे. पण मध्येच दुसऱ्या प्रकरणात त्याला काय हुक्की आली कोणास ठाऊक ! त्या प्रकरणाला 'सूर्य उगवतो आहे' असे स्वतःच्या शब्दांत चमकदार शीर्षक त्याने दिले आहे आणि 'डॉ. आंबेडकरांच्या शब्दांत त्यांची आत्मकथा' प्रकरणभर सांगितली आहे ! म्हणजे ते कथन 'प्रथम-पुरुषी' आणि काल्पनिक आहे ! विशिष्ट कालखंडांना धरून त्याने केव्हा मांडणी केली आहे, (उदाहरणार्थ, प्र. २ रे, २१ वे वगैरे) तर केव्हा विशिष्ट विषयांना धरून त्याने आपले निवेदन सादर केले आहे. (उदाहरणार्थ मूकनायक, स्वतंत्र मजूर पक्ष वगैरे). कालखंडप्रधान नि विषयप्रधान निवेदनाचा गोपालकालाही त्याने अनेकदा केला आहे. पुनरुक्तीची तर त्याला मुळीच पर्वा नाही. पुनरुक्ती काही वेळा अपरिहार्य असते, काही वेळा शोभादायक असते, हे मान्य करूनही या चरित्रात वैरस्यकारक, नि ढिलेपणातून उद्भवलेली पुनरुक्ती पुष्कळ आहे, हा दोष स्वीकारावा लागेल. पुनरुक्ती जशी घटनांच्या वृत्तांताची आहे, विचारांच्या सारांशाची आहे, तशीच लेखकाच्या भाष्याची नि प्रतिपादनाचीही आहे. प्रकरणांत अंक टाकून प्रकरणांच्या शेवटी त्यानुसार 'संदर्भ, टीपा...' दिल्या आहेत. पण कोठे अंक गळले आहेत, तर कोठे टिपा गळल्या आहेत ! चरित्राच्या शेवटी 'अभ्यासाची साधने' हे भरगच्च परिशिष्ट जोडले आहे; पण तीनशे पृष्ठांच्या या चरित्राला कसलीही सूची नाही. चरित्रात वाक्यरचनेच्या नि शुद्धलेखनाच्या एवढ्या चुका आहेत की, त्यांवर एक स्वतंत्र लेखच लिहावा लागेल.

नाही म्हणायला, या पुस्तकाचा कागद मात्र पांढरा स्वच्छ आहे नि छपाई सुबक नि सुंदर आहे.

ज्या वेळी 'कार्य नि विचार' यांना चरित्रात प्राधान्य असते, त्या वेळी चरित्रनायकाचे विचार त्याच्या जीवनासह कसे कसे विकसत गेले, ते चरित्रकाराने दाखविणे योग्य ठरते. विचार कार्यात कसकसे उमटले, दोघांत कोण केव्हा तोकडे ठरले, परस्परांचा एकमेकांवर कोणता परिणाम झाला, वगैरे शोध घेणे हेही चरित्रकाराकडून अपेक्षित असते. प्रा. फडक्यांनी डॉ. आंबेडकरांच्या लेखनांचा नि भाषणांचा सारांश वेळोवेळी दिला आहे. पण त्यांच्या निरनिराळ्या विचारांचा विकास, त्यांतील चढउतार कसोशीने शोधलेला नाही. प्रा. फडक्यांनी डॉ. आंबेडकरांचे कार्य सांगितले आहे. तेथे कार्य नि विचार यांचा संबंध आपोआपच बराचसा स्पष्ट होतो. पण दोन्हींचा परस्परसापेक्ष सहेतुक अभ्यास प्रा. फडक्यांनी केलेला दिसत नाही. डॉ. आंबेडकर केवळ पुस्तकी विचारवंत नव्हते; तर राजकारणाच्या धकाधकीच्या मामल्यात नित्य घुसणारे कृतिशील नेते होते. त्यामुळे वास्तवाला सामोरे जाताना त्यांना काही वैचारिक तडजोडी स्वीकाराव्या लागल्या का, तसे असल्यास त्यांनी त्या कशा स्वीकारल्या, त्यात परिस्थितीचा भाग किती नि त्यांच्या व्यक्तिस्वभावाचा

...६

भाग किती, वगैरे प्रश्नांचा पाठपुरावा या चरित्रात उद्बोधक ठरला असता.

'कार्य नि विचार' यांना प्राधान्य देणाऱ्या चरित्रात कार्यांचे नि विचारांचे प्रत्यक्ष मूल्यमापन असावे काय, हा प्रश्न विवाद्य असू शकेल. पण असे चरित्र लिहिणाऱ्या चरित्रकाराच्या मनात ते मूल्यमापन अध्याहृत असायला हवे, यात शंका नाही. मूल्यमापन जर अध्याहृत नसेल तर त्याला कार्याविषयी नि विचारांविषयी काही रेखीव नि नेमकी विधाने करताच येणार नाहीत. वर्णनात्मक नि गुणात्मक विधाने करताना त्याची लेखणी गोलमाल शब्द वापरील, किंवा लोकप्रिय मूल्यश्रेणी आंधळेपणाने गृहीत धरील, किंवा चरित्रनायकाच्या कार्याची नि विचाराची नुसती स्तुती करीत सुटेल. डॉ. आंबेडकरांनी पुरस्कारलेली स्वातंत्र्य, समता, बंधुता, स्त्रीमुक्ती, दलितोद्धार, 'एक माणूस एक मूल्य' वगैरे तत्त्वे आता बहुमान्य झालेली आहेत. त्यामुळे त्या तत्त्वांबद्दल डॉ. आंबेडकरांची प्रशंसा करताना प्रा. फडक्यांची काहीच अडचण नव्हती. पण राष्ट्रवाद, राजकीय स्वातंत्र्य, हिंदुत्वाची अपरिहार्य अंगे, धर्माचे पुनरुज्जीवन वगैरे विषयांचाही डॉ. आंबेडकरांच्या जीवनात फार घनिष्ठ संबंध आला, आणि ते विषय थोडेफार विवाद्य झालेले होते. तेव्हा त्यांच्याविषयी अधिक खोलात नि अधिक सूक्ष्मात जाऊन प्रा. फडक्यांनी आपली भूमिका ठरवावयास पाहिजे होती. जेथे दोन मूल्यांचा संघर्ष येतो किंवा त्यांच्यामधील तारतम्य ठरवावे लागते तेथे मूल्यांचाच नव्हे, तर मूल्यश्रेणीचाही विचार त्यांच्याकडून कसून व्हावयास हवा होता.

डॉ. आंबेडकरांनी आपल्या वाणीने, लेखणीने, नि कृतीने भारतीय समाजाला अनेक वैचारिक धक्के दिले. म. गांधी, वीर सावरकर, पं. नेहरू, डॉ. राजेंद्रप्रसाद, मार्क्स, मनू वगैरे श्रेष्ठींशी त्यांनी कित्येक बौद्धिक संघर्ष केले. तेव्हा, त्यांच्या कार्याला नि विचारांना प्राधान्य देऊन त्यांचे कसदार चरित्र लिहू पाहणाऱ्या चरित्रकाराचे तात्त्विक चिंतन चांगले व्यापक, उत्तुंग, नि मूलगामी हवे. प्रा. फडके डॉ. आंबेडकरांचे प्रशंसक असले तरी अशा चिंतनात थिटे पडतात. डॉ. आंबेडकरांच्या चरित्रात गुंफले गेलेले पुढीलसारखे वैचारिक नि व्यावहारिक प्रश्न प्रा. फडक्यांनी स्वतःशी नीट उलगडले असावेत असे वाटत नाही—

राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि अस्पृश्यांच्या दुःस्थितीचे निवारण यांत महत्त्व कोणाला? राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळून उच्च-वर्णीयांच्या हातात सत्ता जाईल आणि त्या सत्तेखाली अस्पृश्यांची गळचेपी होईल. त्यापेक्षा परकीय इंग्रज सत्तेखाली अस्पृश्यांची प्रगती झपाट्याने होणे शक्य आहे; असे एखाद्या अस्पृश्योद्धारकास प्रामाणिकपणे वाटत असेल, तर त्याने काय करावे? या पेचाची सोडवणूक डॉ. आंबेडकरांनी वेळोवेळी कशी केली? अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ मिळाल्यास हिंदू समाज फुटेल, असे म. गांधींना वाटत होते; तर तसे मतदारसंघ मिळाल्याशिवाय अस्पृश्यांचा उद्धार होणार नाही, असे डॉ. आंबेडकरांना वाटत होते. यांत कोणती भूमिका ग्राह्य होती? की दोन्ही भूमिकांचा संघर्ष होणेच योग्य होते? पुणे-कराराच्या वेळी डॉ. आंबेडकर तत्त्वाला जागले, की राजकारणी ठरले, की दबावाला बळी पडले, की त्यांच्या उदार मनाचा तेव्हा प्रत्यय आला? वीर सावरकरांना वाटत होते की, चातुर्वर्ण्य, जातिव्यवस्था, अस्पृश्यता वगैरे हिंदू समाजाची अंगे असली, तरी अपरिहार्य अंगे नाहीत. ती अंगे सुधारून हिंदू समाज जगवणे नि जागवणे शक्य आहे. डॉ. आंबेडकरांना वाटे, की ही हिंदू समाजाची अपरिहार्य अंगे आहेत. ही अंगे म्हणजेच हिंदू समाज. जोवर हिंदुत्व आहे तोवर चातुर्वर्ण्य, जातिव्यवस्था, अस्पृश्यता वगैरे राहाणारच— यात बरोबर कोण? चूक कोण? सद्यःस्थिती काय सांगते? व्यवहार्य भाग कशात अधिक आहे? डॉ. आंबेडकर एकीकडे म. गांधींना त्यांच्या अंतःस्फूर्तीच्या, बुद्धिवादविरोधी भूमिकेबद्दल नावे ठेवीत होते आणि दुसरीकडे अस्पृश्यांना बौद्ध धर्माची दीक्षा देऊ बघत होते. यात विसंगती होती काय? बौद्ध धर्म, किंवा कोणताही विद्यमान धर्म निखळ बुद्धिवादी असू शकतो काय? अस्पृश्यांनी बौद्ध धर्म स्वीकारल्यास त्यांना मुक्तीचा मार्ग सापडेल, त्यांना केवळ सामाजिक समतेचाच लाभ होणार नाही तर त्यांचे आर्थिक दास्यही संपेल, असे डॉ. आंबेडकर म्हणाले होते. (पृ. २५७). पण धर्मान्तरामुळे यांपैकी काय साधले? जात गेली का? समता लाभली का? आर्थिक अवनती संपली का? नसेल तर, धर्मांतर कितपत समर्थनीय होते? पिढ्यान्‌पिढ्या अस्पृश्यांवर अमानुष अन्याय करणाऱ्या सवर्णांना कडकडून चावा घ्यावा, त्यांच्यावर सूड उग-

बावा, म्हणून तर धर्मांतराचा प्रस्ताव पुढे आला नसेल ना? डॉ. आंबेडकरांनी परिश्रमपूर्वक तयार केलेले हिंदू-कोड-बिल कुजवले गेले, याला कारण डॉ. राजेंद्र-प्रसाद वगैरे उच्चपदस्थ पुराणमताभिमान्यांचा विरोध असेल, पं. नेहरूंची पक्षशरणता असेल, पण हिंदू समाजाच्या घटनेसंबंधी डॉ. आंबेडकरांचे काही आडाखे हुकले हेही एक कारण असेल का?

डॉ. आंबेडकरांच्या चरित्रात असे अनेक जटिल प्रश्न गुंतलेले आहेत. चरित्रकाराने त्या सर्वांची उत्तरे चरित्रात नोंदवली पाहिजेत, असा आग्रह नाही. किंबहुना चरित्रकाराची सर्व उत्तरे वाचकाला पटावीत, पटतील, अशीही अपेक्षा नाही. विशिष्ट उत्तरे सूचित करण्यासाठी येथे काही प्रश्न उपस्थित केले आहेत, असेही नाही. पण, डॉ. आंबेडकरांच्या कार्याचा नि विचारांचा परामर्श घेऊ पाहणाऱ्या चरित्रकाराने केवढे चिंतन स्वतःशी केले पाहिजे, ते या प्रश्नांवरून ध्यानात यावे, म्हणून हा प्रपंच केला.

प्रा. फडके सामान्य दैनिकाच्या एखाद्या सुमार संपादकाप्रमाणे प्रचलित घडामोडींवर उडती टीका करतात, अगदी क्वचित डॉ. आंबेडकरांचा एखादा दोष दाखवून त्यांच्यावर उथळ कौतुकाची फुले वारंवार उधळतात आणि चरित्राला उच्च वैचारिक बैठक लाभूच देत नाहीत.

खरे तर, 'डॉ. आंबेडकर' म्हणजे विचारगर्भ चरित्र लिहू पाहणाऱ्या लेखकांना लाभणारा एक कौस्तुभ आहे. विविध, मूलगामी नि बंडखोर विचारांनी झळाळलेले; अष्टपैलू व्यक्तित्वाने मंडित झालेले; भारताच्या विशाल पटावरील नि घरादारातील अनेक घटनाप्रसंगांनी खचून भरलेले; विचारात विकार नि दोन्हीत व्यवहार मिसळल्यामुळे चिवरेबावरे झालेले; हे जीवन चरित्रग्रंथांच्या कांचन-कोंदणात जडवणे म्हणजे चरित्रकाराला मिळालेले मोठे आव्हान नि आवाहन होते. मराठीतील एक अत्युत्कृष्ट वैचारिक चरित्र 'डॉ. आंबेडकर' या विषयातून निर्माण व्हावयास हवे होते. पण प्रा. फडक्यांनी या सुंदर विषयाचा चुथडा करून टाकला आहे.

[ डॉ. बाबासाहेब आंबेडकर : भालचंद्र फडके; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; किंमत पंच्याहत्तर रुपये ]

■

: ३ :

## एक सांगीतिक आत्मचरित्र

वामनराव देशपांडे

प्रस्तुत 'अत्तर सुगंध' हे पुस्तक म्हणजे श्री.दीक्षितांचे एक सांगीतिक आत्मचरित्रच म्हटले पाहिजे. तसे पाहिले तर हा अशा सांगीतिक आत्मचरित्राचा दुसरा भाग आहे. कारण त्याचा पहिला भाग 'षड्ज गांधार' या नावाने १९६७ सालीच प्रसिद्ध झाला होता आणि तो त्या वेळी गाजलाही होता. खरं म्हणजे ही दोन्हीही पुस्तके म्हणजे दीक्षितांच्या सांगीतिक श्रीमंतीने रसरसलेल्या संगीतकारांच्या व्यक्तिचित्रांचा, आधीच ठिकठिकाणी प्रसिद्ध झालेला, संग्रह आहे. दीक्षितांची श्रीमंती वरवरची नाही, ती आंतरिक उमाळ्याची आहे. कारण श्री. दीक्षित हे एक स्वतःच संगीताचे व्यासंगी आहेत. त्यांची संगीताची जाण, स्वतः ते प्रत्यक्ष मैफली कलाकार नसले तरी एखाद्या अनुभवी संगीतज्ञाइतकीच मार्मिक आहे. या ग्रंथातही ते शास्त्रीय चिकित्सा, विश्लेषण अथवा काही सैद्धांतिक विवेचन करतात असा त्यांचा स्वतःचा दावा नसला, तरीही संबंधित कलाकारांविषयी केलेली, सहजपणाने आलेली त्यांची काही टिपणे अतिशय मोलाची आहेत.तरुणपणात त्यांनी भोर संस्थानचे दरबार कलाकार बाबूराव गुरव व त्यांचे गुरुजी त्र्यंबकराव गुरव यांच्यापाशी जवळजवळ तीन वर्षे तबल्याची व पखवाजाची खास तालीम घेतली.त्याच सुमारास त्यांनी श्री. सच्चिदानंद फडके यांच्या वडिलांच्या जवळ अशीच तीन वर्षे व्हायोलीनची तालीम घेतली. ते पेटीही वाजवतात. गाण्याची तालीम त्यांनी त्यांच्याजवळच घेतली. या खेरीज एम. ए.ला त्यांचा इंग्रजी हा विषय होता. व संस्कृतवरही प्रभुत्व. या खेरीज उर्दूची दर्द त्यांना खूपच आहे. एल. एल.बी. झाल्यानंतर त्यांनी कोर्टामध्ये वादी-प्रतिवादींच्या सान्निध्यात काही वर्षे घालविली पण संगीताच्या आंतरिक ओढीमुळे संगीताच्या वादी-संवादीतच घुसण्यासाठी त्यांनी रेडियोचीच नोकरी पत्करली.








तेथे वर चढत चढत ते गेले आणि वरिष्ठ साहेब झाले. तरी त्यांच्यातला कलाकार हा सतत जागृतच राहिला. फाइलीमध्ये डोके खुपसून एकीकडे तीत टिपणे करीत असतानाच संगीतकारांच्या साहित्यिकांच्या गर्दीशी त्यांचा कलात्मक संवाद चालूच राहिला. त्यात मोठेमोठे कलाकार होते. विशेष म्हणजे त्यांच्यातला साहित्यिक मूळचाच होता. शिवाय माटे मास्तरांच्या रसिकतेची मोहिनीही त्यांच्यावर पडलेली आहे. इतका सुशिक्षित, सुसंस्कृत, कलासक्त आणि शिवाय स्वतःच साहित्यिक असल्यामुळे या पुस्तकातून आलेली कलाकारांची व्यक्तिचित्रे अतिशय मार्मिक आणि लोभसवाणी उतरलेली आहेत. त्यातला 'अत्तरसुगंध' सर्वत्र दरवळून राहिलेला आहे. अशा व्यक्तित्वाचा लेखक संगीताला लाभला ही फार महत्त्वाची गोष्ट झाली. ते मैफली कलाकार झाले असते तर ही व्यक्तिचित्रे लिहिण्याच्या छंदात पडू शकले नसते.

यात पहिले आणि शेवटचे असे दोन लेख सोडले तर एकूण सतरा कलाकारांची हजेरी लागलेली आहे.पहिल्या लेखात पुण्याच्या संगीतपरंपरेचे समग्र वर्णन आलेले आहे.१८७४सालचा सहस्रबुद्धयांचा 'पूना गायन समाज,' भास्करबुवा बखले यांचा अकरा सालचा 'भारत गायन समाज' आणि अब्दुल करीमखाँ साहेबांचे बारा सालचे 'आर्य संगीत विद्यालय' वगैरे संस्था जोरात चालू होत्या. शिवाय महान महान संगीतकारांचे वास्तव्य त्या काळात पुण्यातच होते. त्यात स्वतः भास्करबुवा बखले, त्यांचे शिष्य मास्तर कृष्णराव, दत्तोबा बागलकोटकर आणि बापूराव केतकर, शिवाय हिराबाई बडोदेकर, सुरेशबाबू माने, सुंदराबाई, माणिकबाईंच्या मातोश्री हिराबाई दादरकर, यल्लीबाई वगैरे वगैरे होत्या आणि पुढे पुढे तर रामकृष्णबुवा वझेच येथे येऊन स्थायिक झाले. ती परंपरा पुढे राहिली नाही आणि पुण्याला सांगीतिक हीनकळा आली. पण आता पुण्याला पूर्वीची प्रतिष्ठा लाभण्याची चिन्हे दिसत आहेत. पं. भीमसेन जोशी तर पुण्यालाच गेली कित्येक वर्षे ठाण देऊन राहत आहेत. हल्ली तर पं. जितेंद्र अभिषेकींनी पुण्यालाच घर केले आहे. आणि श्रीमती किशोरी आमोणकरांनीही फ्लॅट घेतला आहे. व हळूहळू त्या येथेच राहायला येतील अशी अपेक्षा आहे. संगीतकारांना आता परत पुणे आवडायला लागले आहे. ही सगळी शुभचिन्हे आहेत. जाता जाता एका महत्त्वाच्या गोष्टीचा निर्देश आवर्जून करावासा वाटतो. १५१० सालच्या सुमारास बंगालमधील चैतन्य महाप्रभू येथे आले होते व पुण्यातील वेदपठणाची,भागवत धर्माची आणि वेदविद्येची त्यांच्यावर एवढी छाप पडली की, त्यांनी पुण्याला 'पूर्णग्राम' म्हणून नामाभिधान दिले असे त्यांचे परमशिष्य गोविंददास यांनी लिहून ठेवले आहे असा उल्लेख दीक्षित करतात.

शेवटचा लेख म्हणजे ग्रंथाचे नाव सार्थ करणारा 'अत्तरसुगंध' हा. यात दीक्षितांच्या वकिलीच्या काळातल्या आपल्या सीनिअरच्या संपर्कात आलेल्या एका अत्तरवाल्याची अत्यंत दर्दभरी कहाणी आलेली आहे.तो रसीला सीनियर आणि उससे ज्यादा तो अत्तरवाला यांचे या लेखात मनोज्ञ दर्शन होते. मला वाटले होते की, आमच्या जयपूर घराण्याची 'अत्तरसुगंध' ह्या तोंडाची 'वसंतीकेदार' रागातली चीज गाणाऱ्या एखाद्या कलावतीची ही पेशकारी असावी. पण निघाली ती 'सुनिए साहब, पूनाका मोसम एक कुदरती दुवा है' हे म्हणत म्हणत घरात शिरणाऱ्या एका अत्तरवाल्याची कहाणी. त्याने आपले खानदान पार नूरजहानच्या वेळी अत्तर करणाऱ्यांपर्यंत नेऊन पोहोचवले होते. तो सांगे, 'साहब, साऱ्या दुनियेतली अत्तरे माझ्या गुलाबाच्या अत्तरापुढे फिकी पडतील. हम लोग गुलाब भी कैसे परखते है जानते हो ?' म्हणून आपली कहाणी सुरू केली. अत्तरालासुद्धा त्याचे गिऱ्हाईक जाणकार हवे असते. त्या वेळी दीक्षित अत्तरसुगंधाच्या मस्तीतल्या तारुण्यात होते. ते पुढे रेडियोत गेले आणि दरसाली येणाऱ्या अत्तरवाल्याच्या गप्पात रंगून जाण्याचे दिवस संपले.पण यातली महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या अत्तरवाल्याच्या कलात्मकतेची दखल या संगीतमय पुस्तकात मोठ्या खुबीने घेतली आहे. दीक्षित आता म्हणतात,

'याद तेरी इससे कुछ कम नही
दिलमे यह हो तो कुछ गम नहीं :'

या ग्रंथात आता सांगितलेले दोन लेख वगळले तर एकूण सतरा संगीतकारांची हजेरी लागलेली आहे, असे आताच सांगितले. त्यांची नावनिशी अशी:

१) 'सूरसंगत सरदार' – म्हणजे श्रीमंत सरदार आबासाहेब मुजूमदार.

२) 'बाळकृष्णचरणी लक्ष लागो' – काशीकरबुवा, नरहरबुवा कऱ्हाडकर इत्यादी थोर थोर कीर्तनकार.

३) 'सगुण-निर्गुण दोन्ही विलक्षण' – माणिक वर्मा व त्यांच्या मातोश्री हिराबाई.

४) कहा के पथिक कहा ' – पं. दत्तात्रय, पं. विष्णू दिगंबर पलुस्कर.
५) 'पं. गजाननबुवा जोशी.'
६) 'दिलरंग' ऊर्फ उस्ताद अजमतखाँ
७) 'गजलसम्राज्ञी' म्हणजे बेगम अख्तर.
८) 'या भवनातील गीत पुराणे' – वसंतराव देशपांडे
९) 'ए मालिक तेरे बंदे हम'– दिग्दर्शक वसंतराव देसाई.
१०) 'बाई ग प्रीती नको ही कुणाची' – मधुकर गोळवलकर.
११) 'नादब्रह्मर्षी' अल्लाउद्दीनखाँ, – रविशंकर, अली-अकबर, वगैरे.
१२) 'श्रीधर पार्सेकर.'
१३) 'उस्ताद अब्दुल हलीम जाफरखाँ.'
१४) 'धिग तान, धिगतान्, धिगेतान्'– अनेक तबली-यांची आणि पखवाजीयांची दखल.
१५) 'सारंगी आणि कादरबक्ष.'
१६) 'ते के न जानीम हे'– एका अनामिक कलावतीची कहाणी.
१७) 'सजनवा रहियो कि जइहो'-- गजल गायिका– नसीम.

स्थलाभावी सर्वच कलाकारांची दखल या परीक्षणात घेता येणार नाही. पण एखाद दुसरे तरी नमुन्यादाखल येथे हजर केले पाहिजे. तरच या पुस्तकाचे स्वरूप व रंग कळून येईल.

उदाहरणार्थ माणिकबाई वर्मा. त्या गेली चाळीस वर्षं तर सततच गात आहेत. त्यात अभिजात संगीत, ठुमरी आणि भावगीते तर अगणित. आज प्रत्येक घराघरातून त्यांनी गायलेली, रेकॉर्ड केलेली भावगीते ऐकली आणि गुणगुणली जातात. हिराबाई बडोदेकर व ज्योत्स्ना भोळे यांच्या ऐन वैभवाच्या काळात त्या उदयाला आल्या आणि आपले भावगीतातले स्थान त्यांनी पक्के केले. माणिकबाईंनी अनेक गुरू केले. त्यांत जगन्नाथबुवा पुरोहित, इनायत खाँ, सुरेशबाबू माने, अजमतखाँ वगैरे तर आलेच. पण दीक्षित म्हणतात, " गंगेला कितीतरी ओघ मिळतात. पण त्यांना सामावून पुन: 'गाङ्ग वारि मनोहरि' असं गंगेचं स्वतःचं मधुर अस्तित्व जाणवतं तसंच अगदी कटाक्षानं बघितलं तर थोडासा खुशबो सुरेशबाबूंच्या गायकीचा आढळतो. पण अगदी खरं म्हणजे मला वाटतं, त्यांच्या गाण्यातला गोडवा हा त्यांच्या आईचाच वारसा– हिराबाई दादरकरांचा" माणिक-बाईंनी बालगंधर्वांची नाट्यगीते त्यांच्याच अप्रतीम ढंगाने गाईली. बालगंधर्वांना ती इतकी आवडली की, 'माझे गाणे आता माणिकच राखील.' असे उद्गार त्यांनी काढले. दीक्षित पुढे आणखी म्हणतात, 'माणिकचे गाणे ऐकल्यावर कसं शांत उल्हसित वाटतं. माणिकचं गाणं ऐकताना भारतीय संगीत ऐकतानाच महाकवी शेक्सपियरच्या एका प्रसिद्ध वचनाची आठवण होते.

> "Tell me where is fancy bred
> Or in the heart or in the head
> How begot, how nourished
> Reply, Reply."

पण आवाजाची, गोडव्याची, लाघवी गाण्याची किमया त्यांना त्यांच्या मातोश्री हिराबाई दादरकर यांच्या-कडून मिळाली, असे दीक्षित सांगतात. या हिराबाई गाणाऱ्या होत्या हेही मला माहीत नव्हतं! पण त्या इतक्या चांगल्या गात असत हे दीक्षितांच्याकडूनच कळले. कारण त्यांचे गाणे माळशिरसला त्यांनी स्वत: ठरविले होते व ते त्यांनी मनमुराद ऐकले होते, त्यावर ते बेहद्द खूष झाले होते. त्या ख्याल, ठुमरी सर्व काही म्हणत आणि विशेष म्हणजे दीक्षित सांगतात, " त्या अदाकारीही उत्तम करीत, अगदी घायाळ होण्यासारखी. बाईंचा आवाज निकोप. माणिकबाईंच्या आवाजाच्या जातीचाच, उंच नाही. आलापीही बेताचीच. लय फार धीमी नव्हती. त्यामुळे तालाचे खाणे नीटपणे भरले जात होते. त्यांना दत्तोबा बागलकोटकरांचीही तालीम होती. म्हणजे ही भास्करबुवांचीच गायकी. त्यांची तान जलद, स्वच्छ होतीच. शिवाय लयीच्या अंगाचा अदमास असा पक्का होता की, आतल्या आत वळणारी त्यांची तान आवर्तन लयीच्या अंतर्गत अनुरोधानं वळत असे. हे कठीण असे. मुळातच लय अंगी मुरावी लागते. उगीच आटापिटा करून गाण्याला फार कष्ट होताहेत असंही वाटत नव्हतं. त्यांनी बोलताना घेतल्या नाहीत, सरगम नाही, सरळ गाणं." हिराबाईंना आग्रेवाले बशीरखाँ यांचीही तालीम होती. त्यामुळे त्या लय-तालात पक्क्या असणे स्वाभाविकच होते. त्यांची हजेरी या गाण्यातच नव्हे, तर लेखातही लागली आहे. शिवाय आता विस्मृतीत गेलेल्या सोलापूरच्या महबूबजान यांचीही गोष्ट तशीच.





अनुक्रमणिका

श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार हे तर पुण्याचं भूषणच. त्यांच्या काळात त्यांच्या घरात न गायलेला असा कलाकार सापडणे कठीण. कलाकारांची त्यांच्या-एवढी कदर कोणीही केली नाही. औदार्य कर्णाचे. त्यात इस्टेट गेली कोर्ट ऑफ वार्डस्कडे. तेव्हा कलाकारांची बिदागी देणे कठीण झाले. पण जेव्हा त्यातून शेवटी जे काही परत हातात आले त्या वेळी त्यांच्याकडे बिना-मोबदला गाणाऱ्या गायकांची बिदागी कित्येक वर्षांनी त्यांच्याकडे जाऊन सुपूर्द केली !

'बाळकृष्णचरणी लक्ष लागो' हा लेख तर अगदी बहारीचा जमला आहे. चिलयाची गोष्ट सांगताना एका अनामिक कीर्तनकाराने रंगविलेले त्याचे आख्यान तर अगदी बहारीने दीक्षितांच्या लेखणीने रंगविले आहे. शिवाय त्या वेळी काशिकर बुवांच्यासारखे बहुरंगी आणि पट्टीचे गायक, गागाभट्टासारखे विद्वान आणि वेदांती, नरहरबुवा कऱ्हाडकर यांच्यासारखा विनोदी, हजर-जबाबी, भास्करबुवांच्या गायनरसात डुंबणारा, तसेच निजामपूरकरबुवा, शिरवळकरबुवा वगैरेंचीही हजेरी लागली आहे. हा सर्वच लेख इतक्या बहारीने रंगविला आहे की दीक्षित 'स्वतःच पट्टीचे कीर्तनकार आहेत की काय असा संभ्रम पडतो.

मधुकर गोळवलकर ही एक अजब वल्ली. सुगम संगीत तर त्यांच्या रक्तातच भिनले होते. 'पहिलं प्रेम', 'शादीची पहिली रात.' बेगम अख्तरचा विलक्षण तेजस्वी आवाज, एखाद्या रागातल्या चीजेचा मुखडा, अशा गोष्टींत हा माणूस निरागस बालकाच्या स्वप्नातल्या हास्यासारखा त्या त्या आठवणीत सदोदित आनंदित असायचा. त्यांनी अनेक गीतांना चाली दिल्या. पाकिस्तानी युद्धाच्या वेळी माडगूळकरांची बहुतेक गीते संगीतबद्ध केली. 'हे राष्ट्र देवतांचे, हे राष्ट्र प्रेषितांचे, आचंद्रसूर्य नांदो स्वातंत्र्य भारताचे' हे गीत तर राष्ट्रगीत होण्याच्या लायकीचे, त्याला गोळवलकरांनी कल्पकतेने एक पुस्ती जोडली ती "तमसो मा, ज्योतिर्गमय! मृत्योर्मा अमृतं गमय–वगैरे आणि ती माडगूळकरांना इतकी आवडली की त्यांच्या तोंडून 'जीते रहो पठ्ठे !', असे सहजोद्गार निघाले. गोळवलकरांनी अनंत रसिकांना, श्रोत्यांना तृप्त केलं. पण त्यांचं कौतुक जितकं व्हावं तितकं झालं नाही. तसे ते सुदैवी ठरले नाहीत. मलासुद्धा त्यांची महती दीक्षितांच्या लेखावरूनच कळली.

असे किती नमुने सांगावे ? दीक्षितांची लेखणी बहुरंगी, बहुढंगी, एखाद्या पट्टीच्या गायकाची संगीताची जाण असलेली अशी आहे. त्यांची लेखणी अशीच लिहिती राहो. अजून पुष्कळ कलाकार राहिले आहेत. त्यांत जुन्या पिढीच्या गुरुवर्य श्रीमती मोगूबाई कुर्डीकर, भीमसेन जोशी, कुमार गंधर्व, मल्लिकार्जुन मन्सूर, पं. जसराज, शोभा गुर्टू, किशोरी आमोणकर, गजानन वाटवे, आणि आणखी कित्येक आहेत. त्यांची दखल कोणी घ्यायची ?

जाता जाता एवढे सांगावेसे वाटते की, प्रत्येक कलाकाराचे जन्म-मृत्यू सालं दिली असती आणि सर्व कलाकारांची आर्टपेपरवर चित्रे दिली असती तर या ग्रंथाला आणखी उठावदारपणा आला असता. ही सर्व व्यक्ति-चित्रे हौसेनं रेखाटली असली तरी ती अखेर सांगीतिक इतिहासाचा एक महत्त्वाचा भाग होऊन पुढील पिढ्यांना मार्गदर्शक होतात. ती लिहिणे हे सांगीतिक कर्तव्यच आहे. तसेच कलाकारांच्या सत्याग्रहाची हकीकत त्या वेळी त्याचे प्रत्यक्षच साक्षीदार असल्याने त्यांच्याइतकी कोणीच साक्षेपाने लिहू शकणार नाही. हे काम तर त्यांनी आणि त्यांनीच पुरे केले पाहिजे. ते त्यांनी अग्रक्रमाने हाती घ्यावे.

■

## साभार स्वीकार

### प्रवास

**गोव्याचे दिवस** : वसुधा माने; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △ **आवजो** : पद्मजा फाटक; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. ५० △ **कल्पद्रुमातळी** : मधुवंती सप्रे; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; १९८६ रु. १२ △ **लागेबांधे** : बाबा भांड : साकेत प्रकाशन, औरंगाबाद; १९८५ (२ आ.); रु. ४५ △

: ४ :

# संशोधनाची क्षितिजे

म. प. पेठे

डॉ. वि. भि. ऊर्फ भाऊसाहेब कोलते यांच्या ह्या अमृतमहोत्सव गौरवग्रंथात अनेक नामवंत अभ्यासकांनी आपापल्या क्षेत्रातील विषयावर लिहिलेले संशोधनपूर्ण निबंध आहेत. डॉ. कोलते यांच्या विद्वत्तेस आणि त्यांच्या विविध क्षेत्रातील कामगिरीस साजेसा हा गौरवग्रंथ आहे.

ग्रंथात समाविष्ट केलेले एकोणीस शोधनिबंध चार विभागांत वाटले आहेत : (१) महानुभाव साहित्य आणि संशोधन, (२) मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती, (३) प्राचीन भारतीय इतिहास आणि पुरातत्त्व व (४) शिक्षण आणि अध्यापन. ह्यानंतरच्या पाचव्या विभागात 'डॉ. भाऊसाहेब कोलते : संशोधक, संपादक आणि व्यक्ती' ह्या विषयावर पाच लेख आहेत. ग्रंथाच्या अखेरीस डॉ. कोलते यांच्या लेखांची सूची आहे. डॉ. कोलते यांच्या जीवितकार्याला अभिवादन करण्याच्या प्रेरणेतून प्रस्तुत ग्रंथ साकार झाला असल्याचे संपादकांनी म्हटले आहे (मलपृष्ठ २). त्यांचा हेतू साध्य झाला आहे, असे ग्रंथ वाचल्यावर वाटते.

महानुभावसाहित्य हा डॉ. कोलते यांच्या संशोधनाचा मुख्य विषय असल्याने त्या विषयावरील निबंधांना ग्रंथात अग्रक्रम मिळणे स्वाभाविक आहे. ह्या विभागात एकंदर सहा लेख असून महानुभाव पंथ, त्यांचे साहित्य आणि तद्विषयक झालेले संशोधन ह्याविषयी त्यांत उपयुक्त माहिती मिळते.

डॉ. तुळपुळे यांनी डॉ. रेसाइड (Raeside), डॉ. फेल्डहाउस (Feldhaus), व डॉ. झोन्‍ल्हाइमर (Sontheimer) या तीन पाश्चात्त्य संशोधकांनी महानुभाव वाङ्मय व पंथ ह्याविषयी केलेल्या संशोधनाची माहिती दिली आहे. डॉ. तुळपुळे वेदांना 'निर्जीव' (पृ. २) का म्हणतात ते कळत नाही. वेदकालीन संस्कृत भाषा आज 'निर्जीव' झाली आहे असे कोणी म्हणणे शक्य आहे, परंतु त्यामुळे त्या भाषेत रचलेले वेदही 'निर्जीव' झाले आहेत असे म्हणणे अयोग्य आहे. ज्ञानेश्वरकालीन मराठी आज 'निर्जीव' झाली आहे असे म्हणणे शक्य आहे, परंतु त्यामुळे ज्ञानेश्वरीदेखील 'निर्जीव' झाली आहे असे म्हणणे सत्यास सोडून होईल. प्राच्यविद्यांचे पाश्चात्त्य अभ्यासक अर्वाचीन भारतीय भाषांत निर्माण होणाऱ्या 'जिवंत साहित्याकडे' वळले त्याचे एक कारण डॉ. तुळपुळे देतात ते असे की, निर्जीव झालेल्या वेदांचा अभ्यास करण्यापेक्षा आधुनिक जिवंत साहित्याचा अभ्यास अधिक फलदायी होईल, असे त्यांना वाटले. 'अधिक फलदायी' ह्याचा कोणता अर्थ डॉ. तुळपुळे यांना अभिप्रेत आहे ह्याची कल्पना नाही. प्राच्यविद्यांचा अभ्यास पाश्चात्त्य राष्ट्रांत होऊ लागल्यावर सुरुवातीस अनेक वर्षे उपेक्षित राहिलेल्या एका अंगाकडे त्यांचे लक्ष आता गेले आहे असे म्हणणे सयुक्तिक ठरेल. पाश्चात्त्य राष्ट्रांत वेदांचा अभ्यास तो 'फलदायी' नाही म्हणून अजून लोप पावलेला नाही. पाश्चात्त्य संशोधकांनी ही जी नवी वाटचाल सुरू केली तिचा आरंभ प्रो. झुल ब्लॉक यांच्या La formation de La Langue marathe ह्या ग्रंथाने झाला (पृ. २) असे प्रो. तुळपुळे कसे म्हणतात ? प्रो. ब्लॉक यांचा ग्रंथ १९२० साली प्रसिद्ध झाला. त्याच्या कितीतरी आधी (१८५६) काल्डवेलचे Comparative Grammar of Dravidian Languages प्रसिद्ध झाले आहे.

ग्रंथातला दुसरा निबंध डॉ. यू. म. पठाण यांचा 'महानुभाव संशोधन : वाटचाल व दिशा' असा आहे. संशोधनाची दिशा दाखवताना त्यांनी पुढील विषयांचा उल्लेख केला आहे : (१) बौद्ध व जैन मतांचा महानुभाव तत्त्वज्ञानावरील प्रभाव; (२) महानुभाव ग्रंथावरील टीका व भाष्यग्रंथांचे अध्ययन; (३) महानुभाव महंतांना मिळालेल्या फार्सी सनदांचा अभ्यास. प्रा. पठाणांनी एके ठिकाणी म्हटले आहे : महानुभावांचे लोकसाहित्य मौखिक परंपरेने जपून ठेवले आहे, ते लौकरच 'अक्षरबद्ध' होणे आवश्यक आहे (पृ. १५), कोठलेही वाङ्मय अक्षरबद्ध असतेच. प्रा. पठाणांना ते 'लिपिबद्ध' व्हायला हवे असे म्हणायचे असावे.

डॉ. तुळपुळ्यांच्या पहिल्या लेखाच्या अखेरच्या वाक्यात पाश्चात्त्य संशोधकांनी केलेल्या संशोधनाच्या तुलनेत महाराष्ट्रीय संशोधकांचे संशोधन, डॉ. कोलते यांचा एकमेव अपवाद वगळता, खुजे वाटते, ह्याबद्दल

त्यांनी खंत व्यक्त केली आहे, तर त्यानंतरच्याच लेखाच्या अगदी आरंभीच्या वाक्यात डॉ. पठाण यांनी ह्या संशोधनक्षेत्रात (महाराष्ट्रातील) ज्येष्ठ संशोधकांनी केलेले कार्य 'मोलाचे' आहे असे प्रशस्तिपत्रक दिले आहे.

डॉ. उषा देशमुख यांनी वारकरी पंथ व महानुभाव पंथ यांच्यातील संबंधाची माहिती दिली आहे व ते पंथ लोकप्रिय होण्याची कारणे विशद केली आहेत. दोन्ही पंथांतील लेखकांनी मराठी भाषेत लेखन करून देश-भाषेला प्रतिष्ठा मिळवून दिली. पुंडलिक ह्या विट्ठलाच्या आद्यभक्ताने त्या दैवताची उपासना सुरू केल्यामुळे. विट्ठल हा कर्नाटकातून पंढरपुरी प्रस्थापित झाला. (पृ. २०) लेखिकेच्या ह्या वाक्यातला कार्यकारणभाव कळत नाही. राम, कृष्ण आणि शिव विट्ठलरूपाने पंढरपुरास असल्यामुळे त्यांची उपासना करण्याचा मंत्र 'रामकृष्ण हरी' आहे (पृ. २२). असे असते तर त्या मंत्रात 'हरी' ऐवजी 'हर' असे हवे होते. तेव्हा त्या मंत्राचा व राम, कृष्ण व शिव हे देव पंढरपुरात असण्याचा संबंध असेल असे वाटत नाही. परमार्थविचार, अध्यात्मविचार व तत्त्वविचार (पृ. १७) असे तीन शब्द योजून लेखिकेला कोणता निरनिराळा अर्थ व्यक्त करावयाचा आहे? "विचारस्वातंत्र्य आणि आचारस्वातंत्र्याचे बाळकडू मराठी माणसाला त्याच्या जन्मापासूनच मिळू लागलेले आहे" (पृ. १९) हे विधान कितपत सत्य आहे?

ह्यानंतरच्या लेखात प्रा. घनपलवार यांनी लीळा-चरित्राच्या आधारे आंध्र व महाराष्ट्र यांच्या सांस्कृतिक संबंधांवर प्रकाश टाकला आहे. पृ. ३९ वर लेखकाने लक्ष्मणा-स्वयंवर या काव्यातली एक ओवी (पृ. ५.८०) उद्धृत केली आहे. लक्ष्मणा नावाची राजकन्या स्वयं-वराच्या वेळी प्रासादातून निघून आपल्या पित्याजवळ आली[१] याचे वर्णन कवीने कृष्णा नदी सागरास येऊन मिळाली ह्या रूपकाद्वारे केले आहे. ह्या ओवीतल्या श्रीगिरी ह्या शब्दाने श्रीशैल्यचा बोध होतो हे लेखकाचे म्हणणे पटण्यासारखे आहे. परंतु सागर हा नदीचा पती मानला गेला आहे, पिता नव्हे, तेव्हा कवीचे वर्णन प्रसिद्ध कविसंकेतास सोडून आहे ह्याविषयी लेखकाने काहीच म्हटले नाही. पृ. ४४ वरील डाकराम आणि द्राक्षाराम ह्यासंबंधीची लेखकाची विधाने वाचकास गोंधळात टाकणारी आहेत. 'गावां नावं डाक्रामु' ह्या पंक्तीत येणारे डाक्राम हे ग्रामनाम भंडारा जिल्ह्यातील सुकळी-डाक्राम हे नसून आंध्रातील पूर्व गोदावरी जिल्ह्यातील द्राक्षाराम हे क्षेत्र आहे, असे लेखकाला म्हणावयाचे आहे हे उघड आहे. पण पृष्ठ ४४ वरील 'डाकराम म्हणजे द्राक्षाराम' ह्या मथळ्याखालील वाक्ये गोंधळ निर्माण करतात.

डॉ. व. दा. कुलकर्णी यांनी महानुभावीय टीका व भाष्य परंपरा यांचा अभ्यास करून काढलेला निष्कर्ष असा आहे की, महानुभाव पंथ वैदिक परंपरेला मानत नसला तरी अर्थनिर्णयाच्या बाबतीत त्यांचे धोरण वैदिक परंपरेत निर्माण झालेल्या अर्थनिर्णयशास्त्राशी संवादी असेच आहे. पृ. ५३ वर डॉ. कुलकर्णी अभिधा, लक्षणा व व्यंजना यांना शब्दशक्ती म्हणण्याऐवजी अनवधानाने त्यांना शब्दार्थ असे म्हणतात.

पहिल्या विभागातील शेवटच्या लेखात डॉ. मधुकर वाकोडे यांनी 'लीळाचरित्रा'त आढळणारी लोक-तत्त्वे विशद करून सांगितली आहेत. लोकांच्या अंध-श्रद्धेला 'लोकतत्त्व' असे नाव दिले तरी त्याने आशय बदलत नाही. पृ. ७२ वर डॉ. वाकोडे देवतांच्या 'स्वयंभू' स्थळांचा उल्लेख करतात. देवता स्वयंभू असतात की त्यांची स्थळे? 'स्वयंभू' ह्या शब्दाने त्यांना देवतेचा जिथे नेहमी वास असतो ते स्थळ असा अर्थ अभिप्रेत असावा, असे वाटते. पृ. ७३-७४ वर लेखकाने एक लोक-कथा आणि एक लीळा ह्या समांतर असल्याचे म्हटले आहे. ह्या दोन्हीत असलेला 'तपशीलातील फरक' डॉ. वाकोडे म्हणतात तसा दुर्लक्षिता येईल. परंतु लोककथेत मत्सराने पेटलेली सवत स्वार्थामुळे विद्रुप होते ह्या घट-नेला महत्त्व आहे. तसे लीळेत काही एक नाही. त्यामुळे लोककथा व लीळेचा संबंध स्पष्ट वाटत नाही.

'मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती' ह्या दुसऱ्या विभागात एकंदर सात लेख आहेत.

'दैवी वाक्' ह्या विषयावरील आपल्या पहिल्या लेखात डॉ. ग. त्र्यं. देशपांडे 'दैवी वाक्' ह्या शब्द-प्रयोगाचा अर्थ 'वैदिक मंत्र' एवढाच मानीत नाहीत. साक्षात्कारी पुरुषांच्या अंतःकरणातून जी प्रकट झाली ती दैवी वाक् असा व्यापक अर्थ ते करीत असल्याने पुराणोक्त व आगमोक्त मंत्र ह्याबरोबर संतवाणी हा पण दैवी वाक् आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. ह्याचे एक कारण ते असेही देतात की, जिच्यात प्रेरणा देण्याचे सामर्थ्य आहे ती दैवी वाक् किंवा मंत्र. परंतु 'दैवी वाक्' चा अर्थ इतका व्यापक करण्याविषयी मतभेद होण्याची

शक्यता आहे. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' ह्या घोषणेने अनेकांना प्रेरणा दिल्यामुळे आपण त्या घोषणेला एका अर्थाने स्वराज्याचा 'मंत्र' म्हणतो. पण त्याला 'दैवी वाक्' कोणी म्हणणार नाही.आपले म्हणणे स्पष्ट करण्यासाठी डॉ. देशपांडे वैदिक वाङ्मयातील सत्ये संतवाणीत प्रकट झाल्याची उदाहरणे देतात. ह्यातील उत्स्फूर्त भाग कोणता आणि उपनिषदांत वगैरे सांगितलेला आशय मायबोलीत सांगितलेला कोणता ह्याचा थोडा खुलासा लेखकाने करावयास हवा होता. संकटकाळी धीर देणे आणि मनोमल धुऊन काढणे ही दैवी वाक्ची दोन प्रयोजने लेखात सांगितली आहेत. दैवी वाक्चे एक वैशिष्ट्य सांगताना डॉ. देशपांडे म्हणतात की, 'ऋषिमुखातून प्रकट होणारी ही वाक् अखंड वाक्यरूप असते' (पृ. ८९). परंतु ऋषींनी रचलेल्या मंत्रांचेच हे वैशिष्टय आहे असे म्हणता येईल, असे वाटत नाही. आपल्या नित्याच्या व्यवहारात आपण जी वाक्ये उच्चारतो ती देखील अशी अखंडच असतात. पृ. ९२वर 'ऋचो अक्षरे परमे व्योमन' (ऋ. १. १.६४.३९) ह्या मंत्रावर भाष्य करताना चौथ्या पादाला अनुलक्षून (य इद् विदुस्त इमे समासते) "जे या ऋचांच्या योगे त्या परमात्म्याला जाणतात त्यांनाच चिरंतन शाश्वत सुखाचा अनुभव येतो." (पृ. ९२) असे लिहिले आहे. ते जणू त्या पादाचे भाषांतर आहे असा कुणाचा समज होणे अगदी शक्य आहे, पण ते भाषांतर असणे शक्य नाही. पृ. ९५ वर ऋ. १०.७१.१ ह्या मंत्राचा अर्थ सांगताना ते 'आरप्र' शब्दाचा अर्थ 'सुखमय' असा देतात. परंतु 'आरप्र' ह्याचा अर्थ निर्लेप किंवा शुद्ध असा आहे. सायनाचार्य सुद्धा त्याचा अर्थ निरुक्ताच्या आधारे 'पापरहित' असा देतात. (निरुक्त ४.२१: रपो रिप्रमिती पापनामनी भवतः)

श्री. देवीसिंग चौहान यांचा लेख 'मराठी संस्कृती व भाषेत ऋग्वेदाचा संदर्भ' ह्या विषयावर आहे. मराठीतील अनेक शब्दांच्या व्युत्पत्तींच्या आधारे मराठी ही "वैदिकीसंस्कृत पतिता, संस्कृत, ऊढा" भाषा असल्याचा तसेच 'मराठी संस्कृती ही भिन्न देश व उत्तर काळात परिवर्धित झालेली मूलभूततः वैदिक संस्कृतीच होय,' असा निष्कर्ष त्यांनी काढला आहे (पृ.१२९). श्री. चौहान यांचा निष्कर्ष सामान्यतः मान्य व्हायला हरकत नाही, पण ते त्यांनी सुचविलेल्या व्युत्पत्तींच्या आधारे मात्र नव्हे.

श्री. चौहान यांचा इण्डो-इराणी भाषाकुळातील भाषांचा अभ्यास व दीर्घकालीन व्यासंग सर्वश्रुत आहे. पण हे मान्य करूनही त्यांनी सुचविलेल्या व्युत्पत्ती मान्य करता येत नाहीत. व्युत्पत्ती देताना श्री. चौहान अवलंबीत असलेल्या पद्धतीविषयी माझे त्यांच्याशी मतभेद आहेत आणि ते त्यांना ठाऊक आहेत. मतभेद आहेत म्हणून माझेच म्हणणे खरे, असा आग्रह मी धरणे योग्य नव्हे. श्री. चौहान यांनी सुचविलेल्या सर्व व्युत्पत्तींची चर्चा प्रस्तुत परीक्षणात करणे योग्य होणार नाही. धात्वर्थ व व्याकरणविषयक तेवढ्याच काही गोष्टींकडेच वाचकांचे लक्ष वेधीत आहे. संस्कृतातील ऋ, अस्, इट (पृ. ११५) इत्यादी धातूंचे श्री. चौहान 'वाहणे, वितळणे' (पृ.१०८), 'वाहाणे, झिरपणे' (पृ. १०९), 'चलित होणे, वितळणे, पसरणे (पृ. ११५) असे काहीसे समान अर्थ असल्याचे मानतात, परंतु तसे अर्थ त्या धातूंना कुठे आहेत ते सांगत नाहीत. तसेच मराठीत 'वाहाणे, वितळणे', 'वाहाणे, झिरपणे', किंवा 'वितळणे, पसरणे' ह्या क्रिया ते मानतात तशा समानार्थक नाहीत. पृ. १०९ वर 'सत्याः देवेषु आशिषः जगाम' (ऋ. १.१७९.६) ह्याचा 'देवांना त्यांनी अपेक्षिल्याप्रमाणे पाणी त्यांच्याकडे पोचले' असा त्यांनी अर्थ केला आहे, तो शक्य नाही. 'सत्याः'[३] हे अनेकवचनी आहे, 'जगाम' हे एकवचनी आहे. रोदसी म्हणजे द्युलोक व अंतरीक्ष (पृ.१२३) नव्हे, तर द्युलोक व पृथिवी ऋग्वेदातील दध्मसि, दध्यः ही 'ध्मा' धातूची रूपे (पृ. १२७) नव्हेत. ती 'धा' धातूची रूपे आहेत. पृ. १२८ वर उद्धृत केलेल्या ऋ.८.१.२२ ह्या मंत्रातील 'सुन्वते' व 'स्तुवते' ही पदे क्रियापदाची रूपे नाहीत. वर्तमानकाळी धातुसाधित विशेषणाची ती चतुर्थी एकवचनी रूपे आहेत. 'मूकं करोति वाचालं....' ह्या प्रसिद्ध श्लोकाचा मुळात कोठेतरी वैदिक साहित्यात वापर होता (पृ. ११६), हे लेखकाचे म्हणणे शक्य कोटीतील नाही.

डॉ. नरेंद्रनाथ पाटील यांनी भाषा, लोकभाषा आणि परिभाषा ह्या शब्दांचे अर्थ आणि त्यांचे व्यवहारातले स्थान उत्तम रीतीने स्पष्ट केले आहे. पारिभाषिक शब्दांचा वापर शास्त्रीय लिखाणात वाढत्या प्रमाणात व्हायला हवा, ह्या त्यांच्या आग्रहास असे लेखन करणाऱ्यांनी मान द्यायला हवा. "पाणिनीने व्याकरणबद्ध करून टाकल्यानंतर संस्कृत कूपजळ झाले." (पृ. १३५)

...७

असे म्हणणे अयोग्य आहे. व्याकरणबद्ध होताच भाषा कूपजळ होत असत्या तर आज जगातल्या बऱ्याचशा भाषा तशा व्हायला हव्या होत्या. संस्कृतचा दैनंदिन लोकव्यवहारातला वापर जसा कमी होत गेला तशी तिची स्वतंत्र भाषा ह्या दृष्टीने वाढ खुंटली. त्या घटनेला पाणिनी जबाबदार नाही. इंग्रजी 'कम्यूनिकेशन' साठी नुसता संवाद शब्द चालेल असे वाटते. संवाद संस्थापन (पृ. १३५) असे म्हणण्याची आवश्यकता दिसत नाही.

डॉ. भालचंद्र नेमाडे यांनी भाषांतरविषयक प्रश्नांची चर्चा समर्थपणे केली आहे. विसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत भाषांतरविषयक प्रश्नांची चर्चा खऱ्या अर्थाने झालीच नाही. भाषाशास्त्राचा विकास होऊन भाषांतर ही त्या शास्त्राची एक शाखा मानली गेल्यावर भाषांतरविषयक प्रश्नांची खऱ्या अर्थाने मीमांसा होऊ लागली. ह्या मीमांसेचे स्वरूप डॉ. नेमाडे यांनी स्पष्ट केले आहे. मराठीत 'भाषांतर करणे' असा प्रयोग रूढ आहे. 'भाषांतरण करणे' असे कोणी म्हणणार नाही. तेव्हा 'स्थानांतरण करणे, (पृ. १४२) अशा प्रयोगांची आवश्यकता दिसत नाही. लेखकाने (पृ. १४३) वर 'स्थानांतरण सोपे जाईल.' असेच म्हटले आहे, 'स्थानांतरण करणे सोपे जाईल.' असे म्हटले नाही, ते योग्य आहे. पृ. १४३ वर डॉ. नेमाडे यांनी 'लांग'च्या पातळीचा उल्लेख केला आहे. तो सुशिक्षित वाचकांच्याही लक्षात येणार नाही.

डॉ. श्री. वा. भागवतांनी 'आपल्या लेखनविषयक समस्या' ह्या लेखात प्रामुख्याने शुद्धलेखनाच्या प्रश्नांची सोदाहरण चर्चा करून काही उपयुक्त सूचना केल्या आहेत. त्या सूचनांचा विचार शिक्षणक्षेत्रातील अधिकाऱ्यांनी लौकर करावा. अक्षराधिक्य[४] आणि अक्षरन्यूनता ह्या दोन दोषांमुळे व इतर काही कारणांमुळे शुद्धलेखनविषयक नियमांचे उल्लंघन होते आणि सर्वत्र सावळागोंधळ आढळतो. तो दूर करण्यास 'अक्षरमाला वर्णमालेप्रमाणे तंतोतंत वेतून घेतल्यास प्रचलित लेखनपद्धतीतून उद्भवलेल्या समस्या विरून जातील, लेखनविषयक समस्यांची संख्या न्यूनतम होईल, लेखन आटोपशीर होईल आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे प्राथमिक शिक्षण सोपे होऊन त्यातून होणारी आजची गळती थांबेल" (पृ. १५९). हा त्यांनी सुचविलेला उपाय योग्य आहे. पृ. १५६ वर प्रथम दन्तमूलीय[५] व तालव्य असा योग्य तो फरक केल्यावर नंतर दंत्य व तालव्य असा काहीसा चुकीचा फरक डॉ. भागवत का करतात ते कळत नाही. बहुधा हे अनवधानाने घडले असावे. पृ. १५८ वरील वाक्य "तेथे असलेला आधात सामान्यरूपातही राहतो" असे हवे.[६] पृ. १५८-१५९ वरील चर्चेत डॉ. भागवत ज्या, त्या इत्यादी शब्द जॅं, तॅं असे लिहावेत असे सुचवितात. तसे करताना 'ॲ' चा उच्चार कॅच, वॅट इत्यादी शब्दात क्याच, व्याट असा होतो, असे त्यांनी मानले आहे. तसा उच्चार कोणीच करीत नाही असे नाही. पण सर्वसाधारण सुशिक्षित मराठी माणूस कॅच आणि क्याच ह्या दोन उच्चारात फरक करतो. इंग्रजी bat ह्या शब्दाचा मान्य उच्चार बॅट असा होईल, ब्याट असा होणार नाही. मराठीत आज केवळ संस्कृत तत्सम शब्द आहेत असे नाही. इंग्रजी तत्सम शब्दही आहेत. त्यामुळे, ब्याट, क्याट असा उच्चार करणाऱ्यांची इंग्रजी शिकायला लागले की पुन्हा पंचाईत होईल. त्यामुळे डॉ. भागवतांची 'पुण्याचा' हे पुणॅचा असे लिहावे ही सूचना मान्य व्हावी, असे वाटत नाही. 'पुण्याचा' (<पुणे) आणि 'पुण्याचा' (<पुण्य) ह्यांच्या उच्चारातील फरक लेखनात दाखविण्यासाठी दुसरा शब्द 'पुण्ण्याचा' असा लिहावा, असे सुचवावेसे वाटते.

डॉ. म. सु. पाटील यांनी 'नवकाव्यातील विदूषकाचा आदिबंध' ह्या लेखात श्री. बा. सी. मर्ढेकर व इतर चार मराठी कवींच्या कवितेत आढळणाऱ्या विदूषकाचे विश्लेषण केले आहे. आपल्या असंबद्ध ओळींनी आपले पोकळ, ओसाड जिणे भरून काढण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. त्यात अपरिमित वेदना असतात. त्यांच्या असंबद्ध वरळण्यामुळे ते विदूषक वाटतात. प्रेषितांच्या बोलण्यातील द्रष्टेपणा त्यांच्या उक्तीत असतो. त्यामुळे हा विदुषक आजच्या युगाचा प्रेषित आहे असे म्हणता येईल (पृ. १९३). हे त्यांच्या विवेचनाचे सार आहे.

डॉ. रूपा कुलकर्णी यांनी महाराष्ट्रात भरभराटीस आलेल्या संगीतशास्त्राचा प्रभाव महानुभाव कवी नरेंद्र यांच्या रुक्मिणी-स्वयंवर काव्यात कसा प्रत्ययास येतो ते स्पष्ट करून सांगितले आहे. कवी नरेंद्र यांना लाभलेल्या महाराष्ट्रातील समृद्ध संगीतपरंपरेचा उल्लेख डॉ. कुलकर्णी यांनी केला आहे (पृ. १९५-१९६). हा उल्लेख करण्यापूर्वी पंडित, शार्ङ्गदेव व त्यांच्या इतर समकालीन संगीतज्ञांची नावे त्यांनी सांगितली आहेत. प्रश्न असा की, हे सारे जर समकालीन तर त्यांच्यामुळे



अनुक्रमणिका

रूढ झालेल्या संगीत पद्धतीला नरींद्रांच्या दृष्टीने ' परंपरा ' कसे म्हणता येईल ?

गौरवग्रंथाच्या तिसऱ्या विभागात प्राचीन भारतीय इतिहास आणि पुरातत्त्व ह्या विषयावर एकंदर चार लेख आहेत. पहिल्या लेखात तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी आचार्य मण्डनमिश्र[७] व शंकराचार्य यांच्यातील संबंधाविषयीची जी चुकीची कल्पना रूढ आहे तिचे निराकरण केले आहे. शंकरदिग्विजयात मंडनमिश्र व शंकराचार्य यांच्यात झालेले चर्चेचे वर्णन आचरटपणाचे असून तशी चर्चा खरोखरी घडली असणे शक्य नाही, हे त्यांचे म्हणणे योग्य आहे. मण्डनमिश्रांचा ब्रह्मसिद्धी हा ग्रंथ शंकराचार्यांच्या अद्वैत परंपरेतील आहे, तेव्हा मंडनमिश्र हे शंकराचार्यांचे प्रतिस्पर्धी नसून ते त्यांच्याच परंपरेतील आहेत, हे लेखकाचे प्रतिपादन मान्य व्हावे. वाचस्पतिमिश्रांचा ' अभिप्रायही तसाच असल्याचे तर्कतीर्थांनी नमूद केले आहे (पृ. २०९).

दुसरा लेख ' महापाषाणयुगीन विदर्भ ' हा डॉ. शां. भा. देव यांचा आहे. विदर्भात अनेक ठिकाणी ' शिळावर्तुळे ' आढळतात. ही शिळावर्तुळे म्हणजे पूर्वीच्या-काळाची दफने आहेत. त्यांच्यापैकी काही ठिकाणी उत्खनन केले असता जे अवशेष आढळले त्यावरून तत्कालीन संस्कृतिविषयक जी माहिती मिळविणे शक्य आहे ती डॉ. देव यांनी दिली आहे. ही संस्कृती इसवीसनपूर्व सातवे-आठवे शतक इतकी प्राचीन आहे.

विदर्भातील मार्कण्डी नावाच्या खेड्यात असणाऱ्या एका सुरेख देवालयाचे वर्णन डॉ. गो. बं. देगलूरकर यांनी केले आहे. हे मंदिर ' सर्वांगसुंदर, वैचित्र्यपूर्ण मूर्तींनी विनटलेले आणि शिल्पसमृद्ध ' असल्यामुळे ' याला महाराष्ट्रात अन्यत्र तोड नाही, जोड नाही. ' इतके असूनही ह्या मंदिराला ते केवळ ' विदर्भातील मंदिरामध्ये ' देवालय चक्रवर्ती ' शोभावे ' असे आहे, असे का म्हटले आहे कळत नाही. (पृ. २२२; जाड ठसा परीक्षणकर्त्याचा.)

ह्या विभागातला शेवटचा लेख मांढळ गावी सापडलेल्या वाकाटक द्वितीय रुद्रसेनाच्या ताम्रपटाविषयी असून डॉ. अजय मित्र शास्त्री व डॉ. चन्द्रशेखर गुप्त ह्या दोघांचा आहे. ताम्रपटाविषयी सर्व माहिती आणि संपूर्ण ताम्रपटाचे वाचन लेखात दिले आहे. वाकाटकांच्या नंदीवर्धन शाखेचा हा प्राचीनतम लेख असल्याचे लेखकांनी सांगितले आहे. (पृ. २२५). या लेखाची तिथी रुद्रसेनाच्या कारकीर्दीतील पाचव्या वर्षातील वर्षा ऋतूच्या सहाव्या पक्षाचा सातवा दिवस आहे. सर्वसाधारणपणे ऋतू हा दोन महिन्याचा मानला जात असल्यामुळे वर्षाऋतूला सहावा पक्ष कुठला असा प्रश्न मनात येतो. ह्याविषयी लेखकांनी काही म्हटले नाही. कदाचित ही एक निराळी ऋतुगणना इतिहासज्ञांच्या परिचयाची असेल.

' शिक्षण आणि अध्यापन ' ह्या विषयावरील चौथ्या विभागात दोन लेख आहेत.

पहिला लेख श्री. वसंत पळशीकर यांचा " आजचे शिक्षण : सामाजिक– राजकीय– आर्थिक परिप्रेक्ष्य "[८] ह्या विषयावर आहे. ब्रिटिश राजवट इथे सुरू झाली त्या काळापासून अलिकडच्या काळापर्यंत शिक्षणक्षेत्रात स्थिती कशी पालटत गेली, त्याचा आढावा घेत असताना " प्रस्थापित समाजरचनेच्या चौकटीला साजेसे आणि तत्कालीन आर्थिक-औद्योगिक तसेच राजकीय-सामाजिक सांस्कृतिक उद्दिष्टांच्या[९] पूर्ततेच्या दृष्टीने अनुरूप असेच वळण शिक्षणव्यवस्थेने आज घेतलेले आहे हे स्वच्छपणे जाणून घेण्याची गरज आहे, त्याचे महत्त्वही आहे." असे त्यांनी बजावले आहे. (पृ. २३९) त्यांच्या लेखात त्यांनी हा दृष्टिकोण समजावून सांगितला आहे. तो समजून घेण्यास त्यांचे विवेचन मुळातूनच वाचायला हवे. ते वाचल्यावर आपणही ' समाजव्यवस्था, समाजपरिवर्तन आणि शिक्षणव्यवस्था यांचा अन्योन्यसंबंध असतो, व उपव्यवस्था म्हणून शिक्षणव्यवस्थेचे दुय्यम स्थान असते, हे जाणले तर आज जी स्थिती आपण अनुभवीत आहोत ती निर्माण होणे केवळ अपरिहार्यच नव्हे, तर स्वाभाविकही होते[१०] ' (पृ. २६५) .ह्या श्री. पळशीकरांच्या निष्कर्षाशी येऊन पोहोचतो.

प्रा. राम शेवाळकर यांनी ' मराठीचे अध्यापन ' मराठी ज्यांची मातृभाषा आहे, अशांनाही का आवश्यक आहे ते सांगून त्या अध्यापनात कोणते विषय असावेत ह्याचे थोडक्यात दिग्दर्शन केले आहे. त्यांनी सूचित केलेले विषय शिकलेले विद्यार्थी मग मराठी भाषा लेखकासारखीच समर्थपणे वापरू लागतील. त्यांच्या लेखनाचा नमुना...पाठ्यपुस्तकात कैवल्य शोधण्याचे...थांबले पाहिजे. शब्दशरणता बाजूला ठेवली पाहिजे. अक्षरसमूहाच्या अवकाशात आळसून अंग दुमडलेल्या आशयाला प्रकाशात आणून धीर दिला पाहिजे. शतकांच्या उपेक्षेने हताश झालेल्या अशा आशयाने ओठ उघडले तर त्यातून



अनुक्रमणिका

सूर्याच्या साक्षीने नवीन सशक्त सारस्वतांचा शोध लागेल. मराठीच्या अध्यापनाला हा तृतीय[११] नेत्र कधी लाभेल ? (पृ. २६८).

गौरवग्रंथाच्या शेवटच्या विभागात डॉ. भाऊसाहेब कोलते यांच्याविषयी चार लेख आहेत. म. म. डॉ.वा. वि. मिराशी यांनी भाऊसाहेबांच्या इतिहासविषयक संशोधनाची माहिती दिली आहे. डॉ. रायबहादूर हीरालाल यांच्या बरोबरच डॉ. रामकृष्णपंत भांडारकर अथवा डॉ. का. बा. पाठक यांनाही डॉ. मिराशी 'इतर प्रांतातले संशोधक' (पृ. २७२). का मानतात असा प्रथम प्रश्न पडतो. एकेकाळी विदर्भ हा मुंबई प्रांताहून निराळ्या मध्यप्रांतात होता. म्हणून आजही त्यांनी तसे म्हटले आहे हे नंतर लक्षात येते. डॉ. श्रीधर रंगनाथ कुलकर्णी यांनी भाऊसाहेबांच्या संपादनपद्धतीचे वैशिष्ट्य कोणते ते सांगितले आहे. प्रा. भ. प्र. मोहरी– यांनी भाऊसाहेबांच्या साहित्यसेवेची (कवितासंग्रह : 'लव्हाळी' आणि नाटक : 'सोडचिठ्ठी'), तसेच समीक्षेची ('साहित्य संचार') ओळख करून दिली आहे.

शेवटचा 'आमचे भाऊसाहेब : अवघे पाऊणशे वयमान' हा लेख गौरवग्रंथाचे संपादक डॉ. भास्कर लक्ष्मण भोळे यांचा आहे. भाऊसाहेबांच्या चरित्राचे; त्यांच्या जडण-घडणीचे, कामगिरीचे उत्तम दर्शन त्यांनी घडविले आहे. सतत कार्यमग्न राहिल्यामुळे पंचाहत्तरी उलटून गेली तरी 'आता करण्यासारखे काहीही शिल्लक उरलेले नाही' ही रिक्तपणाची भावना त्यांच्या बाबतीत निर्माण होण्याची सुतराम शक्यता नाही' (पृ. ३१८). ही डॉ. भोळे यांनी दिलेली ग्वाही सुखावह आहे.

लेखाच्या शीर्षकात डॉ. भोळे यांनी 'अवघे पाऊणशे वयमान' हे 'शारदा' नाटकातील प्रसिद्ध गाण्याचे शब्द घातले आहेत. ते घातले नसते तर उचित झाले असते.[१२] डॉ. भोळे यांनी त्यांनी त्या शब्दांच्या केलेल्या उपयोगाचे समर्थन केले आहे (पृ. ३०२-३०३), त्यामुळे असे करण्यामागचा त्यांचा हेतू स्पष्ट होतो. पण त्यांच्या हेतूविषयी कोणालाच कधी शंका आली नसती. 'अवघे पाऊणशे वयमान' अशासारख्या शब्दांना नेमके संदर्भ असतात, वाचकांना ते विसरायला होत नाहीत. तेव्हा अशा शब्दांचा उपयोग त्यांच्या संदर्भाची चौकट बाजूस ठेवून आपण करावयाचे म्हटले तरी ते शक्य होत नाही.

प्रस्तुत ग्रंथात काही लेखकांनी रूढ नसलेले, अनावश्यक, अर्थहीन आणि काही अंशी मराठीच्या प्रकृतीशी न जमणारे असे प्रयोग केले आहेत असे वाटते.[१३]

१) पृ. ४ : "पण कोणीतरी ती (सूची) वाढवून दुरुस्त करून, आजतागायत व निर्दोष करील." ह्या वाक्यात 'आजतागायत' हे विशेषणासारखे वापरले आहे ते योग्य वाटत नाही. 'आजतागायत' हे क्रियाविशेषण आहे. इंग्रजीतील up to date (adv.) ह्याचा अर्थ 'आजतागायत' होतो, up-to-date (adj) ह्याचा अर्थ अद्ययावत (किंवा अद्यावत) असा होतो. वरील वाक्यात दोहोंचा गोंधळ झाला आहे.

२) "ही पाहणी उपयुक्त व उपकारक ठरेल." (पृ. १५) काही फरक ?

३) 'कालांतराने ते संप्रदाय नष्ट झाले किंवा काळाच्या उदरात विराम पावले.' (पृ. १७). दोहोंत फरक आहे का ?

३) "उपासना करावयाची ती मनःपूत आणि निर्विकल्प मनाने करावयाची" (पृ. १८). 'मनःपूत मनाने' म्हणजे काय ? 'पवित्र मनाने' असे म्हणावयाचे असले पाहिजे.

४) 'मनोनिग्रह, षड्रिपूविनाश, कामपरिहार' (पृ. १८). 'षड्रिपूविनाशात', 'कामपरिहार' येत नाही का ?

५) "परमार्थचिंतनाच्या गुलाबपाण्यामध्ये भौतिक जीवनातील हालअपेष्टा आणि दुःखदारिद्र्य विरघळून गेले." (पृ. १९). गुलाबपाणी अंगावर शिंपडण्यापुरते असते. त्यात एखादी गोष्ट विरघळून जाण्याइतके ते मुबलक असते का ?"

६) "मराठी साहित्याची भागिरथी[१४] प्रवाही झाली व तिला प्रत्येक शतकात अनेक प्रवाह येऊन मिळत गेले, व नव्या नव्या आकृतिबंधाची गोपुरे तिच्या किनाऱ्यावर रचली गेली" (पृ. ३०). एकदा मराठी साहित्यातील रचनेला 'प्रवाह' म्हणणे आणि त्याच वाक्यात तिच्यातील रचनांना गोपुरे म्हणणे कितपत इष्ट आहे ? नुसत्या प्रवाहाची आणि तो प्रवाह समृद्ध होण्याची कल्पना पुरेशी होती.

७) "महानुभाव आणि वारकरी संप्रदायाचे कार्य तिहेरी स्वरूपाचे आहे. एक म्हणजे... विशिष्ट आकार दिला. दुसरे म्हणजे... आदर्श उभा केला. तिसरे कार्य म्हणजे... निर्मिती केली गेली. (पृ. ३१) पहिल्या दोन वाक्यांचा शेवट ज्या रचनेने झाला आहे, तसाच तिसऱ्या वाक्याचा शेवट 'निर्मिती केली' असाच नको का ?"



अनुक्रमणिका

८) " त्याचे (महासागराचे) मंथन करीत असताना जी रत्ने सापडली त्यांनी मराठी साहित्यसोनियाच्या खाणी उजळून निघाल्या आहेत." (पृ. १६) जी रत्ने सापडली त्यांनी[१५] साहित्यसोनियाच्या खाणी उजळून निघायला ती रत्ने काय पुन्हा त्या खाणीत नेऊन बसविली ? रत्नांनी एखादे दालन किंवा असे काहीतरी उजळून निघेल, खाणी उजळून निघायला तिथे रत्ने बसविण्याचा खटाटोप कोण करील ?

९) "असे मत मांडले जात होते." (पृ. २१३), "नखण्याही बनवल्या जात" (पृ. २१३), "निष्कर्ष काढले गेलेले आहेत" (पृ. २१५) असे कर्मणी प्रयोग इंग्रजीची भाषांतरे वाटतात. 'असे मत मांडीत असत' नखण्याही बनवीत, निष्कर्ष काढले आहेत अशी वाक्ये मराठीच्या प्रकृतीस स्वाभाविक वाटतात.

ग्रंथात मुद्रणदोष बरेच आहेत, क्षम्य म्हणावेत त्यापेक्षा अधिक. "श्रोणीभारादलस गमता स्तोक नम्रस्तनाभ्या" (पृ. २२२) हे एक उदाहरण झाले. चुका संस्कृत शब्दांतच नाहीत, मराठीतही पुष्कळ आहेत. आपल्याकडे लेखकाकडे प्रूफ तपासण्यासाठी पाठवण्याची पद्धत नाही आणि लेखकही तसा आग्रह धरीत नाहीत, त्यांनी तसा तो धरायला हवा. महाभारताच्या भांडारकर आवृत्तीतल्या सभापर्वाचे संपादन प्रा. एजर्टन (Edgerton) यांनी केले आहे. दुसरे महायुद्ध सुरू झाल्यामुळे प्रुफे त्यांच्याकडे अमेरिकेत पाठविणे अशक्य झाले. प्रथम डॉ. सुकठणकरांनी ती तपासली; तपासणारे डॉ. सुकठणकरांसारखे दक्ष प्रधानसंपादक होते. म्हणूनच प्रो. एजर्टन यांनी स्वत: प्रुफे तपासली नसताना सभापर्व छापण्याची त्यांना परवानगी दिली. "While it is to me a new experience to allow work to be issued over my name without seeing the printers, proof, I have such great confidence in Dr. Sukthankars, accuracy and reliability that the unusual procedure does not greatly disturb me." (Preface.)

---

१. 'मौखिक असे वाचावे.

२. ओवीतल्या 'आली रायाजवळी' ह्याचा लेखकाने हा अर्थ दिला आहे. (पृ. ४०)

३. ह्या शब्दाचा 'पाणी' हा अर्थ होणे शक्य नाही हा विचार बाजूस ठेवला तरी.

४. मराठीतही ऋ, ॠ, ऌ, ॡ हे चार स्वर आता गळाले आहेत, असे डॉ. भागवत म्हणतात (पृ. १५२). प्रत्यक्षात दुसरा आणि चौथा तेवढेच गळाले आहेत, कारण लेखनात त्यांचा वापर शून्यच होता. क्लृप्ती हा शब्द लिहायचा झाला तर आपण क्लुप्ती असा लिहिणार नाही. हा शब्द फारसा उपयोगात नाही म्हणून सोडून देऊ.पण अजूनही ऋषी हा शब्द आपण रुषि (किंवा रुशि) असा लिहिणार नाही.' संस्कृत ' हा शब्द आपण 'संस्क्रुत' असा लिहिणार नाही.इतकेच नव्हे तर अतिशुद्धीच्या नादात अंतःश्रृती (किंवा अंतःशृती) असे छापणार ('सकाळ' बुधवार २३ एप्रिल १९८६, पृ. ५), मग 'ऋ' अक्षर लोप पावले असे कसे म्हणावे ?

५. दन्तमूलीय वर्णांची ओळख 'दाताजवळ जीभ जाऊन होणारा' अशी न करता 'दन्तमूळाजवळ जीभ जाऊन होणारा' अशी करणे योग्य झाले असते.

६. 'आघात...जातो' असे छापले आहे.

७. मण्डन मिश्र, वाचस्पति मिश्र ह्या ऐवजी मण्डनमिश्र, वाचस्पतिमिश्र असे लिहिणे बरे. वसंत राव, लक्ष्मण शास्त्री असे आपण लिहीत नाही.

८. 'परिप्रेक्ष्य' हा शब्द परिचित नाही.

९. 'सांस्कृतिक' उद्दिष्टे काही आहेत की नाही, कल्पना नाही.

१०. ह्यात नेमका कोणता फरक लेखकाला अभिप्रेत आहे?

११. 'तृतीय नेत्र' हा सामान्यत: दाहक समजला जातो, उपकारक नव्हे. दिव्यचक्षू, ज्ञानचक्षू असा अर्थ अभिप्रेत असल्यास तसा शब्द वापरणे बरे.

१२. दुसऱ्या एका लेखकानेही भाऊसाहेबांविषयी लिहिताना ते शब्द योजिले आहेत (पृ. २८३).

१३. ह्याची काही उदाहरणे मागे दिली आहेत.

१४. भागीरथी ?

१५. 'साहित्यसोनियाचिया' असे म्हणायला हवे होते. ज्ञानेश्वरी १२-११-१२ ह्या ओव्यांत रत्नांचा सागर आणि सोन्याच्या खाणींचा उल्लेख आहे, पण ते दोन स्वतंत्र विषय आहेत. रत्नांनी सोन्याच्या खाणी उजळविण्याचा प्रश्न तिथे नाही.

[ डॉ. वि. भि. कोलते अमृत महोत्सव गौरव ग्रंथ : संपादक भास्कर लक्ष्मण भोळे; अमेय प्रकाशन, नागपूर; किंमत शंभर रुपये ]

■

# पत्रसंवाद / पत्रसंवाद / पत्रसंवाद / पत्रसंवाद

: १ :

### जाहीर माफी

पुणे, दि. ३०.१२.१९८६

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या १९८६ च्या दिवाळी अंकात 'मराठी गझल : आज आणि उद्या' हा माझा लेख आलेला आहे. सदर लेखात 'उघडू नकोस डोळे घे पापण्या...न्हाण्यासही अजूनी' या दोन द्विपद्या कवयित्री सौ. संगीता जोशी यांच्या नावावर दाखविल्या गेल्या आहेत. वस्तुतः या ओळी त्यांच्या गझलमधील नाहीत. माझ्याकडून ही जी चूक झाली आहे, त्यावद्दल मी फार दिलगीर आहे, व त्यासाठी सौ. संगीता जोशी यांची जाहीर माफी मागत आहे.

–श्रीरंग संगोराम

: २ :

डोंबिवली, दि. १२.९.१९८६

स. न. वि. वि.

आपला जुलै-सप्टेंबर ८६ चा अंक पोचला.

साहित्य पत्रिकेच्या प्रत्येक अंकाविषयी माझ्या मनात अनिवार उत्सुकता असते. त्यातून हा अंक खास 'बापूसाहेव माटे' यांजवर काढलेला! अधाशासारखा वाचून काढला. अंक अतिशय सुरेख आहे, इतकेच नव्हे तर तो संदर्भासाठी उपयुक्त आहे म्हणून संग्राह्य आहे.

अंकातील मान्यवरांचे लेख बापूसाहेव माटयांचे अनेकमिती असलेले व्यक्तिमत्त्व सरसपणे उलगडून दाखवतात, तसेच त्यांच्या आठवणीही हृद्य आहेत. साहित्य परिषदेने हा अंक काढून फार मोठे श्रेय मिळवले आहे असे वाटते. औचित्यही साधले आहे.

वाय द. वे. एका गोष्टीचा खुलासा लिहितो. श्री. रमेश धोंगडे यांनी 'श्री. म. माटे व भाषा' या लेखात पान ४६ वर सुरुवातीला 'उरजुली' या शब्दाच्या अर्थाला प्रश्नचिन्ह केले आहे. उरजुली याचा अर्थ 'उपेक्षितांचे अंतरंग' या पुस्तकात १५० पानावर वाढ खुंटलेली, खुरटी असा दिला आहे. म्हणजे चणीने उरजुली, वाढ खुंटलेली, खुरटी असा एकूण अर्थ झाला.

सुंदर अंक काढल्याबद्दल पुनश्च अभिनंदन.

–सुधीर शेंडे

: ३ :

लासलगाव, दि. १३.११.१९८६

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा दीपावली गझल विशेषांक पोहोचला. त्यातील विविध गझला आवडल्या. त्याच प्रमाणे डॉ. अक्षयकुमार काळे यांनी श्री. सुरेश भटांची घेतलेली मुलाखत वाचनीय वाटली. गझलामध्ये इंगळे यांची 'आधार,' पराडकर यांची 'जगणे कठीण झाले', कवी संजीव यांची 'कोणाचे श्रेय कोणाला' आणि महेश केळुसकर यांची– 'मोठाच पेच होते–' ह्या गझला विशेष आवडल्या. इतर लेखही चांगले आहेत. साहित्यिक साहाय्य निधीची कल्पना आवडली. लवकरच माझी देणगी परिषदेकडे पाठवत आहे.

–अरुण काळे

■

# परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा / परिक्रमा

: मध्यप्रदेश साहित्य संघाच्या अध्यक्षपदी प्रा. ना. ल. वैद्य यांची एकमताने निवड करण्यात आली. म. प्र. ची शासनमान्य दुसरी राजभाषा मराठी आहे. म. प्र. उच्च माध्यमिक मंडळाच्या प्रश्नपत्रिका केवळ हिंदी व इंग्रजी-मधून काढण्याच्या निर्णयाविरुद्ध संघाने त्या मराठीतूनही छापल्या जाण्याचा आदेश न्यायालयातून मिळविला.

: कर्नाटक शासनाने सुप्रसिद्ध कन्नड व मराठी संशोधक डॉ. शं. बा. जोशी यांचा गौरववृत्ती देऊन सत्कार केला.

: द. म. साहित्य सभेचे पाचवे अधिवेशन बेळगाव येथे सुप्रसिद्ध साहित्यिक डॉ. आनंद यादव यांच्या अध्यक्षते-खाली दि. १९, २० ऑक्टोबर रोजी आयोजित करण्यात आले होते.

: ऑक्टोबर अखेरीस कोल्हापूर येथे श्री. जयंतकुमार त्रिभुवन यांच्या अध्यक्षतेखाली ख्रिस्ती साहित्य संमेलन भरले होते. आचार्य म. ना. सूर्यवंशी यांनी उद्घाटन केले.

: नोव्हेंबरच्या तिसऱ्या आठवड्यात संकेश्वर येथे कर्नाटक विद्यापीठाच्या क्षेत्रातील कन्नड विषयाच्या प्राध्यापकांचे चर्चासत्र पार पडले. या चर्चासत्रात आठ शोधनिबंधांचे वाचन झाले. दरवर्षी एकत्र जमून आपल्या अभ्यासविषया-वर काही निबंध सादर करून त्यावर चर्चा करण्याची प्रथा सुरू करण्यात आली आहे. प्राध्यापक स्वखर्चाने अशा उपक्रमांना उपस्थित असतात.

: १५ ते १७ नोव्हेंबरला अ. भा. सिंधी साहित्यसभेतर्फे पुणे विद्यापीठात श्री. गोविंद मलिक यांच्या अध्यक्षते-खाली सिंधी साहित्य संमेलन भरविण्यात आले.

: सुप्रसिद्ध साहित्यिक व 'संस्कृती कोश'कार पं. महादेवशास्त्री जोशी यांचा महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळातर्फे दि. ९ नोव्हेंबर रोजी गौरववृत्ती देऊन श्री. विश्राम बेडेकर यांच्या हस्ते पुणे येथे सत्कार करण्यात आला. सुप्रसिद्ध नाटककार श्री. मो. ग. रांगणेकर यांना मराठी नाट्य परिषदेचा या वर्षीचा 'राम गणेश गडकरी' पुरस्कार देण्यात आला.

: कविवर्य श्री. ना. घ. देशपांडे यांच्या 'खूणगाठी' या काव्यसंग्रहास यंदाचा 'साहित्य अकादमी' पुरस्कार जाहीर झाला आहे. याच वर्षी म. रा. साहित्य-संस्कृती मंडळाने गौरववृत्ती देऊन त्यांचा सत्कार केला.

: धारवाड येथील संशोधक डॉ. शं. बा. जोशी यांच्यासाठी कर्नाटकचे मुख्यमंत्री श्री. रामकृष्ण हेगडे यांनी दहा हजार रुपयांचे अर्थसहाय्य मंजूर केले आहे. डॉ. जोशी यांचे वय ९१ वर्षांचे असून त्यांच्या मूत्रपिंडावर उपचार सुरू आहेत.

: विदर्भ साहित्य संमेलनाचे ३९ वे अधिवेशन गडचिरोली येथे २६ डिसेंबर रोजी भरविण्यात आले. अध्यक्षस्थानी प्रथितयश कवी आणि गझलकार श्री. सुरेश भट हे होते.

: अ. भा. मराठी नाट्य संमेलनाचे ६७ वे अधिवेशन डिसेंबरच्या २६, २७ व २८ या दिवशी इचलकरंजी येथे साजरे झाले. सुप्रसिद्ध नाट्य कलावंत आणि दिग्दर्शिका श्रीमती विजया मेहता अध्यक्षस्थानी होत्या. बॅ. विठ्ठलराव गाडगीळ यांनी संमेलनाचे उद्घाटन केले. स्वागताध्यक्षपदी माजी मंत्री श्री. कल्लाप्पा आवाडे हे होते.

: महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाचे ३६ वे अधिवेशन प्राचार्य शिवाजीराव भोसले यांच्या अध्यक्षतेखाली मिरज येथे दि. २७ व २८ डिसेंबर रोजी भरले होते. शिवाजी विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. के. बी. पवार यांनी उद्घाटन केले.






: डिसेंबर अखेरीस मराठवाडा पातळीवरील एक साहित्य संमेलन परतूर (जि. जालना) येथे श्री. रवींद्र सुर्वे यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. श्री. ना. धों. महानोर यांनी संमेलनाचें उद्‌घाटन केले.

: कर्नाटक राज्य कन्नड दलित साहित्य-संमेलन, दलित साहित्य संघटनेतर्फे दि. ३१ डिसेंबर रोजी बंगळूर येथे भरविण्यात आले.

पुण्याच्या 'गदिमा प्रतिष्ठान' तर्फे १४ डिसेंबर रोजी 'गदिमा स्मृतिदिनी' 'उत्कृष्ट पटकथाकार आणि उत्कृष्ट गीतकार म्हणून श्री. व्यंकटेश माडगूळकर आणि श्रीमती शांता शेळके यांना गदिमा पुरस्कार देण्यात आला.

: डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात 'ग्रंथाली' वाचक चळवळीतर्फे महाराष्ट्रभर 'ग्रंथमोहोळ' आयोजित करण्यात आले होते. या काळात ग्रंथप्रदर्शन, ग्रंथदिंडी, व्याख्याने, परिसंवाद, कथा–कविसंमेलन इ. ची योजना केली होती. अनेक नामवंत साहित्यिकांनी या उपक्रमात भाग घेतला. शहरी आणि ग्रामीण विभागात या निमित्ताने हजारो रुपयांची ग्रंथविक्री झाली.

: पुणे येथील 'दलित रंगभूमी' ने ३१ डिसेंबर रोजी आठव्या वर्षात पदार्पण केले. त्या निमित्ताने श्री. टेक्सास गायकवाड यांच्या 'मन्वन्तर' या नाटकावर एक चर्चा आयोजित करण्यात आली. अध्यक्षस्थानी श्री. दत्ता भगत होते. खा. बाळासाहेब विखे पाटील यांनी 'दलित रंगभूमी' स पन्नास हजार रुपयांची देणगी दिली आहे.

: सावंतवाडी येथे दि. २ जानेवारीस श्री. जयानंद मठकर यांच्या अध्यक्षतेखाली दुसरे मालवणी साहित्य संमेलन आयोजित करण्यात आले.

: कै. यशवंतराव चव्हाण यांच्या स्मृत्यर्थ कऱ्हाड येथे दि. ३० डिसेंबर रोजी एक साहित्य संमेलन भरविण्यात आले. अध्यक्षस्थानी प्राचार्य शिवाजीराव भोसले होते.

: म. सा. परिषदेच्या लासलगाव शाखेतर्फे डॉ. आंबेडकरांच्या चळवळीतील कार्यकर्ते श्री. पुंजाजी कचरू शेजवळ यांच्या आत्मचरित्राचा प्रकाशन समारंभ दि. १० डिसेंबर रोजी झाला.

: म. सा. परिषदेचे एक कार्यवाह आणि–प्रसिद्ध कथा–कादंबरीकार श्री. प्रभाकर अत्रे यांच्या 'गुंतता हृदय हे' या कादंबरीचा प्राचार्य श्री. भालचंद्र जयशेट्टी यांनी कन्नड भाषेत केलेला अनुवाद दैनिक 'संयुक्त कर्नाटक' मध्ये क्रमशः प्रसिद्ध झाला. लौकरच तो पुस्तकरूपाने प्रकाशित होणार आहे. श्री. जयशेट्टी यांना भाषांतराचे राष्ट्रपती अवॉर्ड मिळाले आहे.

: दर वर्षीप्रमाणे मकर संक्रांतीस औदुंबर येथे साहित्य-संमेलन भरविण्यात आले. यावर्षी सुप्रसिद्ध संशोधक डॉ. रा. चिं. ढेरे अध्यक्षस्थानी होते.

: पुणे येथील मेनका प्रकाशनतर्फे १९८७ चा पु. भा. भावे साहित्य पुरस्कार ख्यातनाम कथालेखक श्री. अरविंद गोखले यांना देण्यात आला.

: मराठी प्रकाशक परिषदेचे तिसरे वार्षिक अधिवेशन महाबळेश्वर येथे ३१ जानेवारी व १ फेब्रुवारीस पार पडले. अध्यक्षस्थानी प्रा. श्री. पु. भागवत हे होते.

: महाराष्ट्र नवसाहित्यिक परिषदेच्या वतीने २५ जानेवारीस पुण येथे साहित्य–संमेलन आयोजित करण्यात आले. अध्यक्षस्थानी डॉ. रामचंद्र देखणे हे होते.

: फेब्रुवारीच्या १४ व १५ दिनांकास सोलापूर येथे अ. भा. दलित साहित्य संमेलन प्रा. रावसाहेब कसबे यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. प्रा. जनार्दन वाघमारे यांनी संमेलनाचे उद्‌घाटन केले.

: सहावे ग्रामीण साहित्य–संमेलन दि. १४–१५ फेब्रुवारीस माजलगाव येथे भरले होते. अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. मधु मंगेश कर्णिक हे होते.

: विटा येथे भरणाऱ्या ग्रामीण मराठी साहित्य–संमेलनाच्या अध्यक्षपदी विख्यात साहित्यिक श्री. रमेश मंत्री होते. दि. १३ व १४ फेब्रुवारीस हे बारावे अधिवेशन भरले होते.

: मराठवाडा साहित्य परिषदेच्या वतीने पाच वर्षातून एकदा देण्यात येणारा 'कविराज कुसुमाग्रज पुरस्कार' यावर्षी सुप्रसिद्ध कवी आणि समीक्षक प्रा. विंदा करंदीकर यांना जाहीर झाला आहे. पु. ल. देशपांडे फौंडेशनच्या देणगीतून मराठी कवितेच्या क्षेत्रात महनीय कामगिरी केल्याबद्दल हा पुरस्कार देण्यात येतो. रोख अडीच हजार रुपये, मानपत्र आणि मानचिन्ह असे या पुरस्काराचे स्वरूप आहे. ■

# महाराष्ट्र साहित्य परिषद
# पाचवे विभागीय साहित्य संमेलन, ठाणे
## संमेलनाध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांचे
## अ ध्य क्षी य भा ष ण

साहित्य-शारदेच्या उपासकांनो, साहित्य दरबारातील मानकऱ्यांनो आणि साहित्यसुंदरीच्या रसिक प्रेमिकांनो !

' वेड्यांना शहाणे करणारे शहर कोणते, तर ते ठाणे ', असा लौकिक कमावलेल्या आणि कैक महाराष्ट्रीय सारस्वतांच्या साहित्यसेवेने अन् कलावंतांच्या कलाकौशल्याने कृतार्थ झालेल्या;

तसेच सतीश प्रधानांसारख्या दिलदार नि उत्साही महापौरांच्या कर्तबगारीने उजळलेल्या ह्या ठाणे नगरात जे विभागीय साहित्य संमेलन भरत आहे, त्याच्या अध्यक्षपदाचा बहुमान आपण मला दिल्याबद्दल मी आपले आभार मानतो. हे आभार औपचारिक नव्हेत. कारण, हा बहुमान मला अगदी अनपेक्षित होता. मी लहानपणापासून साहित्यात आहे, पण साहित्यिकांच्या विविध परीच्या कोंडाळ्यात नाही ! साहित्यसंस्थांत मी यथाशक्ती काम केले आहे, पण त्यांच्या संस्थानीकरणात भाग घेतला नाही...शिवाय भल्या भल्या गुणशाली साहित्यिकांची शिकायत ही आहे की,

कद्रदानोंकी तबीयत का अजब रंग है आज
बुलबुलोंको है ये हसरत कि वे उल्लू क्यो न हुए !

अशा अवस्थेत माझ्यासारख्या अल्पगुणी साहित्य-सेवकाला ठाणेकरांनो, आपण सन्मानित करावे हा तुमचा वेडेपणा तर नव्हे ना ? बघा हो, अजूनही विचार करा ! पत्रकारिता आणि साहित्यकारिता ह्यांचे साहचर्य सहसा असूच शकत नाही, असा समज असलेले कैक पेपरवाले मला साहित्यिक मानतात पण पत्रपांडित्य नाकारतात; आणि ह्याच्या उलट कैक साहित्य-नवाझ ' हं, पत्रकार आहे झालं ' असं म्हणून मला साहित्यिक म्हणावयास संकोचतात ! म्हणजे इमानदार असूनही माझी अवस्था कधी कधी ' ना घर का ना घाट का ' अशी होते !— अशा प्रकारच्या मला या शानदार संमेलनाचे अध्यक्षपद आपण चुकून दिले की गफलतीने देऊन चुकलात, हे तुमचे तुम्हीच पहा ! मी मात्र प्रारंभीच माझ्याविषयीची एक वस्तुस्थिती सांगून टाकतो. तीन वर्षांपूर्वी मी महाराष्ट्राच्या एका अग्रगण्य वृत्तपत्राचा प्रमुख संपादक होतो; त्याआधी प्रदीर्घ काळ त्याच्या ' साहित्य-शास्त्र ' विभागाचा (साप्ताहिक पुरवणीचा) संपादक होतो. आणि ' सर्वज्ञः एडिटरः ' अशी कित्येक भोळ्याभावड्या कार्यकर्त्यांची (इतकेच नव्हे तर काही स्वयंकेंद्रित एडिटरांचीही) समजूत ! त्यामुळे म्हणा, अथवा मी एक बराच वरा (आणि शिवाय परवडणारा वक्ता असल्यामुळे म्हणा) तरुण उदयोन्मुख साहित्यिकांच्या अनेकानेक समारंभांना सन्माननीय अतिथी म्हणून मला गावोगावी जाण्याचे भाग्य लाभले आहे. माझे स्नेही श्री. गोविंदराव तळवलकर तर माझी व्याख्यान भ्रमंती पाहून मला ' महाराष्ट्र भ्रमर ' असे विनोदाने म्हणतात !— ह्या भ्रमंतीमुळे महाराष्ट्रातल्या सर्वसामान्य रसिकांप्रमाणेच ठिकठिकाणच्या तरुण लेखकांशी माझी ओळख झाली आहे. आणि त्यामुळेच मला असे जाणवले आहे की, अभिजात (Classical) साहित्य, अभिजात संगीत, अभिजात चित्रकला, इत्यादीत किशोर वयापासून रंगलेल्या माझ्या हृदयाला, नवीन पिढीच्या वाङ्मयाचा रंगढंग सहसा विलगत नाही.

मी आजकालच्या वाङ्मयाचा अधिक्षेप वा अनादर करीत नाही; पण श्रेष्ठ साहित्याच्या सर्वमान्य कसोट्यांवर हे आजचे साहित्य मला एकंदरीत निकस नि उथळ वाटते किंवा असे म्हणू या को, माझ्या दिलाच्या सतारीच्या तारा ह्या नव्या गिटारच्या तारांशी सहस-संवादी होऊ शकत नाहीत. माझी ही अडचण मी आडा पडदा न ठेवता माझ्या तरुण साहित्यिक मित्रांना सांगितली, ह्याबद्दल त्यांनी नाराज होऊ नये, ही विनंती. आजच्या पिढीचा विचार करीत असता मला सहजच माझे तरुणपण आठवते.

...८

विदर्भातील अमरावतीमधील एका कट्टर टिळक-भक्ताच्या (आणि शिवाय फुले-आगरकरांची सामाजिक सुधारणा कृतिपूर्वक मानणाऱ्या देशसेवकाच्या) पोटी माझा जन्म झाला. माझे वडील कै. संभाजीराव ऊर्फ नानासाहेब गोखले जणू प्रसिद्धीविन्मुख व त्यागसंमुख देशसेवेचा आदर्श होते ! त्यांच्या व्यक्तिमत्त्वामुळेच आमचे घर म्हणजे अमरावतीतील सर्व पंथांतील, सर्व थरांतील, सर्व जातींच्या कार्यकर्त्यांचा अड्डाच बनला होता. ह्या अड्ड्याचे अघोषित अध्यक्ष असत वीर वामनराव जोशी आणि चिटणीस– माझे मानलेले काका गुलाबराव बक्षी. ह्या अड्ड्याचे कायमचे सदस्य शिवाजीराव पटवर्धन, बॅ. रामराव देशमुख, ना. रा. वामणगावकर, हरिहरराव देशपांडे इत्यादी १०–१२ जण असले तरी कधी लोकनायक अणे, तपस्वी बाबासाहेब परांजपे, दिनकरशास्त्री कानडे, डॉ. के. ब. हेगडेवार असेही अमरावतीबाहेरचे मान्यवर अभ्यागत ह्या अड्ड्यावर येऊन जात असत. येथे कम्युनिस्टांपासून गांधीवाद्यांपर्यंत, नेमस्तांपासून दहशतवाद्यांपर्यंत कोणालाही मज्जाव नसे. येथे केवळ राजकारणच नव्हे, तर साहित्यचर्चाही चालत असे हे विशेष !

अशा त्या स्वातंत्र्यपूर्व काळातील व्रतस्थ पण रसिक घरात मी जन्मलो, वाढलो. आणि जेव्हा नेणत्या बाल्यातून मी जाणत्या तरुणपणात प्रवेश केला तेव्हा माझे घरच नव्हे, तर सारेच वातावरण स्वातंत्र्यप्राप्तीच्या ध्यासाने भारलेले आढळले. कॉंग्रेस कमेटीचे कार्यालय असो, संघाचे संघस्थान असो, हनुमान व्यायामशाळेचे आवार असो, शाळा-कॉलेज असो, नगरवाचनालय असो, मराठी वाङ्मय असो, की 'उर्दू लिटररी सोसायटी' असो, सर्वत्र राष्ट्रीय अस्मितेचे उन्मेष मला दिसून आले. तेव्हा मतभिन्नता होती, पंथभिन्नता होती आणि तरीही त्या भिन्नतेतही एकसंघ शक्तीचे (Cohesive Force) चे सूत्र आढळत होते. 'भिन्न दिशांनी सरिता-नाले, जरी कितीही वाहत असले, एक नदीपति सर्वांपुढती...' अशी एकता त्या काळी जाणवत होती.

अशा त्या मंत्रपूत काळातील तरुण वयात सार्वजनिक जीवनात उत्तुंग चारित्र्याचे मेरू मी जवळून पाहिले तसे ह्या यंत्र-तंत्रयुगात कोठे आहेत ! आता साध्या टेकड्याही दिसत नाहीत ! त्या काळी अखिल भारतात ज्यांचा दबदबा होता असे पुढारी महाराष्ट्रात होते, 'हायकमांड'ला आपले स्वतंत्र मत निर्भयपणे सांगणारे तेजस्वी पुरुष होते. स्वातंत्र्यवीर सावरकर, सेनापती बापट, नरकेसरी अभ्यंकर, डॉ. मुंजे, वीर वामनराव जोशी, कॉम्रेड डांगे, एस. एम. जोशी, वि. घ. देशपांडे, रामानन्द तीर्थ इत्यादी महाराष्ट्रीय नेते आम्हा तरुण-पुढे तळपत होते.

आता गेल्या १५ वर्षांत ह्या तोडीचे महाराष्ट्रीय नेतृत्व दिसले आहे काय ? त्यातल्या त्यात कै. यशवंतराव चव्हाणांचा पुसटता-निसटता अपवाद– तोही अल्पकाळापुरता–वगळता, आताच्या तरुणांपुढे कोणते आदरणीय नेते आहेत ? आता दिल्ली-वल्लभांच्या चरणारविंदी 'सत्ताधरमधुमिलिंद' जयजयकार करीत आहेत ! आमच्यापुढे विधायक कार्याच्या विविध क्षेत्रात होते कर्मवीर भाऊराव पाटील, पंजाबराव देशमुख, सी. डी. देशमुख, विनोबा भावे, दाजीसाहेब पटवर्धन, रावसाहेब पटवर्धन, अण्णासाहेब कर्वे, मसूरकर महाराज, गाडगे बाबा ! आता ह्या महाभागांच्या जवळपास येऊ शकणारे नरपुंगव किती आहेत ? ह्या १५–२० वर्षांत त्यांच्या तोडीचे किती जण पुढे आले आहेत ?

ह्याचप्रकारे विविध क्षेत्रांचा 'तेव्हा आणि आता' असा विचार मी जेव्हा केला, तेव्हा मला आजच्या साहित्यात सकसपणा का नाही, विजीगिषू ध्येयवादाचे स्फुरण का नाही; जिंदादिली का नाही ह्याचा बोध झाला. जे विहिरीत ते पोहऱ्यात, जे समाजात तेच साहित्यात हे सहज लक्षात आले ! जेव्हा समाजाला एक सर्वस्पर्शी ध्येय नि तत्त्वज्ञान असते; 'काही झाले तरी आम्ही एक आहोत' ह्या भावनेचे बळ (Cohesive Force) असते, त्या वेळी तो समाज डाळिंबासारखा असतो. त्यातील सर्व दाणे परस्परांना चिकटून असतात ! आणि सर्वस्पर्शी ध्येयाच्या, तत्त्वज्ञानाच्या नि भावबंधाच्या अभावी समाजातील विविध घटक पोत्यात भरलेल्या कांदे-बटाट्यांसारखे असतात ! कोणत्याही कारणाने पोते फाटले की ते सैरावैरा विखुरतात !

पारतंत्र्याशी मुकाबला करण्यासाठी का होईना, तेव्हा समाजात समान ध्येयवादित्व निर्माण झाले होते, राष्ट्रीय अस्मिता जागृत झाली होती. अशा त्या समाजात सामाजिक बांधिलकी होती, विद्वत्तेची कदर होती, चारित्र्याला, सदाचाराला मान होता, भ्रष्टाचार हा शिष्टाचार बनला नव्हता. आणि म्हणूनच तेव्हा परवशतेत स्वतंत्रता धगधगत होती. दारिद्र्यातही सद्गुणश्रीमंती चमकत होती ! आता स्वातंत्र्योत्तर काळात आम्ही

परतंत्र झालो आहोत आणि आमच्या श्रीमंतीतही दारिद्रच पैदा झाले आहे! घट्ट कासोटा, ताठ कणा, स्वच्छ हात असे नेतृत्वच लुप्त झाले असल्यामुळे, महाराष्ट्राचा ठसा दिसत नाही. अशांच्या जमान्यात सांस्कृतिक वनीकरणाऐवजी सरकारी एरंडीकरण होत आहे!

साहित्य ही दिसायला सर्वांत सोपी, पण कमवायला अत्यंत कठीण अशी कला आहे. 'जो जे वांछील तो ते लिहो' हा आशीर्वाद मोठा उत्तेजनपर आहे. पण तो यथास्थित अमलात आणण्यासाठी 'लेखक स्वधर्मसूर्ये पाहो' हेही साहित्यिक प्राणिजाताला परखडपणे सांगितलेच पाहिजे! साहित्यिकाला आपल्या धर्माचा— म्हणजे— कर्तव्याचा विसर पडता कामा नये. कविस्तु क्रान्तदर्शी स्यात' असे अमरकोशात म्हटले आहे. कवी म्हणजे केवळ गण-मात्रा जुळविणारा नव्हे. (हल्ली तर त्या गणमात्रांची अंत्ययात्रा कित्येकांनी काढली आहे.) त्याला मानवी जीवन कळले पाहिजे. पण जीवन कोणाला कळते? जो जीवनाचे सखोल नि सर्वांगीण निरीक्षण करतो; ज्यांनी असे पूर्वीच केले आहे त्या श्रेष्ठ पूर्वसूरींचे साहित्य वाचतो, ते मनन-चिंतनाने पचवितो, अशांनाच जीवन कळण्याची शक्यता आहे. आचार्य अत्रे आम्हा नव्या पत्रकारांना सांगत की, भरपूर नि सकस वाचन हाच लेखकाचा खुराक आहे. निसर्गदत्त प्रतिभा असावीच लागते. पण तिला काही ना काही प्रमाणात परिशीलनाची जोड अत्यंत आवश्यक आहे, असे सर्वच थोर साहित्यिक सांगतात. विख्यात साहित्य-शास्त्रकार राजशेखर याने विस्तृत कविचर्या दिली असून, जो कोणी ती अनन्यभावे आचरील, त्याच्याशी देवी सरस्वतीही पतिव्रतेप्रमाणे वर्तन ठेवील, असे ठाम आश्वासन दिले आहे! महाकवी होणे असेल तर तर्कशास्त्र, व्याकरणशास्त्र, वैद्यकशास्त्र, कामशास्त्र, अर्थशास्त्र, इत्यादी अनेक शास्त्रांचे आणि सांख्य-वेदांतादी षट्दर्शनांचे ज्ञान आवश्यक आहे, असे जुन्या साहित्यशास्त्रकारांना वाटत असे.

पण गेल्या १५–२० वर्षांत 'इन्स्टंट' युग अवतरलं आहे. मग इतक्या परिशीलनाची जरुरी ती काय? काव्य काय, लघुकथा काय, कादंबरी काय, नाटक काय— अवती-भोवती घडणारे वास्तव प्रसंग निस्संग शब्दातून अधिक भडक करून सांगितले— त्यात देहविक्रय, बलात्कार— हिंसाचार ह्यांचा मालमसाला घातला— की इन्स्टंट साहित्यकृती निर्माण होते.

गेल्या काही वर्षांत 'आत्मचरित्र' हा प्रकार फार पॉप्युलर झालेला दिसतो. कोण आत्मचरित्र लिहील ह्याचा काही नेम नाही. आपल्याकडील नट-नर्तकांचे जीवन केवढे विचारसमृद्ध नि अनुभवविश्व कितीसे विशाल असणार? पण त्यांच्याविषयी समाजाला कुतूहल असते हे लक्षात घेऊन चतुर प्रकाशक त्यांना 'लिहा— खळबळजनक लिहा' असा आग्रह करीत असावेत. म्हणूनच त्यांच्या चरित्र-नाट्याची तिसरी घंटी अकालीच घणघणते!... हरकत नाही. "आकाश अंत न कळोनिहि अंतरिक्षीं। आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी" ह्या न्यायाने सिने-नाट्य-सृष्टीतील पाखरांनी गगन चोचीत पकडण्याची कोशीश का करू नये?...

'आत्मचरित्रा' हूनही सस्ता बनलेला वाङ्मयप्रकार म्हणजे चरित्र-कादंबरी. काही तुरळक अपवाद वगळता, ह्या कादंबऱ्यांबाबत असा प्रश्न माझ्या मनात येतो की 'चक्रवर्ती नेपोलियन' ह्या धर्तीची थोर पुरुषांची रसाळ चरित्रेच हे लेखक का लिहीत नाहीत? मग 'हे लिखाण अनैतिहासिक ऐतिहासिक आहे' असे म्हणण्याची आपत्ती तरी ओढवणार नाही! पाश्चिमात्य सायन्स फिक्शनच्या पावलावर पाऊल ठेवून काही महाभागांनी 'वैज्ञानिक कथा कादंबऱ्या' लिहिण्याचा उपक्रम सुरू केला आहे. ठीक आहे. पण ह्या प्रकारात कित्येकदा धड शुद्ध विज्ञानही नाही आणि शुद्ध कादंबरीही नाही, अशी आफत ओढवते.

येथे आजच्या सर्व वाङ्मय प्रकारांचे सांगोपांग समीक्षण करण्याचा हेतू नाही आणि तशी आवश्यकताही नाही. हां, खुद्द समीक्षेबद्दल विचाराल तर मी एवढेच म्हणेन की, तिचाही दर्जा गेल्या वीस वर्षांत खालावला आहे. गेल्या काही वर्षांतील समीक्षा ही सर्जनशील प्रबोधन क्रियेऐवजी सवंग प्रतिक्रिया बनली आहे. आस्वादक समीक्षेच्या नावाखाली वैचारिकतेला फाटा दिला जात आहे.

हाताच्या बोटांवर मोजता येतील अशा काही साहित्यकृतींचा अपवाद वगळता, ज्यांचा चटका जिवाला लागेल, ज्यांचा गुणसौरभ मनात रेंगाळेल असे साहित्य गत २० वर्षांत निर्माण झाले नाही. कारण चार लघुकथा लिहिताच त्यांना दूरदर्शनवर सिरीयलच्या पालखीत बसविण्याची धडपड नि चिंता!... 'सदाशिव पेठी नागरी, गावकुसाबाहेरचे ग्रामीण, वास्तववादी, स्वप्नरंजनी, सुखवस्तू ललित, विद्रोही दलित, प्रस्थापित,

विस्थापित, बंडखोर, बाहेरख्याली असे साहित्यप्रकाराचे दशावतार अपुरे पडल्यामुळेच की काय, ' दूरदर्शन प्रासादिक प्रायोजित ' हा नवा साहित्यावतार आकारास येतो आहे ! आणि या सर्वच साहित्यप्रकारांना ह्या सवंग व्यापारीकरणाच्या अथवा सरकारी कृपाकरणाच्या राहू-केतूंनी ग्रासण्याचा उपक्रम जोरात सुरू आहे. आधी दिवाळी अंकात, नंतर पुस्तकरूपात आणि अखेर नाटयरूपात, सिनेमारूपात अथवा टी. व्ही, सीरियल रूपात कादंबरीचा त्रिस्थळी प्रवास घडवायचा असल्याने तिच्यात दर १०-१५ मिनिटांनी ओढून ताणून नाटय-मयता आणण्याची कोशीश करावीच लागते. यासाठी वर्षोगणती प्रतिपाद्य कथानकाचे चिंतन-मनन-अभ्यास करण्याची जरुरी उरली नाही.

गेल्या दशकात कवितांचे अभूतपूर्व पेव फुटले आहे. हरेक साहित्य संमेलनात व्यवस्थापकांच्या तोंडी फेस आणणाऱ्या कवींच्या पलटणींनी, कवितांच्या फॅक्टऱ्या तर उघडल्या नाहीत ना ?

एक वॉलपेन् द्या मज आणुनी
भरीन ती शत शाइ–नळयांनी
मुक्त जिच्या मी उन्मादाने
तडकवीन प्रस्थापित गगने
मग अनुदाने– माझी कवने
झळकतील हो संग्रहांतुनी !

अशा उत्साहभरात लिहिल्या गेलेल्या आजच्या प्रचंड संभारात, पुनः पुन्हा जिभेवर रेंगाळतील– हृदयात घुम-तील अशा काव्यपंक्ती किती आहेत ? केशवसुत, तांबे, माधव जूलियन, कुसुमाग्रज, बोरकर, ग. दि. माडगूळ-कर, बा. सी. मर्ढेकर, मंगेश पाडगावकर, वसंत बापट, सुरेश भट, ना. धों. महानोर इत्यादींच्या तुलनेत गेल्या दशकातील कविता कितपत कसदार आहेत ?

मी व्यावसायिक नाटयक्षेत्रात असल्यामुळे आणि नाटयाचार्य खाडीलकरांनी घालून दिलेली व्यावसायिक नीतिमत्ता (प्रोफेशनल् एथिक्स) पाळणारा असल्यामुळे, नाटयवाङ्मयाबाबत काही बोलू इच्छित नाही. इतकेच सांगू इच्छितो की, नाटक हे मूलतः व मुख्यतः साहित्य आहे, हा कुसुमाग्रजांनी सुमारे १५ वर्षांपूर्वी नाटय-संमेलनाच्या व्यासपीठावरून दिलेला इशारा, सध्याची ९० टक्के नाटके धाब्यावर बसवीत आहेत.

समाजाच्या मनावर प्रभाव पाडील अशा ललित वाङ्मयाची एकंदरीत तीव्र टंचाई गत २० वर्षांत जाण-वत असताना, वैचारिक प्रबंधांची काय गत आहे ? ती काय विचारावी ! कॅपिटेशन फी देऊन सधन दगडो-बांनादेखील विद्यामंदिरात स्थान मिळू लागल्यावर, पैसे देऊन प्रबंध लिहिण्याची व्यवस्था असल्यावर, पीएच्. डी. पदवीचेच अवमूल्यन झाले आहे. आज म. म. पां. वा. काणे, वा. वि. मिराशी, दत्तो वामन पोतदार, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, अ. का. प्रियोळकर, मा. त्र्यं. पटवर्धन, रा. चिं. ढेरे, वि. भि. कोलते, न. र. फाटक, सेतुमाधवराव पगडी, धनंजयराव गाडगीळ, डॉ. आर. एन. दांडेकर, काव्यालोचनकर्ते द. के. केळकर, रस-विमर्शकार के. ना. वाटवे, डॉ. शं. दा. जावडेकर, डी. जी. तेंडुलकर, तर्कतीर्थ जोशी इत्यादींनी तोलून धर-लेली न्यायमूर्ती रानडे, लोकमान्य टिळक, तेलंग, भांडार-कर, इतिहासाचार्य राजवाडे, गुरुदेव रानडे, न. चिं, केळकर, मा. श्री. अणे, ज्ञानकोशकार केतकर इत्यादी विद्वत्-गजांची परंपरा मोडकळीस आली आहे. अशा परिस्थितीत साहित्यिक उद्यानात वैचारिक चैतन्याची कारंजी उडताना दिसली नाहीत तर नवल कसले ?

मित्रहो, ह्याचा अर्थ असा नव्हे की ' इये मराठी-चिये नगरी ' काही कौतुकास्पद नि अभिनंदनीय साहित्य गत १५ वर्षांत तरुण लेखकांकडून झालेच नाही. येथवर मी जी खंत व्यक्त केली ती केवळ तौलनिक अवलोकना-मुळेच. पूर्वीच्या कालखंडाच्या मानाने, गेल्या १५-२० वर्षांचा– म्हणजेच आजच्या तरुण साहित्यिकांचा– कालखंड कसा आहे, ह्याबद्दलची माझी प्रतिक्रिया सांगितली. पण हे करीत असताना मी हे विसरलो नाही की जरी हा अलीकडचा कालखंड म्हणजे सुवर्णयुग नसले, तरी त्यात काही सुवर्णशलाका जरूर आहेत, लख्ख सूर्यप्रकाश नसला, तरी काही दीपशिखा, सध्याच्या प्रतिकूल झंझावातातही यथाशक्ती अंधार उजळीत आहेत !

गत १५-२० वर्षांतील तरुण साहित्यिकांच्या काही प्रशंसनीय कलाकृती, या क्षणी माझ्या डोळ्यांसमोर उभ्या आहेत. त्यातील काही नावे (सर्व नव्हे) नमुन्या-दाखल सहज सुचली तशी सांगतो–

कोसला (भालचंद्र नेमाडे), रानातल्या कविता ( ना. धों. महानोर), गोतावळा (आनंद यादव), रंग माझा वेगळा (सुरेश भट), बलुतं (दया पवार) आठ-वणींचे पक्षी (प्र. ई. सोनकांबळे), उपरा (लक्ष्मण माने), एका जन्मातल्या गाठी (शं. वा. चिरमुले), मुंबई दिनांक

(अरुण साधू), रारंग ढांग (प्रभाकर पेंढारकर), खोल खोल पाणी (रत्नाकर मतकरी).

अशी काही तरुण प्रकाश किरणे इथेतिथे दिसत असली, तरी एकंदरीत असे वाटते की, संपूर्ण समाजातच जणू वैचारिकताविरोधी व्यासंगविरोधी, तप:स्वाध्यायविरोधी (Anti intellectual) वातावरण पैदा झाले आहे. सकस वैचारिक वाङमय वाचण्याचे परिश्रम जेथे आजचे साहित्यिकही विशेष घेत नाहीत, तेथे सामान्य वाचकांची कथा काय? पुणे विद्यापीठात, न. चिं. केळकर व्याख्यानमालांतून चांगली विचारगर्भ पुस्तके तयार होतात. ती अत्यल्प किमतीत (म्हणजे ३० टक्के डिस्काउंट देऊन) विक्रीस ठेवतात. पण तरीही त्यांना उठाव नाही. आपल्या ग्रंथालयांतून कोणती पुस्तके वाचली जातात ह्याची आकडेवारी काढली तर ती दर्जेदार वाङमयाच्या दु:स्थितीवर प्रकाश टाकणारी ठरेल.

दुसऱ्या महायुद्धानंतर, विशेषत: गेल्या २५ वर्षांत, अति महत्त्वाकांक्षी विजीगिषू राष्ट्रांनी अण्वस्त्र स्पर्धेच्या नादी लागून, मानवजातीच्या संहाराचा धोका निर्मिला असताना, आर्थर कोसलर, झावलोस्की, चॉमस्की (Chomsky) सार्त्र, आईनस्टाईन अशा एकाहून एक वरचढ बुद्धिमंतांनी ह्या धोकादायक भीषण परिस्थितीविरुद्ध वैचारिक मोहळ उठवून ते घराघरात पोचविले. ह्या महाभागांशी ५ टक्के तरी साधर्म्य दाखवील असा बुद्धिमंत वर्ग आपण निर्माण करू शकलो काय ?

असा सवाल मी एकदा केला असता माझे एक विनोदी मित्र म्हणाले, 'सार्त्रसारख्या बुद्धिमंताची शय्यासंगत करणाऱ्या 'सिमान् दि बोवा' सारख्या बुद्धिमती नारीच येथे नाहीत, मग येथे वैचारिक वैभवाचे नर कसे निपजावेत.?'

असे 'बुद्धिमतां वरिष्ठम्' न निपजोत. किमानपक्षी हरेक ललित साहित्यिकालाही वाचन-चिंतन-मनन-अवलोकन नि अनुभव ह्यांच्याद्वारा एक वैचारिकता असणे आवश्यक असते, ही जाणीवच गत २० वर्षांत लुप्तप्राय झाली आहे, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. 'सामर्थ्य आहे साहित्याचे । जो जो लिहील तयाचे । परंतु तेथे वैचारिकतेचे । अधिष्ठान पाहिजे ।।' अशा अधिष्ठानातूनच श्रेष्ठ नैतिक मूल्यांविषयी पक्क्या निष्ठा (Conviction) निर्माण होतात, एक जीवनदृष्टी लाभते, आणि मग ती ललित साहित्याच्या शब्दाशब्दातून पाझरते !

मी जेव्हा 'वैचारिकता' म्हणतो, तेव्हा त्याचा अर्थ एखादी पक्षीय विचारप्रणाली असा नसतो. आपल्या ललित कलाकृतींतून विशिष्ट तत्त्वज्ञानाचा प्रसार झालाच पाहिजे असाही माझा आग्रह नाही. एखाद्या पक्षाच्या प्रचारगाड्याला आपली कला जुंपणे हे तर मला साहित्यिक म्हणून बिलकुल मान्य नाही. माझी भूमिका बोधवाद्यांची नव्हे, हे आपण कृपया लक्षात घ्यावे. साहित्य हे प्रखर वास्तववादी असो की स्वप्नरंजनी असो; हे पांढरपेशांचे असो वा दलितवर्गीय लेखकांचे असो; ते रडविणारे असो वा हसविणारे; ते चेतविणारे असो वा शांत करणारे, ते खलत्वाचे नि नीचत्वाचे चित्रण करणारे असो वा 'भव्य दिव्य ते ते घ्यावे' हा बाणा बाळगणारे...त्याचा प्रकार नि आकार (फॉर्म) कोणताही असो, ते मुख्यत: कलात्मक आल्हाद देणारेच असले पाहिजे, ही मम्मटाचार्यांची विचारसरणी मला आजही जुनाट नि त्याज्य वाटत नाही. साहित्यकृतीतील कलात्मक आनंद हा मानवी भावसंपदेवर नि कल्पकतेवरच मुख्यत: अधिष्ठित असतो. तो दिक्-कालातीत असतो; जातिपातीच्या भिंती उल्लंघितो आणि खऱ्या न्यायनीतीला अविरोधीच राहतो.

पण आमचे बहुसंख्य साहित्य-साधक हे विसरतात की, भावनांची सम्पदा विचारसंपदेवरच पोसली जाते. भावनांचा विलास टोकदार-पीळदार नि सुसंगत अतएव कलासुंदर होण्यास विचारशक्ती आवश्यक असतेच. किंबहुना भावशक्ती नि विचारशक्ती ह्या भांडखोर सवती नव्हेतच; तर त्या एकजीव नि एकरूप झालेल्या बहिणीच असतात. मानवांच्या मानससरोवरात सर्वच व्यापार संलग्न नि संमिश्रपणेच विहरत असतात ! विचार-भावना नि कल्पना ह्यांचा त्रिवेणी संगम थोड्याफार फरकाने साहित्याच्या प्रयागतीर्थात झालेला असतोच ! कारण मानवता हेच सर्वोत्तम मंगल मूल्य मानणारे मानवी मन, हे तीर्थराज प्रयागच आहे !

ललित साहित्याला प्रभावशाली नि सकस बनविणाऱ्या वैचारिकतेचा स्वातंत्र्योत्तर काळात, विशेषत: गत २० वर्षांत जो ऱ्हास होत गेला, ह्याचे एक जवळचे कारण म्हणजे आमचे करंटे शैक्षणिक धोरण आणि त्यातून निर्माण झालेले शैक्षणिक अराजक. आजच्या प्रगत राष्ट्रांतील ज्ञान-विज्ञाने जिच्यात आहेत, त्या इंग्रजी भाषेचे अकाल उच्चाटन करूनच आमचे शिक्षण-नवाब थांबले नाहीत, राष्ट्रीय अस्मितेच्या भ्रांत कल्पनेपायी त्यांनी

इंग्रजाला ' चले जाव ' म्हटले, तर पुरोगामी बहुजन-समाजवादाच्या विपर्यस्त कल्पनेपायी त्यांनी संस्कृतची उचलबांगडी आरंभिली. जिला बहुसंख्य भारतीय भाषांच्या शरीरातील ' रोहिणी ' च म्हणावे लागेल आणि जिला ह्या देशाच्या परंपरागत ज्ञान-विज्ञानाचे नि संस्कृतीचे भांडारच मानावे लागेल, त्या संस्कृत भाषेला हद्दपार करण्याचे धोरण गेल्या २० वर्षांत शिगेला पोहोचले आहे ! त्यामुळे ना घरच्या कामधेनूचे दूध ना दारच्या वाघिणीचे दूध, अशी आमच्या नव्या साहित्य-वत्सांची आबाळ झाली असल्यास तो दोष कुणाचा ? ' एन्शन्ट इंडियन कल्चर ' वरील ॲथॉरिटी ' लंडनमधील डॉ. ए. एल्. बाशम् (' दि वंडर दॅट वॉज इंडिया ' चे लेखक) असू शकते; कुणी पुण्यपत्तनचा–पैठणचा वा वाराणशीचा पंडित नव्हे ! आपले प्राचीन आणि एकोणिसाव्या शतकातील दोलामुद्रित ग्रंथ अमेरिकन विद्यापीठात जपून ठेवले आहेत. येथे ते ३॥ टक्केही नाहीत ! जुने साधन-ग्रंथ जुन्या पुस्तक-विक्रेत्यांकडून पाश्चात्यांनी केव्हाच परदेशात नेले आहेत. आमच्या विद्यापीठांना त्यांची विशेष कदर नाही.

अशा ज्ञान-शत्रुत्वाच्या वातावरणात जेथे विद्यादेवीची मंदिरे भ्रष्ट झाली आहेत, तेथे साहित्याची साधना नि उपासना कितपत चालणार ? आणि ' उपासनेला दृढ चालवावे ' हा उपदेश तरी कोण ऐकणार ? बाकी सारे जाऊ द्या, आपल्या साहित्याची भाषा जी मराठी, तिची आजच्या विद्यालयातली हालत काय आहे ? तिचे व्याकरण–शुद्धलेखन नवीन पिढीने प्राय: खुंटीलाच टांगून ठेवलेले दिसते ! कोणतीही गोष्ट निकालात काढण्याची सोपी युक्ती ह्या युगाला उपलब्ध झाली आहे– आणि ती म्हणजे तिच्या कपाळी ' ३॥ टक्क्यांची ' ही लांच्छन-मुद्रा ठोकणे !

ठीक आहे. आता भाषा ९६॥ टक्केवाली होऊ द्या, अथवा खुशाल अहिराणी–कोकणी–मालवणी–वऱ्हाडी अशा बोलभाषेत लिहा. पण त्या तथाकथित बहुजन-समाजाच्या भाषेचे देखील काही नियम कराल की नाही ? समजा, ' कार्बन डाय ऑक्साइड ' ही वैज्ञानिक संज्ञा ३॥ टक्केवाल्यांच्या ' कर्बद्विप्राणिल ' ह्या शब्दात व्यक्त करणे तुम्हास लोकशाहीविरोधी वाटते आहे. मग त्यासाठी ' कोळसा दुजीव ' असा काहीसा शब्द तुम्हास बनवावा लागेल. पण ह्यातील कार्बनला समानार्थी असलेला ' कोळसा ' हा शब्द कोलसा असा लिहावा की कोयसा असा लिहावा ? आणि ' दुजीव 'मधील ' दु ' व ' जी ' ही अक्षरे ऱ्हस्व असावीत की दीर्घ, हेही ठरवावेच लागेल ! इतकेच नव्हे, तर ती ' स्टॅन्डर्डाईज्ड ' ९६॥ टक्केवाली भाषा नीट उच्चारली जावी म्हणून वाणीच्या शुद्धतेसाठी एखादे नवे ' महिम्न-स्तोत्र ' रचून ते विद्यार्थ्यांकडून पाठही करून घ्यावे लागेल !

विद्यामंदिरातील मातृभाषेचाही दर्जा जेथे घसरला तिथे अन्य शास्त्रांचे काय ? आज शाळेत गणिते शिकविली जातात, पण गणित– म्हणजे त्याचे मूलभूत सिद्धांत शिकवत नाहीत. पूर्वी एखाद्या लेखकाचा एक ग्रंथ शिकविला तरी तो संपूर्ण लेखक समजत असे. आता ' गुरुकिल्ल्यां 'च्या (गाइड्च्या) साह्याने परीक्षेपुरते रामायण !

पण परीक्षांची तर भीती उरली आहे कोठे ? जेथे ध्वनिक्षेपक लावून सामुदायिक कॉपी करण्याचे प्रकार संभवतात आणि छात्र खालच्या वर्गातून वरच्या वर्गात ढकलण्याचेच धोरण आहे, जेथे पेपर फोडणाऱ्या गॅंग्ज समूल्य सेवेचे व्रत आचरत आहेत; जेथे वशिल्याच्या वा पैशाच्या बळावर ' फर्स्ट-क्लास ' संपादन करण्याची शक्यता आहे, तेथे अभ्यास-परिशीलन नि मूलगामी विचार-पद्धती हद्दपार होणे क्रमप्राप्तच नाही काय ?

शिक्षणाची धोरणे दर मिनिस्ट्री-गणिक बदलली गेली आहेत. शिक्षणक्षेत्रात व्यापारीकरण नि राजकारण कसे घुसले आहे, बेशिस्त नि बजबज कशी माजली आहे ह्याची किळसवाणी लक्तरे वृत्तपत्रांच्या वेशीवर वारंवार टांगली जात आहेत.

अशा आखाड्यातून बाहेर पडलेले नवे साहित्यमल्ल साहित्यातील वैचारिकता कितीशी पाळणार ? त्यांची दुनियेतील अभिजात कलाकृतींशी जान-पहेचानच फारशी नाही. मग त्यांच्याकडून अभिजात वाङमयाची निर्मिती कितपत होऊ शकेल ?

> एकेक अक्षराची भीक ।
> जीर्ण कवीते मागोनि देख ।
> म्यां सर्वज्ञ कविनायक ।
> ऐसे वदविले लौकिकी ॥

ही मुक्तेश्वराची धन्योक्ता, अथवा–

> गालिब तेरे कलाममें
> क्योंकर मजा न हो ?
> पीता हूँ धोके खुस्रवे–
> शीरी सुखन के पाँव ॥

हे मिर्झा गालिबचे धन्योद्‌गार, त्यांच्यापुढे पूर्वसूरींना वाट पुसण्याचे आदर्श कसे उभे करू शकतील ?

'अहो, हा सारा लोकशाहीचा परिणाम ! लोकशाहीत लोकांची डोकी मोजली जातात, ज्ञानाच्या तराजूत तोलली जात नाहीत ! सामान्य जनांच्या राज्यपद्धतीत, कोणत्याही क्षेत्रात असामान्यता निर्माण होईलच कशी ?' असे भलेभले बुद्धिवादीही वैतागून उद्‌गारतात. त्यांचा वैताग समजू शकतो. पण उद्‌गार चुकीचेच नव्हेत, तर घातकही आहेत. जुन्या शाक्यांच्या गणराज्यातच बुद्धिप्रामाण्यवादी भगवान बुद्ध आणि वृष्णी गणराज्यात भगवद्‌गीतेचा उद्‌गाता गोपाळकृष्ण निर्माण झाला. आधुनिक लोकशाहीची गंगोत्री जी 'अथेन्स-नगरी' तिने वैचारिक क्षेत्रात तोलामोलाची भर घातली. आणि आजच्या पुढारलेल्या लोकशाही राष्ट्रातच 'विचारवंतांची मांदियाळी' प्रतिष्ठा नि स्वातंत्र्य उपभोगत आहे.

म्हणूनच लोकशाही– पद्धतीला बोल न लावता, लोकशाहीच्या नावाने गावगुंडशाही, झुंडशाही-हुल्लडशाही आणणाऱ्या; मूलभूत विचारांऐवजी घोषणाबाजी करणाऱ्या; येन केन प्रकारेण निवडणूक जिंकणे नि सत्ता भोगणे एवढेच राजकीय उद्दिष्ट डोळ्यांपुढे ठेवणाऱ्या; त्यापायी फुटीरतेला खतपाणी घालणाऱ्या सर्वच सत्ताकारणपटूंना यथाप्रमाण दोषी धरले पाहिजे. याबाबतीत सर्वच राजकारणी एकामाळेचे मणी !

'राजा कालस्य कारणम्' हा महाभारतातील सिद्धांत आजही ताजाच आहे. विशिष्ट परिस्थितीत, विशिष्ट काळात, विशिष्ट प्रकारचा राजा (म्हणजे राजकीय नेतृत्व) निर्माण होते, हे खरे. पण त्या परिस्थितीला वाईट वा चांगले वळण मुख्यत: कोण लावते ? तर ते राजकीय नेतृत्वच ! सुजाण समर्थ दूरदृष्टीचे कर्तबगार नेतृत्व आम्हास, विशेषत: गेल्या २० वर्षांत एकंदरीत लाभले नाही. ह्या नेतृत्वापाशी रेडीमेड घोषणा होत्या, येथील परिस्थितीशी सुसंगत अशी वैचारिकता नव्हती; स्वतंत्र प्रतिभा तर नव्हतीच नव्हती. मग हे नेतृत्व कोट्यवधी जनांच्या दारिद्र्यावर नि अज्ञानावर धष्टपुष्ट झाले; ध्येयवादित्व विसरले आणि दिवसेंदिवस अध:पतित होत गेले. त्याने पाश्चात्त्य देशातील (काही आधीच त्याज्य ठरलेले आणि काही ह्या देशाला गैरलागू असलेले) फॉर्म्युले आयात केले. प्रगत देशांशी मैत्री करतो म्हणता म्हणता, त्याचे बौद्धिक दास्य पत्करले ! आणि खरी लोकशाही क्रमश: रुजविण्याऐवजी सत्ताधुंद धनदांडग्यांची झुंडशाही जन्मास घातली. ह्या खुर्चीवादी भ्रांतबुद्धींना त्या प्रगत देशांची कॉपीही व्यवस्थित करता आली नाही; त्यांनी केवळ एपिंग (मर्कटसदृष अंधानुकरण) आरंभिले ! त्यायोगे सर्वसामान्य लोकांची उन्नती नव्हे, तर अनुनय करण्यात यशस्वी झालेल्या नाना योजनांपायी कोट्यवधी रुपयांची खिरापत वाटली गेली– डोळे दिपविणारे समारोह घडले पण त्यायोगे साहित्य संस्कृतीचे फारसे आरोहण होऊ शकले नाही ! एक सरंजामशाही मनोवृत्तीची अनुदान संस्कृती निर्माण झाली आणि मग सर्वच क्षेत्रांत राजकारण्यांचे नादान हस्तक्षेप सुरू झाले. ह्या नेतृत्वाची मूल्य-शबल औपचारिकता, आंधळी अनुकरणलालसा, सवंग लोकप्रियतेची आसक्ती हळूहळू सर्वच क्षेत्रांत उतरली– आपले साहित्यक्षेत्रही त्याला अपवाद राहिले नाही. परिणामी गत १५ वर्षांतील साहित्य प्रकारांनी नि आकारांनी वाढले, संख्यात्मक वाढ झाली. पण सकस गुणवत्ताच घटत गेली !

परंतु साहित्यक्षेत्रातील कसदारपणाला मारक होणाऱ्या, वैचारिकतेचे, तपस्येचे वातावरण नष्ट करणाऱ्या, ह्या असाहित्यिक आक्रमणास रोखण्यासाठी मान्यवरांनी स्वातंत्र्योत्तर काळात काय केले ? विशेष काहीच नाही. मग नव्या पिढीला तरी दोष का द्या ? कोणी महाभाग पद्मश्री-पद्मभूषण होण्यासाठी राजकारण्यांशी 'बौद्धिक' मैत्री जोडते झाले. कोण कोणत्या ना कोणत्या मंत्रिवर्य छत्रपतींचे गागाभट्ट होण्याची तमन्ना बाळगू लागले. कोणी विद्यापीठांचे राजकीय अड्डे बनविण्यास हातभार लावला ! कोणी सरकारी छपाईची कंत्राटे आपापल्या प्रकाशकांना मिळवून दिली; कोणी परदेशपंढरीच्या वाऱ्या पदरी पाडून घेतल्या ! कोणी बुद्धिमंतांनी सरकारी फ्लॅट मिळविले आणि काहींनी तर लघुउद्योगासाठी प्लॉटदेखील ! कोणी टी. व्ही. च्या तर कोणी एन. एफ. डी. सी. च्या कुरणात प्रवेश मिळविला !

आमच्यातील काही मान्यवरांनी तर पराभूत मनोवृत्ती स्वीकारून असा युक्तिवाद केला आहे की, 'अहो, जगातील प्रगत देशातही अभिजात साहित्याला ओहटीच लागली आहे. तेथेही आता अभिजात वाङ्मयाची उद्याने सुकून चालली आहेत. मुंबईच्या बुकस्टॉलवर भरपूर खपणाऱ्या, रंगीबेरंगी गुलजार वेष्टनातील इंग्रजी काद-

बऱ्या पहा. बिछानेबाज मुक्त शृंगार, विवाहबाह्य लफडी, सनसनाटी कथानक, थरारक हिंसाचार ह्यांनी रंगलेले हे आंग्ल साहित्य आजच्या युगधर्माला धरूनच नाही काय? 'स्टारवॉर्स' (अंतराळयुद्धे), अण्वस्त्रे ह्यांनी भयाकुल झालेला आणि औद्योगीकरणाच्या चक्रात सापडलेला मानव अभिजात वाङमयाकडे पाठ फिरवून दिल बहेलविणारे वाङ्मय वाचण्यास आसुसला तर नवल कसले?

ह्या युक्तिवाद आमच्या काही पुढाऱ्यांनी हिंसाचार भ्रष्टाचाराबाबत केलेल्या सवालासारखा आहे. ते विचारतात, 'भ्रष्टाचार नि हिंसाचार नाही कुठे? प्रगत देशातही तो आहेच की नाही?'

खरे पुसाल तर अभिजात वाङ्मयाहून थिल्लर लफडेबाज वाङ्मय कोणत्याही काळात नि कोणत्याही समाजात अल्पकाळ चलतीतच असते. तसे ते इंग्लंड-अमेरिकेतही असू शकते. पण त्याला प्रतिष्ठा नसते, टिकाऊपणाही नसतो. आपल्या देशातही वेश्यावस्तीची उत्तान वर्णन करणारी 'भाण' नामक एकपात्री नाटके, आणि 'चंद्रावली' सारखी व्यभिचारी काव्ये आणि लिंगपिसाट लावण्या ह्यांची अल्पकालीन चलती नव्हतीच, असे नाही. पण त्याच काळात अभिजात वाङ्मयाचीही निपज झाली आणि तीच प्रतिष्ठा पावली. 'आज प्रगत देशात अभिजात वाङ्मयाची उद्याने ओस पडली आहेत.' ही समजूत बरोबर नव्हे. थोर तत्त्वचिंतक आय्झाया बर्लिन, मार्क्सवादावरील महाभाष्यकार कोलकोव्हस्की, वर्षापूर्वीच दिवंगत झालेला महान इतिहासकार फर्डिनान्ड ब्रॉडेल ह्यांचे विचार-प्रवर्तक ग्रंथ डोळ्यांसमोर आणले अथवा महान कादंबरीकार सोल्झेनित्सिन नि दोन वर्षांपूर्वीच निधन पावलेले आर्थर कोस्लर ह्यांचे साहित्य अवलोकन केले की अभिजात वाङमयाच्या बागा पश्चिमी राष्ट्रांत उजाड बनल्या आहेत, ह्या म्हणण्यातील वैय्यर्थ स्पष्ट होईल. हॅरॉल्ड रॉबिन्स नि आॅर्थर हेले ह्यांचे उत्तान चटकदार साहित्य भरपूर खपते हे खरे. पण अशांच्या अशा कादंबऱ्यांतही जसे विशाल जीवनदर्शन घडते, तसे ते आपल्याकडील बिछाने बहाद्दर वाङ्मयात घडत नाही. कोणत्याही शहराची श्रीमंती, त्यातील भरपूर खपाच्या मच्छीबाजारावरून मापायची नसते, तर ती सराफ कट्टयावरील वा जव्हेरी बाजारावरील देवघेवी करून ठरवायची असते! आणि ह्या न्यायाने पाहता, पाश्चात्त्य देशात अद्यापि अभिजात साहित्याचे जव्हेरी बाजार ओस पडलेले नाहीत.

पण घटकाभर असे मानले, की, अभिजात साहित्यास अवकळा येऊन फ्री सेक्स (मुक्तकामुकता) नि हिंसाचार हाच पाश्चिमात्य वाङ्मयाचा युगधर्म बनला आहे; तरी तो युगधर्म आमच्याकडे अवतीर्ण होण्याजोगती परिस्थिती आज आहे काय? शिवाय ह्या तथाकथित गुणधर्म बदलण्यातच पौरुष नाही काय? 'हम वो नही की जिन्हे जमाना बदल सके' असे आमच्या साहित्यिकांनी का म्हणू नये? दुर्दैवाने या देशात माणसे भयग्रस्त झाली की ती बहुश: सिद्धिविनायक अथवा बुद्धमंदिराकडे अथवा ताजुद्दीनबाबाच्या दर्ग्याकडे वळतात! सारांश, प्रगत पश्चिमी देशांतील तथाकथित मानसिक अधोगतीचे अनुकरण करण्याचे आम्हास कारण नाही!

असो. विसरा अशा ह्या मान्यवरांना. आता तरुण साहित्यिकांनीच एका थोर परंपरेच्या जिवंत समाजाच्या घटकांस शोभेल असेच वर्तन केले पाहिजे. आपला गुणोत्कर्ष कशात आहे, साहित्याला उंची नि खोली कशामुळे येते, हे ओळखले पाहिजे. हे लक्षात घेतले पाहिजे की, अखेर साहित्याची अभिवृद्धी समाजाच्या अभिवृद्धीवरच अवलंबून आहे. म्हणूनच, 'आपण बरे की, आपले साहित्य बरे' असे म्हणून चालणार नाही. आपण समाजकारणात वा राजकारणात सक्रीय भागच घेतला पाहिजे, असे नाही. पण राजकारण-समाजकारण– अर्थकारण समाजात प्रचलित असलेल्या विविध विचारप्रणाली ह्यांची जाण आपणास असलीच पाहिजे. समाज प्रबोधनाची जी विविध कार्ये देशात यथाशक्ती चालू आहेत, त्यात रस घेणे केवळ देशाच्याच नव्हे, तर आपल्याही हिताचे आहे. त्यामुळे आपले मनन, चिंतन अधिक सफल नि सखोल होऊ शकेल. सारांश, आपणास शहामृग वृत्ती टाकली पाहिजे.

राज्यकर्ते शासकीय पुरस्कार उत्कृष्ट ग्रंथांना देतात, काही योजनांखाली पुस्तक प्रकाशनास साह्य करतात, राज्य-नाट्य-स्पर्धा आयोजित करतात. काही जुन्या अभिजात ग्रंथांचे पुनर्मुद्रण करतात, साहित्य संमेलनाला अनुदान देतात, ह्याबद्दल आपण त्यांचे आभारीच राहू. पण म्हणून खिरापत वाटणारी अनुदान संस्कृती, गलथान कारभार, वशिलेबाजी इत्यादी शासकीय अवगुणही आपण खपवून घेतले पाहिजेत असे नाही. शासन आपलेच आहे खरे. पण म्हणूनच साहित्यकलाक्षेत्रापुरता तरी त्यावर अंकुश ठेवणे हे आपले आपुलकीचेच काम आहे.

आजच्या तरी साहित्यिकांत शिक्षक-प्राध्यापकांचा भरणा मोठ्या प्रमाणावर आहे. त्यांनी शैक्षणिक क्षेत्रातील वातावरण सुधारणे, शिक्षणपद्धतीमधील उथळता काढून टाकणे, सर्वांगीण ज्ञानाची लालसा निर्माण करणे इत्यादी कामे साहित्य-समृद्धीची एक महत्त्वाची साधना म्हणून अंगिकारली पाहिजेत.

पण ह्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपल्या साहित्यसंस्था अधिक सुसंघटित नि समर्थ करणे हे होय. त्या तशा झाल्या की नवोदितांच्या गुणोत्कर्षाची विधायक कार्ये आपणास हाती घेता येतील. भपकेबाज संमेलनाचे जल्लोष उडविण्याऐवजी विविध भाषांचे वर्ग, देशी-विदेशी भाषांतील युगप्रवर्तक ग्रंथांचा परिचय करून देणारे वर्ग, आपणास जोमाने चालविता येतील. 'ग्रंथालय चळवळी' ला हरेक गावी आपण सहकार्य दिले पाहिजे. आपल्या गावाचे ग्रंथालय हे आपले एक मंदिर बनले पाहिजे. तरच 'ग्रंथाली', 'माग्रस', 'ग्रंथमित्र' इत्यादी उपक्रम यशस्वी होतील.

साहित्य-संस्था आर्थिकदृष्ट्या जशा स्वतःच्या पायावर उभ्या राहिल्या पाहिजेत, तशाच त्या कार्यक्षमही झाल्या पाहिजेत. ह्यासाठी गावोगावी लेखकसंघ स्थापना करता येतील. त्याच्या सदस्यांची एक आचारसंहिताही ठरवता येईल, जेणेकरून साहित्यिकांमधील सौहार्द वाढेल!

ह्या आपल्या संमेलनात असा काहीसा विचार झाला, तर आपले पाऊल योग्य दिशेने पडले असे होईल आणि मग अभिजात 'साहित्यसोनियाच्या खाणी' नी समृद्ध झालेल्या मराठीचिये नगरी विवेकवल्लीची लावणी सफल झालेली दिसेल! ■


**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
(तक्ता क्र. ४ नियम ८ प्रमाणे माहिती पत्रक)
प्रकार : त्रैमासिक
स्वामित्व : महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११०३०
संपादक : **डॉ. वसंत सखाराम जोशी**
पत्ता : ३८६ मधली आळी, वाई (सातारा)
राष्ट्रीयत्व : भारतीय
प्रकाशक : **महादेव विनायक गोखले**
पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता
पुणे ३०.
राष्ट्रीयत्व : भारतीय
मुद्रक : **महादेव विनायक गोखले**
पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,
पुणे ३०.
राष्ट्रीयत्व : भारतीय
मी महादेव विनायक गोखले असे जाहीर करतो की वर दिलेली माहिती बरोबर आहे.
सही– **म. वि. गोखले**


## साभार स्वीकार

### कादंबरी

**कोर्टमार्शल** : अशोक गोडबोले; शशीदीप प्रकाशन, पर्वती, पुणे ९; १९८५; रु. २५ △ **तडजोड** : अशोक गोडबोले; अमित प्रकाशन; तळेगाव दाभाडे, पुणे. १९८४; रु. २२ △ **मडंरमाला** : ज्ञानेश्वर कुलकर्णी; ज्ञानेश्वर कुलकर्णी; कोल्हापूर; १९८६; रु. ५ △ **सांगाती** : सौ. विजया आठवले; दिलीपराज प्रकाशन; पुणे २; १९८६; रु. ३८ △ **इहयात्रा** : मनोहर शहाणे; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६; रु. ४१ △ **एकूणपन्नास दिवस** : अमृता प्रीतम/पद्माकर जोशी; अनु.; श्रीविद्या प्रकाशन; पुणे ३०; १९८६; रु. ५० △ **तेरावा सूर्य** : अमृता प्रीतम; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △ **अंधाराला गंध फुलांचा** : सौ. मीनाक्षी सरदेसाई; चिंतामणी साहित्य सह. प्रकाशन संस्था; कुडाळ, १९८६; रु. ३० △ **वामन परत न आला** : जयंत नारळीकर; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९८६ रु. ४५ △ **जॉयसी** : सौ. इंदुमती नणदीकर; चेतश्री प्रकाशन; अंमळनेर; १९८६; रु. २० △ **घरण** : ना. द. जोशी; कॉन्टिनेंटल प्रकाशन; पुणे ३०; १९८६; रु. ५० △ **हरदत्तचा जिंदगीनामा** : अमृता प्रीतम; श्रीविद्या प्रकाशन; पुणे ३०; १९८७; रु. ६० △ **सरहद्द** : शरच्चंद्र मुक्तिबोध; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६; रु. ३५ (२ री आ.) △ **क्षिप्रा** : शरच्चंद्र मुक्तिबोध; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६ रु. ३२ (३ आ.) △ **कथा एका क्रांतिकारकाची** : म. ना. काळे; साहित्य प्रसार केंद्र, नागपूर; १९८६; रु. २० △

...९

# वृत्तान्त

## पाचवे विभागीय साहित्य संमेलन
### (म. सा. प. ठाणे शाखा आयोजित)
### दिनांक ७ व ८ फेब्रुवारी १९८७

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सध्याच्या कार्यकारिणीने तीन संमेलनांनंतर खंडित झालेली विभागीय साहित्य संमेलनांची परंपरा पुनरुज्जीवित करून चवथे संमेलन पुणे येथे २५, २६, २७ मे १९८६ भरविले होते. ही परंपरा पुढे चालू ठेवण्याच्या दृष्टीने ठाणे शाखेने यंदा पुढाकार घेतला आणि ७ व ८ फेब्रुवारी १९८७ रोजी ठाणे येथे पाचवे विभागीय साहित्य संमेलन आयोजित केले होते. ठाणे येथील पाचव्या संमेलनाचे अध्यक्ष म्हणून सुप्रसिद्ध नाटककार आणि पत्रकार, लोकसत्ताचे माजी संपादक श्री. विद्याधर गोखले यांची एकमताने निवड झाली होती. लोकसत्ताचे विद्यमान संपादक श्री. माधव गडकरी यांना उद्घाटक म्हणून आमंत्रित केले होते. ठाणे महानगरपालिकेचे महापौर श्री. सतीश प्रधान हे स्वागताध्यक्ष होते. त्यांचा सक्रीय सहभाग संमेलनाच्या यशस्वीतेस फारच मोलाचा ठरला. त्यांच्यामुळेच संमेलनाचा सोहळा 'गडकरी रंगायतना'च्या दिमाखदार वास्तूत थाटामाटात पार पडला.

श्रीमती शांता शेळके यांच्या गीताने ७ फेब्रुवारी १९८७ रोजी सायंकाळी ५ वाजता संमेलनाचा प्रारंभ झाला. **श्री. अनिरुद्ध जोशी** आणि त्यांचे सहकारी यांच्या गायनाने प्रसन्न वातावरण-निर्मिती झाली. म.सा.प.च्या ठाणे शाखेचे अध्यक्ष आणि संमेलनाचे कार्याध्यक्ष **श्री. चिंतामण जोशी** यांनी प्रास्ताविक केले. नंतर स्वागताध्यक्ष महापौर **श्री. सतीश प्रधान** यांचे स्वागतपर भाषण झाले. या भाषणात श्री. प्रधान यांनी समर्पक शब्दात ठाणे शहराच्या ऐतिहासिक आणि सांस्कृतिक परंपरेचा यथोचित परिचय करून दिला. याखेरीज शिक्षण, अर्थकारण, कला, साहित्य, क्रीडा अशा विविध क्षेत्रात ठाणे शहरातील ज्या नामवंत व्यक्तींनी कर्तबगारी दाखविली त्यांचा नावनिशीने गौरव करून, श्री. प्रधान यांनी नागरिकांच्या मनात त्या व्यक्तींविषयी असणारा आदरभाव व्यक्त केला.

यानंतर **श्री. माधव गडकरी** यांनी दीपप्रज्वलन करून संमेलनाचे रीतसर उद्घाटन केले. यावेळी त्यांनी केलेल्या भाषणात दूरदर्शनसारखी माध्यमे, इंग्रजी भाषेचे वाढणारे माहात्म्य इत्यादी मुद्यांचा आधार घेत मराठी भाषेच्या आणि पर्यायाने मराठी साहित्याच्या दृष्टीने पुढील काळात कोणते धोके संभवतात याचे अत्यंत मार्मिकपणे विवेचन केले. मराठी भाषाप्रेमींच्या उपस्थित समुदायाला या भाषणाने अंतर्मुख बनविले.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, या मध्यवर्ती संस्थेच्यावतीने कार्याध्यक्ष **श्री. राजेन्द्र बनहट्टी** यांनी निवेदन करताना परिषदेच्या कार्याची दिशा, साहित्यिक साहाय्य निधीसारखे नवे उपक्रम, व्याख्यानमाला आणि पारितोषिके यांची माहिती दिली. यानंतर अखिल भारतीय संमेलनाचे भूतपूर्व अध्यक्ष आणि परिषदेचे सध्याचे अध्यक्ष सुप्रसिद्ध कथाकार **श्री. शंकर पाटील** यांनी विभागीय संमेलनाचे अध्यक्ष **श्री. विद्याधर गोखले** यांचा परिचय करून दिला. परिचयानंतर सर्वश्री सतीश प्रधान, शंकर पाटील आणि चिंतामण जोशी यांनी पुष्पहार घालून संमेलनाध्यक्षांचा सत्कार केला.

संमेलनाध्यक्ष श्री. गोखले यांच्या हस्ते अनेक नव्या ग्रंथांचे प्रकाशन झाले आणि मग त्यांच्या अध्यक्षीय भाषणाला आरंभ झाला.

**श्री. विद्याधर गोखले** यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात अभिजात साहित्य आणि आजकालचे साहित्य यांचा ऊहापोह करण्याच्या निमित्ताने स्वातंत्र्यपूर्व काळ आणि स्वातंत्र्योत्तर काळ यामधील फरक स्पष्ट केला. ध्येयवादी, मंत्रपूत असा काळ आणि तशा व्यक्ती पूर्वीच्या काळात होत्या त्या तुलनेत सध्याच्या जीवनात कशी व कोणती त्रुटी जाणवते हेही त्यांनी आपल्या अनुभवांशी प्रामाण्य राखीत सांगण्याचा प्रयत्न केला. श्री. गोखले यांच्या वक्तृत्वशैलीने, अभ्यासाने आणि प्रांजळ आवि-

प्कारामे त्यांचे भाषण रंगले. शेवटी साहित्य-सस्था आणि साहित्यिक यांनी कोणत्या दिशेने वाटचाल करावी हेही अध्यक्षांनी आपल्या अपेक्षांसह सांगितले.

उद्घाटनाच्या सभेच्या शेवटी श्री. **पद्माकर शिरवाडकर** यांच्या सूचनेनुसार पुष्पगुच्छ आणि स्मृतिचिन्हे देऊन कार्यकर्त्यांचा अध्यक्षांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. शेवटी श्री. शिरवाडकर यांनी आभार मानले आणि त्यादिवशीचा सायंकाळचा कार्यक्रम संपला. या सर्व कार्यक्रमाचे निवेदन **सौ. वासंती वर्तक** यांनी केले होते.

७ फेब्रुवारीच्या रात्री ठाण्याचे रहिवासी आणि ख्यातनाम कवी **श्री. पी. सावळाराम** यांच्या अध्यक्षतेखाली आणि प्रमुख पाहुणे **श्री. लक्ष्मीकांत तांबोळी** यांच्या उपस्थितीत कविसंमेलन झाले. अनेक ठिकाणचे, भिन्न प्रवृत्तीचे कवी यासाठी उपस्थित होते. बोध, भावदर्शन, विडंबन अशा अनेकविध प्रकारांनी या कवींनी आपल्या कविता म्हटल्या. श्रोतृवर्गाने योग्य प्रतिसाद देत कार्यक्रमाची रंगत वाढवली. कवितांचे गायन आणि वेळेचे भान याविषयी दक्ष राहून ठाण्याचेच एक सुप्रसिद्ध **कवी श्री. म. पां. भावे** यांनी कविसंमेलनात निवेदकाची भूमिका उत्कृष्टपणे पार पाडली.

संमेलनाचा दुसरा दिवस परिसंवादांनी गजबजला होता. याचवेळी डॉ. बेडेकर विद्यामंदिर येथे **श्री. म. पां. भावे** यांनी **प्रा. दामोदर मोरे** यांच्या अध्यक्षतेखाली अनेक उपस्थित कवींच्या कवितावाचनाचा कार्यक्रम कुशलतेने सांभाळला. गडकरी रंगायतनात परिसंवादांची योजना होती. दोन्ही ठिकाणी अमाप गर्दी होती.

पहिला परिसंवाद **'मराठीचे अध्ययन व अध्यापन दर्जेदार कसे होईल?'** याविषयी होता. अध्यक्षस्थानी **डॉ. वि. भि. कोलते** होते. निवेदन **श्री. अशोक चिटणीस** यांनी केले. ट्रेनिंग कॉलेजचे माजी प्राचार्य **डॉ. न. रा. पारसनीस**, निवृत्त प्राध्यापक **म. ना. अदवंत** आणि ग्रामीण भागात अध्यापनाचा अनुभव असलेले **डॉ. द. ता. भोसले** या वक्त्यांनी अत्यंत सुस्पष्ट आणि उद्बोधक विचार मांडले. अध्यक्षीय भाषणात डॉ. कोलते यांनी शिक्षणाचा विचार वरून खाली नको तर खालून वर केला पाहिजे असे प्रतिपादन केले.

दुसरा परिसंवाद **'आत्मचरित्रातील खरे आणि खोटे'** या लोकप्रिय विषयावर झाला. **प्राचार्य म. वि. फाटक** यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या परिसंवादात **श्री. सुरेन्द्र बाजपेयी** यांनी निवेदकाची जबाबदारी सांभाळली. सर्वश्री **डॉ. भीमराव कुलकर्णी, दया पवार, प्रा. राम कापसे** आणि **सौ. लीला जोशी** यांनी आपापल्या भाषणातून आपले दृष्टिकोन प्रकट केले. विषयच असा होता की मतभेद आणि भिन्न दृष्टिकोन व्यक्त होणे अपरिहार्य होते. त्यामुळे परिसंवाद रंगत गेला. आत्मचरित्रातले खरे म्हणजे सत्य कसे शोधायचे? या प्रश्नापासून तो आत्मचरित्रे म्हणजे इतिहासकथन! या निष्कर्षापर्यंत



**संमेलनाध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांचा सत्कार करताना म. सा. प. ठाणे शाखेचे अध्यक्ष श्री. चिंतामण जोशी**

अनेक मते यावेळी मांडली गेली आणि श्रोत्यांना वाद-संवादाचा एक वेगळा आनंद अनुभवता आला.

भोजनोत्तर तिसरा परिसंवाद **डॉ. सौ. सरोजिनी वैद्य** यांच्या अध्यक्षतेखाली झाला. 'मराठी साहित्याचा जमाखर्च' मांडण्यासाठी परिसंवादाच्या निवेदिका **सौ. आशा साठे** सिद्ध होत्या. **प्रा. मुरलीधर सायनेकर, डॉ. निर्मलकुमार फडकुले, प्रा. गो. म. कुलकर्णी** आणि **डॉ. गो. पं. कुलकर्णी** हे वक्ते होते. समीक्षा, साहित्याची गुणवत्ता, सत्याश्रयी साहित्य, अशा अनेकविध मुद्यांवरून 'जमा' आणि 'खर्च' यांचा ताळेबंद वक्त्यांनी मांडला. शेवटी डॉ. सरोजिनी वैद्य यांनी समारोपात 'जमे'ची बाजू वरचढ असल्याचा निर्वाळा दिला.

परिसंवाद संपले आणि लगेच संध्याकाळी समारोप ठरल्याप्रमाणे सुरू झाला. यावेळी संमेलनातला औपचारिक भाग व्हायचा होता. समारोपाच्या सत्राचे प्रास्ताविक, संमेलनाचे कार्याध्यक्ष **श्री. चिंतामण जोशी** यांनी केले. संमेलनाध्यक्ष **श्री. विद्याधर गोखले** यांनी यावेळच्या उत्स्फूर्त भाषणाने श्रोत्यांना भारावून टाकले. अनुदान संस्कृतीवर कडाडून हल्ला चढवीत त्यांनी आत्मनिर्भरतेचा पुरस्कार केला. श्री. गोखले यांनी यावेळी अत्यंत औचित्यपूर्ण शब्दांत महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यशीलतेचे कौतुक करून परिषदेने सुरू केलेल्या **'साहित्यिक साहाय्य निधीला' रु. १०००/– ची देणगी जाहीर केली.**

संमेलनाच्या निमित्ताने जमलेल्या काही मान्यवरांचा यावेळी महापौर श्री. सतीश प्रधान यांच्या हस्ते स्मृतिचिन्हे देऊन सत्कार करण्यात आला. यानंतर महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह **डॉ. म. वि. गोखले** यांनी परिषदेच्या वतीने ठाणे शाखेचे पदाधिकारी, संमेलनाचे कार्यकर्ते आणि विशेषत्वाने महापौर श्री. सतीश प्रधान यांचा गौरवपूर्ण उल्लेख करून सर्वांचे आभार मानले. परिषदेने सुरू केलेल्या विभागीय संमेलनांचा उपक्रम चालू ठेवण्यात ठाणेकरांनी जो उत्साह दाखविला त्याबद्दल आनंद व्यक्त करतानाच परिषदेच्या अन्य उपक्रमांना साथ मागितली. महापौरांनी समयोचित घोषणा करून **'साहित्यिक साहाय्य निधी'ला प्रबोधनकार ठाकरे स्मृत्यर्थ रु. ५०००/– ची आपली देणगी जाहीर केली.**

शेवटी ठाणे शाखेच्या कार्यवाह **सौ. नंदिनी उपाध्ये** यांचे आभारप्रदर्शन झाले आणि राष्ट्रगीत होऊन कार्यक्रम संपला.

रात्री जे कथाकथन होणार होते, त्याचे दोन भाग होते. एक चक्रीकथाकथनाचा आणि दुसरा स्वतंत्र कथाकथनाचा. चक्रीकथाकथनामध्ये सर्वश्री **वि. आ. बुवा, विनिता ऐनापुरे, नयना आचार्य, प्रभाकर अत्रे, ना. ज. जाईल** यांचा सहभाग होता. यावेळी **सौ. मंदाकिनी भारद्वाज** यांनी निवेदन केले. त्यानंतर झालेल्या कथाकथनामध्ये सर्वश्री **शंकर पाटील, शं. ना. नवरे, अनुराधा गुरव, ह. मो. मराठे, रमण माळवदे** हे कथाकार सहभागी झाले होते.

कथाकथनानंतर संमेलनाची सांगता झाली. हे संमेलन यशस्वी करण्यात म. सा. परिषदेच्या ठाणे येथील शाखेच्या कार्यकर्त्यांनी परिश्रम घेतले आणि विभागीय संमेलनाची साहित्य परिषदेने पुन्हा सुरू केलेली परंपरा पुढे चालविली यावद्दल प्रशंसोद्गार काढत साहित्यप्रेमी रसिकांनी संमेलनस्थळाचा निरोप घेतला. ■

## साभार स्वीकार

### लेख, भाषणे, प्रबंध

**त्यांच्या कपाळी कलंक गोंदू नका** : सुमती संत; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; १९८६ रु. ३० ..**रंगफुलोर** : तारा नरोन्हा; साधना प्रकाशन, पुणे ३०; १९८५ रु. १५ △ **यशोधन** (यशवंतरावांचे विचार); विनायक पाटील–संपादक; साकेत प्रकाशन, औरंगाबाद; १९८६ रु. २० △ **यशवंतराव चव्हाण–राजकारण आणि साहित्य** : भा. ल. भोळे– संपादक; साकेत प्रकाशन, औरंगाबाद; १९८५ रु. ४० △ **ह्या ना त्या निमित्ताने** : फिरोज रानडे; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८६ रु. ३० △ **मोर** : अनिल अवचट; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६; रु. ४१ △ **घर** : आशा मुंडले; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ४५ △ **विस्मृती** : कृ. आ. मुंगीकर; नवल पब्लिकेशन्स, सेलू; १९८६ रु. ४५ △ **साहित्यप्रेमी रसिकहो !** : गंगाधर गाडगीळ; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८६; रु. २० △ **आधुनिक मराठी वाङ्मयातील स्त्रियांची आत्मचरित्रे** : विमल भालेराव; साहित्यप्रसार केंद्र, नागपूर; १९८६ रु. ६५ △



अनुक्रमणिका



# परिषद-वार्ता

**कै. व. ह. गोळे स्मृतिदिन :**

श्री. व. ह. गोळे स्मृत्यर्थ दि. २५ नोव्हेंबर ८६ व दि. २७ नोव्हेंबर ८६, अशी दोन दिवस डॉ. व. दि. कुलकर्णी यांची ' नाटयसंहिता आणि नाटयप्रयोग ' या विषयावर व्याख्याने झाली.

**कै. माधव जूलियन स्मृतिदिन :**

श्री. माधवराव पटवर्धन तथा माधव जूलियन यांच्या स्मृत्यर्थ दि. १ डिसेंबर ८६ रोजी प्रा. शशिकला शिरगोपीकर यांचे ' उर्दू गज़लची वाटचाल ' या विषयावर व्याख्यान व गायन असा कार्यक्रम झाला.

**कै. श्री. म. माटे स्मृतिदिन :**

श्री. श्री. म. माटे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दोन व्याख्याने दि. १ जानेवारी ८७ व दि. २ जानेवारी ८७ रोजी आयोजित केली होती. डॉ. अरविंद वामन कुलकर्णी यांची अनुक्रमे ' श्री. म. माटे : कलावंत आणि समाजसुधारक ' व ' श्री. म. माटे आणि आजचे ग्रामीण जीवन ' या विषयांवर व्याख्याने झाली.

**कै. वि. द. घाटे स्मृतिदिन :**

श्री. वि. द. घाटे यांचे स्मृतिदिनानिमित्त दि. १८ जानेवारी ८७ रोजी प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांचे ' वि. द. घाटे : व्यक्ती आणि वाङ्मय ' या विषयावर व्याख्यान झाले.

**कॉंटिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक :**

दरवर्षी उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकास व प्रकाशकास दिले जाणारे कॉंटिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत चिं. वि. जोशी पारितोषिक १९८६ करिता श्री. रमेश मंत्री यांच्या ' टिवल्याबावल्या ' या पुस्तकास व या पुस्तकाचे प्रकाशक श्री. म. ना. जोशी, सन् पब्लिकेशन्स यांना देण्यात आले. ही पारितोषिके अनुक्रमे रु. १२००/– व रु. ९००/– ची होती. पारितोषिक वितरण समारंभ श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते दि. १९ जानेवारी १९८७ रोजी पार पडला. पारितोषिकाचा निर्णय सर्वश्री शि. द. फडणीस, आनंद अंतरकर, गं. ना. जोगळेकर आणि म. वि. गोखले (निमंत्रक) या समितीने केला.

**कै. वि. ज. तथा पिलाजीराव फडणीस स्मृतिदिन :**

श्री. वि. ज. तथा पिलाजीराव फडणीस यांच्या स्मृतिदिनी दि. १७ फेब्रुवारी ८७ रोजी प्रा. डॉ. ह. सि. निमंळे यांचे ' दलित कविता– कालची व आजची ' या विषयावर व्याख्यान झाले.

**कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत ' कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक :**

१९८६ चे कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक श्री. श्रीधर शनवारे यांच्या ' यांग-अयांग ' या काव्यसंग्रहास व प्रकाशक सौ. आशा जवळकर, पारख प्रकाशन, बेळगाव यांना देण्यात आले. पारितोषिक वितरणाचा समारंभ दि. २७ फेब्रुवारी १९८७ रोजी परिषदेच्या सभागृहात साजरा झाला. पारितोषिक वितरण श्री. ना. ग. गोरे यांच्या हस्ते झाले. श्रीमती शांता शेळके यांनी परीक्षकांतर्फे भाषण केले. श्री. श्रीधर शनवारे यांनी सत्काराच्या उत्तरादाखल भाषण करून आपली एक कविता वाचून दाखविली. नंतर सौ. मीरा धाराशिवकर व श्री. मुकुंद धाराशिवकर यांचा ' यात्रा अनंताची ' हा कुसुमाग्रजांच्या निवडक कवितांच्या वाचनाचा कार्यक्रम झाला.

**कै. ना. गो. चापेकर स्मृतिदिन :**

श्री. ना. गो. चापेकर स्मृतिदिनानिमित्त दि. ५ मार्च ८७ रोजी प्रा. ग. प्र. प्रधान यांचे 'साहित्य आणि समाजजीवन' या विषयावर व्याख्यान झाले.

## देणग्या :

**कै. दि. बा. मोकाशी आणि श्री. शंकर पाटील पारितोषिक :**

१) प्रसिद्ध कथाकार कै. दि. बा. मोकाशी यांच्या स्मरणार्थ दि. बा. मोकाशी मित्रमंडळाने रु. १२०००/– ची देणगी परिषदेकडे दिली असून या रकमेच्या व्याजातून दरवर्षी रु. ५००/– चे पारितोषिक कथासंग्रह, प्रवास-वर्णन किंवा कादंबरी या वाङ्मयप्रकारातील लेखकाच्या प्रथम पुस्तकाला आलटून पालटून द्यावयाचे आहे.

२) सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. शंकर पाटील यांच्या षष्टचब्दीपूर्तीनिमित्त श्री. शंकर पाटील सत्कार समितीने रु. २०,०००/– चा निधी परिषदेच्या स्वाधीन केला असून या निधीच्या व्याजातून दरवर्षी श्री. शंकर पाटील यांच्या जन्मदिनी कथा-कादंबरी या वाङ्मयप्रकारातील लेखकाच्या प्रथम किंवा द्वितीय पुस्तकाला रुपये २०००/– चे पारितोषिक आणि मानचिन्ह द्यावयाचे आहे.

## म. सा. परिषदेचे ५ वे विभागीय संमेलन :

परिषदेचे ५ वे विभागीय संमेलन परिषदेच्या ठाणे शाखेतर्फे दि. ७ व ८ फेब्रुवारी रोजी ठाणे येथील गडकरी रंगायतनमध्ये थाटात साजरे झाले. संमेलनाचे अध्यक्ष श्री. विद्याधर गोखले हे होते. स्वागताध्यक्ष ठाणे महानगरपालिकेचे महापौर मा. सतीश प्रधान होते. श्री. माधव गडकरी हे संमेलनाचे उद्‌घाटक होते. विविध परिसंवाद, कविसंमेलने, कथाकथन इ. भरगच्च कार्यक्रमाने हे संस्मरणीय संमेलन पार पडले. त्याचे सविस्तर वृत्त याच अंकात स्वतंत्रपणे दिले आहे.

## शाखावृत्त :

**लासलगाव शाखा :**

२ ऑक्टोबर ८६ रोजी म. गांधी जयंतीनिमित्त स्थानिक कवींचे काव्यवाचन संमेलन आयोजित करण्यात आले होते. त्यात ३० कवींनी भाग घेतला. अध्यक्षस्थानी लासलगावातील कवी डॉ. भरतकुमार सोनी होते.

दि. १० डिसेंबर १९८६ रोजी लासलगावातील जुनेजाणते साहित्यिक श्री. पुं. ल. शेजवळगुरुजी यांच्या 'पुंजी' ह्या आत्मचरित्राचे प्रकाशन करण्यात आले. साकेत प्रकाशनाने प्रसिद्ध केलेल्या या पुस्तकाचे प्रकाशक श्री. बाबा भांड तसेच प्रख्यात साहित्यिक प्रा. प्र. ई. सोनकांबळे हे या प्रसंगी उपस्थित होते. पीपल्स एज्युकेशन सोसायटीचे सेक्रेटरी प्रा. व्ही. डी. गायकवाड ह्यांनी 'पुंजी' हे आत्मचरित्र प्रकाशित केले. अध्यक्षस्थानी माजी आमदार श्री. द. भि. पाटील होते. या प्रसंगी श्री. शेजवळगुरुजींचा अनेक संस्थांतर्फे हार्दिक सत्कार करण्यात आला.

**कोल्हापूर शाखा :**

शनिवार दि. १८ ऑक्टोबर, १९८६ रोजी 'प्रतिज्ञा पाठ्यपुस्तकातील' या पुस्तकावर पुस्तकाचे लेखक व विचारवंत मा. यदुनाथ थत्ते यांच्या उपस्थितीत चर्चा आयोजित करण्यात आली. शाखाध्यक्ष चिं. ह. भाटवडेकर यांनी अध्यक्षस्थान भूषविले. कार्यवाह शशिकांत महाडेश्वर यांनी प्रास्ताविकासह पाहुण्यांचा परिचय करून दिला. उपाध्यक्षा प्रा. मधुमालती कोटिभास्कर यांनी आभार मानले.

शनिवार दि. १४ डिसेंबर ८६ रोजी ग. दि. माडगूळकर स्मृतिदिन सुप्रसिद्ध चित्रपट कथालेखक व दिग्दर्शक मा. दिनकर द. पाटील यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. शाखाध्यक्ष चिं. ह. भाटवडेकर यांनी प्रास्ताविक केल्यानंतर कार्यवाह शशिकांत महाडेश्वर यांनी अहवाल सादर केला. प्रा. मंदा कदम यांनी ग.दि. माडगूळकरांच्या साहित्याचे समीक्षण केले. सर्वश्री गजाननराव भोगावकर, माधव पातकर, बाबा पाटील व

अंबादास माडगूळकर यांनी अण्णांच्या आठवणी सांगितल्या. जनार्दन गांधी यांनी सहकाऱ्यांच्या साथीने अण्णांची गीते सादर केली. कार्याध्यक्षा प्रा. मंदाकिनी खांडेकर यांनी आभार मानले.

**जत शाखा :**

शाखेचे उद्घाटन, डॉ. द. ता. भोसले (कार्यकारी मंडळ सदस्य) यांच्या हस्ते १४ डिसेंबर ८६ रोजी झाले. याप्रसंगी त्यांचे व्याख्यान झाले.शाखेचे कार्यकारी मंडळ पुढीलप्रमाणे आहे.

**अध्यक्ष** : प्राचार्य. श्री. भगवानराव वाबर. **उपाध्यक्ष** : श्री. विष्णुपंत खोचीकर. **कार्यवाह** : डॉ. श्रीपाद जोशी, **सहकार्यवाह** : श्री. प्रमोद पोतनीस, श्री. शिवदास जानकर, **कोषाध्यक्ष** : श्री. सुधीर चव्हाण. **कार्यकारिणी सदस्य** : सौ. प्रतिभा कुलकर्णी, प्रा. मिसाळ, प्रा. रानडे, डॉ. माणगावकर, श्री. बी. डी. कटरे, श्री. के. व्ही. नागराळे, श्री. जी. वी. ऐनापुरे, श्री. एस. टी. उबाळे, सौ. वासंती वाघ.

**वाई शाखा :**

१) दि. २१ डिसेंबर रोजी श्री. वामन होवाळ यांचे 'माझ्या लेखनविषयक प्रेरणा' या विषयावर व्याख्यान झाले. त्यानंतर दलित साहित्यावर चर्चा झाली.

२) दि. ७ फेब्रुवारी १९८७ रोजी प्रा. दिलीप जगताप यांनी आपल्या 'वचक' या एकांकिकेचे वाचन केले. त्यानंतर 'वचक' वर चर्चा झाली.

३) दि. २३ फेब्रुवारी रोजी वि. सा. सं. चे अध्यक्ष व म. सा. प. चे उपाध्यक्ष डॉ. राम शेवाळकर यांनी वाई शाखेस भेट दिली. म. सा. प. चे कार्य ग्रामीण भागात अधिक प्रमाणात कसे करता येईल यावद्दल डॉ. शेवाळकर यांनी मार्गदर्शन केले.

४) दि. २६ फेब्रुवारी लो. टि. ग्रंथालयाच्या सभागृहात मराठी विश्वकोशाचे प्रभारी विभाग संपादक प्रा. रा. ग. जाधव यांच्या हस्ते श्री. प्रकाश पांडुरंग जाधव यांनी लिहिलेल्या 'वांग' या कादंबरीचे प्रकाशन झाले. 'वांग' कादंबरीच्या निमित्ताने प्रा. रा. ग. जाधव यांनी ग्रामीण साहित्याच्या वैशिष्ट्यांवर प्रकट चिंतन केले. अध्यक्षस्यानी म. सा. पत्रिकेचे संपादक डॉ. वसंत स. जोशी होते. डॉ. जोशी यांनी आपल्या समारोपाच्या भाषणात 'वांग 'कादंबरीची काही वैशिष्टचे सांगितली. प्रारंभी शाखेचे कार्याध्यक्ष ॲड. अशोक भट यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. शाखेचे कार्यवाह प्रा. विजयकुमार फरांदे यांनी लेखक व पाहुण्यांचा परिचय करून दिला. डॉ. सौ. नीलम र. हातेकर व प्रा. सतीश सूर्यवंशी यांनी ग्रंथपरिचय करून दिला. शाखेचे अध्यक्ष डॉ. अ. वि प्रभुणे यांनी आभार मानले.

**संलग्न संस्थावृत्त : दक्षिण रत्नागिरी साहित्य संघ, सावंतवाडी.**

डॉ. वसंत सावंत– अध्यक्ष, प्रा. ह. व्यं. देशपांडे– कार्याध्यक्ष, श्री. हरिहर आठलेकर– कार्यवाह.

८५–८६ सालात झालेले कार्यक्रम :

१) श्री. रवींद्र पिंगे यांचे व्याख्यानः विषय : 'मी पाहिलेला भारत.'

२) वार्षिक कोजागरी कविसंमेलन : २२ ऑक्टोबर. ८५. अध्यक्ष : कवी नारायण पेडणेकर.

३) सत्कार :

१. श्री. ल. मो. बांदेकर : 'आर्य चाणक्य' या त्यांच्या नाटयसंहितेला अरुण सरनाईक स्मृती पारितोषिक मिळाल्याबद्दल.

२. श्री. प्रकाश प्रभू : 'पालखी' कथासंग्रहाला राज्यपुरस्कार मिळाल्याबद्दल.

३. डॉ. वसंत सावंत : 'उगवाई' काव्यसंग्रहास ह. स. गोखले पारितोषिक मिळाल्याबद्दल.

४. प्रा. ह. व्यं. देशपांडे : पर्ल बक यांच्या कादंबऱ्यांवरील एका शोध निबंधास ऑलिव्ह रेडिक पुरस्कार मिळाल्याबद्दल.

४) श्री. महेश केळुसकर यांच्या 'मोर' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन तसेच द. र. सा. संघाच्या 'अबोली' या अंकाचे प्रकाशन. प्रमुख पाहुणे श्री. मधु मंगेश कर्णिक. ५) पंधरावे वार्षिक कोजागरी कविसंमेलन दि. १५ ऑक्टोबर. ८६ अध्यक्ष : कवी प्रा. शंकर वैद्य. मुंबई. ६) दि. ९ ते १२ नोव्हेंबर ८६ या काळात सावंतवाडी येथे संपन्न झालेल्या म. राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या 'नवलेखक शिविरा'च्या आयोजनात सहभाग. ७) दुसऱ्या मालवणी संमेलनात 'ग्रंथ पालखी'चे आयोजन : २ डिसेंबर ८६.

राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे
कार्यवाह

## साभार स्वीकार

### चरित्रे, व्यक्तिचित्रे, स्नेहचित्रे, आठवणी

**आमची कथा** (दुर्गाबाई देशमुख) : कुसुम कुलकर्णी–अनु.; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८७ रु. २२ △ **असा मी भूलभुलैय्या** : डॉ. ग. शि. आंबर्डेकर; अभिनव प्रकाशन, मुंबई; १९८६ रु. ६० △ **यापटनं** : रामचंद्र तावरे; लोकवाङ्मय गृह, प्रा. लि. मुंबई; १९८६, रु. २० △ **भगवानबुद्ध** : गजानन जोहारी; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८६; रु. २० △ **हैदराबाद राज्याचे विसर्जन–दिगंबरराविंदू** : कुलकर्णी श्री. रं. संपादक; साकेत प्रकाशन, औरंगाबाद; १९८६ रु. ७० △ **पत्रकार महर्षी श्री. शं. नवरे**; श्री. म. सहस्रबुद्धे; त्रिदल प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. १८ △ **केशराचे शेत** : मामा पेंडसे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ६५ △ **चिंगिझखान** : विनायक राजगुरू; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △ **सातारचा सिंह** : राघव शिवणीकर; श्रीराम बुक एजन्सी, पुणे ३०; १९८६; रु. १०० △ **स्वामी विवेकानंद** : गजानन जोहारी; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७; रु. २० △ **स्मिता पाटील** (आठवणी) : रेखा देशपांडे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. २५ △ **आठवणीत राहिलेली माणसे** : एस्. डी. काळे; काळे सत्कार समिती, सातारा; १९८६; रु. २५ △ **प्रकाशाची कारंजी** : विजया काळे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. ५५ △ **पाकिस्तानी कथाकार** : अरविंद गोखले; साधना प्रकाशन, पुणे ३०, १९८६; रु. २० (स्नेहचित्रे) △ **बांगलादेशी कथाकार** : अरविंद गोखले; साधना प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. १५ △

### समीक्षा : धार्मिक व इतर

**मुक्तिबोधांचे साहित्य** : रा. भा. पाटणकर; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६; रु. ५० △ **कविता कुसुमाग्रजांची** : डॉ. अक्षयकुमार काळे; साहित्य प्रसार केंद्र, नागपूर; १९८६ रु. ३५ △ **वैद्य वल्लभसहिता खं. १** : संपादित; उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद; १९८६ रु. २५ △ **शिवरामहृदय खं. १** : डॉ. भीमाशंकर देशपांडे; सौ. शशिकला देशपांडे, आळंद (जि. गुलबर्गा); १९८६ रु. ३० △ **शिवरामहृदय खं. २**; भीमाशंकर देशपांडे; सौ. शशिकला देशपांडे, आळंद (जि. गुलबर्गा); १९८६; रु. ४० △ **ज्ञानेश्वरीचा शास्त्रीय अभ्यास** : वा. के. लेले; साहित्य प्रसार केंद्र, नागपूर; १९८६ रु. ६० △ **फलज्योतिष विद्येवर शोधकिरण** : मा. श्री. रिसबूड; १२०२ सदाशिव पुणे ३०; १९८६; रु. ३ △ **एक समुद्रपक्षी** : वसुधा गोखले; अनिल मेहता, १२१६ सदाशिव, पुणे ३०; १९८६; रु. २० △ **पु. भा. भावे समग्र वाङ्मय सूची** : शंकरराव जोशी; पु. भा. भावे स्मृती समिती, मुंबई १४; १९८६; रु. ५ △ **मराठी लाक्षणिक शब्दकोश** : र. ल. उपासनी व भा. ल. कुलकर्णी; साहित्य प्रसार केंद्र, नागपूर; १९८६; रु. ५० △ **वररोजच्या गोष्टी** : कृ. भा. बाबर; समाज शिक्षणमाला, पुणे ३०; १९८७; रु. २ △

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे नवीन प्रकाशन

# मराठी फार्स

एकोणीसाव्या शतकातील प्रातिनिधिक, निवडक आणि
दुर्मिळ फार्सांचा एकमेव संग्रह

संपादक
डॉ. भीमराव कुलकर्णी

पृष्ठे डेमी ४४० मूल्य रु. ६५/-

साहित्य परिषदेच्या सभासदांना खास सवलत
३० जून १९८७ पर्यंत रु. ५०/- ला हा ग्रंथ
देण्यात येईल. ट. ख. निराळा

प्राप्तिस्थळ
महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरध्वनी : ४४२९६३





# महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची प्रकाशने

□

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड १**
( आरंभ ते इ. स. १३५० )
संपादक : डॉ. शं. गो. तुळपुळे : रु. १२५

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड २ ( भाग १ व २ )**
( १३५० ते १६८० )
संपादक : डॉ. स. गं. मालशे : रु. ११०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ३**
( १६८१ ते १८०० )
संपादक : प्रा. रा. श्री. जोग : रु. ३०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ४**
( १८०१ ते १८७४ )
संपादक : प्रा. रा. श्री. जोग : रु. ३०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ५ ( भाग १ व २ )**
( १८७५ ते १९२० )
रा. श्री. जोग : रु. ५५

आवृत्ती संपत आली
**भाषा व साहित्य : संशोधन खंड १.**
संपादक : डॉ. वसंत स. जोशी : रु. ३०.

नुकताच प्रसिद्ध झाला
**भाषा व साहित्य : संशोधन खंड २.**
संपादक : डॉ. वसंत स. जोशी
डॉ. गं. ना. जोगळेकर : रु. ९०.

- वाङ्मयेतिहासाचे पाचही खंड एकदम घेतल्यास सवलत रु. २८० + टपाल खर्च.
- सर्व प्रकाशनांना १५ टक्के कमिशन दिले जाईल

□

कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ३०
( दूरध्वनी ४४२९६३ )